# भारताची पहिली पंचवार्षिक योजना

भारतीय नियोजन-समितीनें तयार केलेल्या
पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या इतिवृत्ताचें
सुबोध मराठी भाषांतर

卐



चित्रशाळा प्रकाशन : पुणें, २

# पहिली पंचवार्षिक योजना

भारतीय नियोजन-समितीनें तयार केलेल्या पहिल्या
पंचवार्षिक योजनेच्या सारग्रंथाचा

**सुबोध मराठी अनुवाद**



किंमत अडीच रुपये

चित्रशाळा प्रकाशन, पुणें २

# प्रास्ताविक

हें पहिलें पंचवार्षिक नियोजन आहे. अशीं पांच नियोजनें पुरीं झाल्याशिवाय हिंदुस्थानचें स्वरूप पालटणार नाहीं. अमुक योजना नाहीं, तमुक योजना नाहीं म्हणून नाराजी आली आहे; पण २५ वर्षांच्या पांच नियोजनांत हिंदुस्थान सरकार सर्वच योजना पुऱ्या करणार आहे.

पहिल्या नियोजनाचा खर्च २०६९ कोटि रुपये आहे. त्यांपैकीं आतांपर्यंत ४२५ कोटी मध्यवर्तीचे व ४२९ कोटि राज्यांचे खर्च होऊन गेले आहेत. उरलेल्या तीन वर्षांत बाकीचे म्हणजे १२१५ कोटि रुपये खर्च व्हावयाचे आहेत. पहिल्या खर्ड्यांत १४९२ कोटि रुपये खर्च होणार होते; आतां ही रक्कम २०६९ कोटि रुपये झाली आहे. दोन्ही नियोजनांमध्यें पडलेला फरक पुढें दिला आहे.

| | सध्यांचें नियोजन | पहिल्या खर्ड्यांतील नियोजन | सध्यांचें शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|
| १ शेती व सामाजिक विकास | ३६०·४३ | १९१·६१ | १७·४ |
| २ पाटबंधारे व वीज | ५६१·४१ | ४५०·३६ | २७·२ |
| ३ वाहतूक व दळणवळण | ४९७·१० | ३८८·१२ | २४ |
| ४ उद्योग-धंदे | १७३·०४ | १००·९९ | ८·४ |
| ५ सामाजिक सेवाकार्यें | ३३९·८१ | २५४·२२ | १६·६४ |
| ६ पुनर्वसन | ८५ | ७९ | ४·१ |
| ७ किरकोळ | ५१·९९ | २८·५४ | २·५ |
| एकुण कोटि रुपये | २०६८.७८ | १४९९.९२ | १०० |

नवीन खर्च जे सध्यांच्या नियोजनांत करण्यांत येणार आहेत, त्यांत समाज-विकास प्रकल्पाकरितां ९० कोटि रुपये आहेत व ३० कोटि लहान पाटांच्या योजनांकरितां आहेत. नॅशनल एक्स्टेन्शन ऑरगॅनिझेशनकरितांहि सोय करण्यांत आली आहे. नव्या पाटपाण्यांच्या अत्यंत महत्त्वाच्या अशा योजनांकरितांहि पैसे खर्च करण्याचें ठरविलें आहे.

उद्योगधंद्यांच्या सरकारी विभागांत ५० कोटि रुपये पूर्वीपेक्षां जास्त मोठ्या प्रमाणावरील विजेच्या सामग्रीकरितां, वाहतूक, खाणी वगैरेंकरितां धरले आहेत. पोलादाच्या कारखान्यांत वाढ करण्याकरितां अशीच मोठी रक्कम खर्ची होणार आहे. खादी, ग्रामोद्योग, हातमाग वगैरेंकरितां तरतूद केली असून, घरगुती उद्योगधंदे व लहान धंदे यांच्याकारितां १५ कोटि रुपये खर्चांत धरले आहेत. ४९ कोटि रुपये कामगारांच्या घरबांधणीकरितां व १० कोटि मलेरियाच्या प्रतिबंधाकरितां खर्च केले जाणार आहेत. १५ कोटि रुपये दुष्काळ-निवारणाकरितां ठेवले आहेत. राज्यांतर्फें व्हावयाच्या योजना जिल्हा व पोटाजिल्ह्यावर सोपवाव्या म्हणजे जनतेचा उत्साह वाढेल या हेतूनें तशी सूचना केली आहे. स्थानिक योजना जर कोणी आंखल्या व त्या-करितां परिश्रम करण्याची तयारी दाखविली तर त्याकरितां मदत म्हणून १५ कोटि रुपये पुढील तीन वर्षांकरितां राखून ठेवले आहेत.

ज्या सार्वजनिक संस्था समाज-कार्य करीत असतील त्यांना मदत म्हणून चार कोटि रुपये ठेवले आहेत. राष्ट्रिय विकासाच्या दृष्टीनें सामाजिक, आर्थिक व राज्यकारभार-विषयक प्रश्नांचें संशोधन करावें म्हणून विद्यापीठें व इतर संस्थांच्या सहकार्यानें हें काम करण्याकरितां ५० लाख रुपये खर्च करावयाचे आहेत. उद्योगधंद्यांच्या बाब-तींत जे खासगी प्रयत्न होणार आहेत, अशा ४२ धंद्यांची यादी करण्यांत आली आहे.

या अहवालाचे तीन खंड आहेत. पहिल्या खंडांत आपल्यासारख्या अर्ध-विकसित देशांत विकासाची पद्धति कशी असावी याचें विश्लेषण केलें आहे व दीर्घ-कालीन ध्येयांचें दिग्दर्शन केलें आहे. उद्देश एवढाच कीं, त्या दिशेनें आपण पावलें टाकावींत. याच खंडांत उद्दिष्टें, अग्रक्रम व तंत्रें यांची चर्चा विस्तारानें केली आहे व आपलें नियोजन यशस्वी होण्याकरितां कोणत्या शक्तीचें संचालन होणें जरूर आहे हें दाखविलें आहे.

दुसरा खंड राज्यकारभार व सार्वजनिक सहकार्य यासंबंधीं आहे. राज्य-कारभाराच्या सुधारणेकरितां बऱ्याच सूचना केल्या आहेत. जनतेच्या सहकार्याशिवाय हेंच काय पण कोणतेंहि नियोजन यशस्वी होणार नाहीं. या सहकारितेवर अहवालांत फार जोर देण्यांत आला आहे.

तिसऱ्या खंडांत निरनिराळ्या विकास व योजनांचे कार्यक्रम दिले आहेत. शेतकीविद्युत्, उद्योगधंदे व दणळवळण, सामाजिक कार्यें व रोजगार असे कार्यक्रमाचे तीन भाग केले आहेत.

या नियोजनाच्या मागें कांहीं एक धोरण आहे. हें धोरण राज्यें व मध्यवर्ती सरकार यांच्या विचारानेंच अंमलांत आणलें पाहिजे. त्याकरितां हिंदुस्थानचे प्रधानमंत्री व राज्यांचे सर्व मुख्य मंत्री यांचें एक नॅशनल डेव्हलपमेंट कौन्सिल ऑगस्ट १९५२ मध्यें स्थापन झालें आहे.

नुसतें नियोजन, त्याच्या योजना, त्याकरितां लागणारा खर्च, उपलब्ध साधन-सामग्री, व पगारी नोकर-वर्ग एवढ्यांच्या साहाय्यानें यशस्विता पदरीं पडणार नाहीं. जनतेचें पाठबळ मागें असल्याशिवाय कांहींच करतां येणार नाहीं व केलें गेलें तर टिकणार नाहीं. हें नियोजन जनतेचें व जनतेकरितां आहे. तेच भारताचे भाग्य-विधाते आहेत. तेव्हां त्यांनीं ह्या नियोजनाचा आपलेपणानें अंगीकार केला पाहिजे.

सदर पुस्तक हें मूळ नियोजनाचें सार आहे. नियोजनाचा मूळ ग्रंथ फार मोठा आहे व तो अद्याप छापील स्वरूपांत प्रसिद्ध व्हावयाचा आहे. आज जनतेंत नियो-जनाबद्दल औत्सुक्य आहे. तेव्हां त्यांना सरकारनें प्रसिद्ध केलेल्या सार-ग्रंथांचें सुबोध मराठी भाषान्तर शक्य तितक्या लवकर उपलब्ध व्हावयास पाहिजे या दृष्टीनें हा प्रयत्न करण्यांत आला आहे. परिस्थितीप्रमाणें प्रश्न बदलतात व प्रश्नानुरूप भाषेंतहि बदल होतो. नियोजनांतील मूळ भाषा नेहमींच्या भाषेपेक्षां किती तरी निराळी आहे. हें जर मूळ भाषेचें, तर तिच्या भाषांतरांचें विचारावयास नको. भाषेंत क्लिष्टता नाहीं, ती विषयांत व विषयाच्या अपरिचितपणामध्यें असलीच तर आहे. सरावानें आजचे कठीण शब्द हे उद्यां सोपे वाटूं लागतात. दुर्दैवानें मराठीमध्यें शब्दांच्या निरनिराळ्या छटा दाखविणारे शब्द नाहींत. पण अर्थात् प्रसंगानें शब्दसृष्टि जागृत होते व नवे शब्द निर्माण होतात. त्याची वाट पाहात राहावें लागेल. गर्दीनें प्रसिद्ध केलेल्या या पुस्तकांत जे दोष राहिले असतील ते दाखविल्यास आभारी होऊं.

पुणें
२६।१।५३

प्रकाशक

# अनुक्रमणिका

## १ : वाढीचा प्रश्न

### नियोजन, आर्थिक व सामाजिक अंगें.

लोकांच्या राहणीचा दर्जा वाढवावा आणि त्यांना अधिक संपन्न व अधिक विविध प्रकारच्या जीवनाची संधि उपलब्ध करून द्यावी ही या नियोजनांतील मध्यवर्ती कल्पना आहे. आपल्या देशांत जी काय मानवी व भौतिक साधनसामग्री आहे तिचा अधिक परिणामकारक उपयोग करून घ्यावा, आणि अशा प्रकारें समाजाकडून वस्तूंचें व कामाचें अधिक उत्पादन करून घ्यावें, व त्याचबरोबर उत्पन्न, संपत्ति व संधि यांतील विषमता कमी करावी हें या नियोजनाचें ध्येय आहे. जर आपण नुसता उत्पादनवाढीचा कार्यक्रम हातीं घेतला तर वाढलेल्या संपत्तीचा बहुतेक भाग अगदीं मोजक्या व्यक्तींच्या हातीं जाईल, आणि बाकीचा प्रचंड समाज आहे तसाच दारिद्र्यांत राहील. त्याचा परिणाम असा होईल कीं, जीं व्यापक सामाजिक उद्दिष्टें आपणांस प्राप्त करून घ्यावयाचीं आहेत तीं प्राप्त होणार नाहींत. याच्या उलट, जर आपण सध्यांच्या संपत्तीची नुसती फेर-वांटणी केली तर समाजांतील कांहीं वर्गांच्या सुख-स्वास्थ्यांत व्यत्यय आणूं आणि इतरांच्या भाग्यांत मात्र शहाणपणानें सुधारणा करणार नाहीं. म्हणून आपला कार्यक्रम दुहेरी असला पाहिजे. एकीकडे आपण उत्पादन वाढविलें पाहिजे, व दुसरीकडे विषमता कमी केली पाहिजे.

कार्यक्रमाच्या या दोन अंगांची एकमेकांवर क्रिया व प्रतिक्रिया होत असते. त्याचा आपण काळजीपूर्वक निर्णय केला पाहिजे; आणि कोणत्या बाजूची एकाच दिशेनें

तात्काळ वाढ झाली तर ती दुसऱ्या बाजूवर कोठवर परिणाम करील हें ठरविलें पाहिजे. सुरुवातीला आपल्याला अधिक उत्पादन केलेंच पाहिजे; कारण त्याशिवाय प्रगतीच होणार नाहीं. पण याहि प्राथमिक अवस्थेंत योजना आंखतांना विद्यमान सामाजिक व आर्थिक चौकटीमध्येंच आर्थिक हालचालींना पिटाळीत सुटलों तर तेंहि बरोबर ठरणार नाहीं. समाजांतील सर्व वर्गांना पूर्ण काम, शिक्षण, आजारीपणा व इतर आपत्तींपासून संरक्षण, आणि पुरेसें उत्पन्न हें अधिकाधिक मिळवून द्यावयाचें आहे, व त्याकरितां आजची चौकट पुनः नव्यानें बसवावयाची आहे.

सर्वच आघाडीवर एकदम प्रगति करणें हें नियोजनाचें सार आहे. समाजांत जी साधनसामग्री आहे ती मर्यादित आहे. म्हणून ज्या अत्यंत निकडीच्या गोष्टी असतील त्यांना आपल्या कार्यक्रमांत अग्रक्रम दिला पाहिजे, आणि प्रत्येक क्षेत्रांतील सामग्रीचा जास्तींत जास्त चांगला उपयोग केला पाहिजे. ज्या देशाची अर्थव्यवस्था खुजट असते त्या देशाच्या नियोजनांतील मूलभूत सामाजिक उद्दिष्टें सफल होण्याकरितां औद्योगिक व व्यापारविषयक संघटनांच्या उत्पादक पद्धति आणि सामूहिक जीवनांतील संस्थांच्या चौकटी यांत मोठ्या प्रमाणावर बदल करणें आवश्यक ठरतें. हे बदल लवकर सुरू करावे लागतात, पण ते पूर्णत्वाला जाण्याला अर्थातच कालावधि लागतो.

ज्या समाजांत नियोजन हातीं घेतलें जातें त्या समाजांत आपल्या धोरणाचें ध्येय काय याबद्दल बरीचशी एकवाक्यता असावी लागते, आणि ही मूलभूत सिद्धान्तांतील एकवाक्यता नियोजनांत व्यक्त व्हावी लागते. नियोजन-कार्य यशस्वी होण्याकरितां कांहीं गोष्टी गृहीत धराव्या लागतात. ठरलेल्या मार्गानें जाण्याकरितां सरकारच्या हातीं कार्यक्रम निश्चित करण्याची व त्या दिशेनें पाऊल टाकण्यास सांगण्याची परिणामकारक शक्ति असावी लागते. त्याचप्रमाणें शासनयंत्र हें परिणामक्षम असावें लागतें. त्यांतील कार्यकर्ते आवश्यक योग्यतेचे आणि धोरण अंमलांत आणतील अशा लायकीचे असावे लागतात.

नियोजनांतील तंत्र जें आहे त्या तंत्राचा आणि नियोजनांतील उद्दिष्टें साध्य करून घेण्याकरितां जो दृष्टिकोण समाज ठरवितो त्याचा संबंध एकमेकांशीं निगडित झालेला असतो. जो दृष्टिकोण हिंदुस्थाननें स्वीकारला आहे तो घटनेंत जीं मार्गदर्शक तत्त्वें सरकारी धोरणाचीं म्हणून सांगितलीं आहेत त्यांत स्पष्ट केला आहे. लोकशाही नियोजनांत कांहीं खास अडचणी असतात हें मान्य केलें पाहिजे. लोकशाहीच्या पद्धति गुंतागुंतीच्या असतात. निरनिराळ्या राजकीय पक्षांकडून

जे झटापटीचे हिसके तिला बसतात ते संघर्ष निर्माण करतात, व परिवर्तनाची गति मंद करतात. आणि तरीहि फक्त लोकशाहीच्या पद्धतीनें व रीतीनेंच जोमदार सृजनक्षम राजकीय जीवन शक्य असतें. लोकशाही नियोजन यशस्वी होण्याकरितां नियोजनामध्यें लोकशाहींतील सारा समाज शक्तीनें भारून टाकला जाईल अशी शक्ति लागते, आणि समाजापुढें त्याच्या सुप्त सृजनशक्तींना आव्हान दिलें जाईल असें प्रयत्नाचें ध्येय ठेवावें लागतें. त्यांतील प्रभावी घटक येथें नेतृत्व हा आहे. हें नेतृत्व फक्त वर असून भागत नाहीं, साऱ्या थराथरांत असावें लागतें.

## भांडवल-उभारणी.

उत्पादनाची आणि समाजाच्या ऐहिक सुखाची पातळी ही आपल्याजवळ असलेल्या भांडवलाच्या सांठ्यावर म्हणजेच आपल्याजवळ दर माणशीं जमीन किती, कारखाने, रेल्वे-एंजिनें, यंत्रसामग्री, पाटबंधारे, विद्युत्-उत्पादन-केंद्रें व दळण-वळणाचे मार्ग किती आहेत यावर अवलंबून असते. हे सरंजाम उभारण्याकरितां जो सामग्रीचा उपयोग करावा लागतो त्याला भांडवल-उभारणी म्हणतात. या भांडवला-वरच मुख्यतः आपल्या आर्थिक प्रगतीचा वेग आधारलेला असतो. ह्या भांडवल-उभारणीची गति वाढविण्याचे दोन मार्ग आहेत. पाहिला मार्ग म्हणजे आतांपर्यंत उप-योगांत न आणलेली सामग्री उपयोगांत आणणें, आणि दुसरा म्हणजे उपभोग्य वस्तु निर्माण करण्याकरितां लागणारी सामग्री दुसरीकडे लावणें. आपल्यासारखे जे अपुऱ्या वाढीचे देश असतात त्यांना एक फायदा असतो. त्या देशांत उपयोगांत न आण-लेली किंवा कमी उपयोगांत आणलेली मनुष्यशक्ति असते. ह्या सामग्रीचा उपयोग आपण जितक्या प्रमाणांत उत्पादनाकरितां करूं तितकी उपभोग्य वस्तूंच्या निर्मिती-करितां लागणारी शक्ति अन्यत्र कमी खेचावी लागेल. अर्थात् त्याला मर्यादा आहेत. मुख्य प्रश्न जो निर्माण होतो तो अनुपयुक्त मनुष्यशक्तीचा. हीं माणसें अगदींच अडाणी असतात. नव्या कामाकरितां त्यांचा उपयोग करण्यापूर्वी त्यांना शिक्षण द्यावें लागेल. तोंपर्यंत त्यांची अडचण राहणारच.

जे देश अलीकडे पुष्कळच विकसित झाले आहेत अशा निरनिराळ्या देशांच्या अनुभवावरून असें दिसतें कीं, त्यांतील पुष्कळ देशांचें दर माणशीं उत्पन्न एका पिढींत दुप्पट होण्यास त्यांना आपल्या राष्ट्रीय उत्पन्नांतील १२ ते १५ टक्के इतकें निव्वळ उत्पन्न भांडवल म्हणून खर्ची घालावें लागलें. अपुऱ्या वाढीच्या ज्या देशांत राहणीचें मान कमी व प्रजावाढ झपाट्यानें होते, तेथें एकूण राष्ट्रीय उत्पन्नापैकीं २० टक्के तरी भांडवल जरूरीच्या प्रमाणांत वाढ होण्याकरितां घालावें लागेल.

आर्थिक विकास करूं इच्छिणाऱ्या देशापुढें दोन मार्ग खुले असतात. पहिला मार्ग, जनतेवर कराच्या, कर्जाच्या व इतर प्रकारानें भारी प्रमाणावर बचत लादणें, आणि भांडवलाचा सांठा लवकर उभा करणें. दुसरा मार्ग म्हणजे प्राथमिक अवस्थेंत अधिक हळूहळू चालणें. पण यामुळें उत्पन्नांत होणारी वाढ कालावधीनें होते. पहिल्या पर्यायामुळें तात्रडतोब नजीकच्या काळांत जास्त हाल सोसावयास लागतील, पण त्याचा अखेरीस दीर्घकालपर्यंत फायदाच होईल. दुसऱ्या पर्यायामुळें प्राथमिक अवस्थेंत त्रास कमी होईल, पण वाढहि सावकाशच होत जाईल. तथापि प्रत्यक्ष व्यवहारांत उतरल्यावर अचूक माध्यम कोणतें तें ठरवावें लागेल.

## माणशीं उत्पन्नाची दुप्पट.

वर दिलेल्या सूचना लक्षांत ठेवून हिंदुस्थानांतील दर माणशीं उत्पन्न शक्य तितक्या लवकर नियोजनाला दुप्पट करावयाचें आहे; यांत मतभेद नाहीं. यासंबंधीं तीन गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत; – (१) लोकसंख्येच्या वाढीचें प्रमाण, (२) भांडवल-उभारणी व राष्ट्रीय उत्पन्नांतील वाढीचे संबंध, (३) राष्ट्रीय उत्पन्न जें वाढेल त्यांतील किती रक्कम भांडवल म्हणून घालतां येईल याचें प्रमाण.

गेल्या दहा वर्षांत येथील लोकसंख्या दर वर्षी १$\frac{1}{4}$ टक्क्यानें वाढली आहे. पुढील दोनतीन दशकांत हेंच प्रजावाढीचें प्रमाण कायम राहील असें समजून चालूं या. खर्ची चालावयाचें भांडवल व उत्पादन यांचे संबंध फार गुंतागुंतीचे आहेत. ते संबंध उद्योगाउद्योगांत, देशादेशांत व अवस्थाअवस्थांत निरनिराळे असतात. उदाहरणार्थ, विकासाच्या कोणत्या अवस्थेप्रत आपण पोहोंचलों आहों यावर, आणि विकासाकरितां कोणता नमुना आपण निवडला आहे यावर तें संबंध अवलंबून राहतील. ज्या योजनांना अत्यंत भारी भांडवल लागतें असे जर धंदे आपण निवडले तर त्यांत त्यापेक्षां करावयाच्या वाढीकरितां लागणारें भांडवलहि भारीच असेल. कांहीं क्षेत्रांत मोठ्या प्रमाणावर भांडवल न घालतांहि उत्पादन जलद वाढूं शकेल.औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या कांहीं देशांत राष्ट्रीय उत्पन्नांत १ टक्का वाढ करावयास राष्ट्रीय उत्पन्नाच्या ३ ते ३॥ टक्के इतकें अधिक भांडवल गेल्या कांहीं दशकांत घालावें लागलें आहे. हे संबंध न बदलणारे नाहींत, व जरूरीचे निदर्शक आहेत एवढ्यापुरताच त्याचा व्यापकतेनें अर्थ घ्यावा. हिंदुस्थानचा विचार केला तर ३ : १ हें प्रमाण योग्य ठरेल. याचा अर्थ राष्ट्रीय उत्पन्नांत एक टक्का वाढ हवी असेल तर अंदाजी तिप्पट भांडवल किंवा भांडवल-सरंजामांत तिप्पट भर घालावी लागेल. राष्ट्रीय उत्पन्नांत वाढ होण्यास

कांहीं काळ लागत असल्यामुळें आणखी आपण असेंहि धरून चाललें पाहिजे कीं एका वर्षांत जें भांडवल घातलें जाईल त्यामुळें उत्पन्न वाढण्यास दोन वर्षांनंतर सुरुवात होईल.

आपल्यापुढें तर मग असा प्रश्न निर्णयाकरितां येतो कीं, जें राष्ट्रीय उत्पन्न वाढेल त्यांतील किती प्रमाणांत उत्पन्न आपण भांडवलांत घालावें? १९५०-५१ सालीं आपलें राष्ट्रीय उत्पन्न जवळजवळ ९,००० कोटि रुपये होतें. या मर्यादेपासून आपण सुरुवात केली तर असें दाखवितां येईल कीं राष्ट्रानें वाढलेल्या उत्पन्नाच्या $\frac{2}{3}$ उत्पन्न भांडवल म्हणून राष्ट्रीय भांडवलांत परत भर म्हणून टाकलें तर दर माणशीं उत्पन्न सुमारें २२ वर्षांत दुप्पट होईल. याचा अर्थ राष्ट्रीय उत्पन्न १६० टक्क्यांनींच वाढेल. अशा प्रकारची बचत ही अर्थ-व्यवस्थेवर फार ताण पाडणारी होईल. समजा, आपण $\frac{2}{3}$ ऐवजीं $\frac{1}{4}$ च वाढलेलें उत्पन्न भांडवलांत घातलें तर राष्ट्रीय उत्पन्न हळूहळूच वाढेल.

सध्यांच्या पंचवार्षिक योजनेंत भांडवलांत होणारी वाढ ही राष्ट्रीय उत्पन्नांत होणाऱ्या वार्षिक वाढीच्या २० टक्केच धरली आहे. याचा अर्थ देशांतील साधनांशिवाय बाहेरच्या साधनांचीहि मदत भरीला घ्यावी लागेल. १९५५-५६ सालीं आपलें राष्ट्रीय उत्पन्न १०,००० कोटि रुपये होईल, म्हणजे तें ११ टक्क्यांनीं वाढेल. जर आपण १९५६-५७ नंतर वाढलेल्या राष्ट्रीय उत्पन्नापैकीं शेंकडा ५० टक्के उत्पन्न भांडवल म्हणून घालूं शकलों तर आजपासून २७ वर्षांनीं म्हणजे १९७७ सालीं आपलें माणशीं उत्पन्न दुप्पट होईल.

१९७७ सालीं दुप्पट उत्पन्न होण्याकरितां जे प्रयत्न करावे लागतील त्याची कल्पना पुढील गोष्टीवरून येईल. १९५०-५१ सालीं एकूण राष्ट्रीय उत्पन्नांतील बचतीचें प्रमाण जें ५ टक्के आहे तें १९६७-६८ सालीं २० टक्के होईल. १९५५-५६ सालीं म्हणजे या पंचवार्षिक योजनेचा परिणाम म्हणून हें बचतीचें प्रमाण ६$\frac{3}{4}$ टक्के इतकें होईल. त्यानंतर पुढें अधिकाधिक भांडवल वाढविण्याचे जर उपाय योजले तर १९६०-६१ सालीं राष्ट्रीय उत्पन्नांतील ११ टक्के भांडवल म्हणून उपयोगांत आणावे लागतील, आणि १९६७-६८ सालीं हें बचतीचें प्रमाण २० टक्के होईल. याचा अर्थ १९५५-५६ नंतर जें राष्ट्रीय उत्पन्न वाढेल त्यांतील ५० टक्के सालोसाल भांडवलाकरितां खर्चीं घालावे लागतील. एकदां बचतींनीं ही मर्यादा गांठली म्हणजे भांडवलांत निखालसपणें वाढ होत जाईल, आणि राष्ट्रीय उत्पन्नाचें प्रमाण वाढवावें लागणार नाहीं. १९५५-५६ पासून १९६७-६८ पर्यंत म्हणजे १२ वर्षांमध्यें

आपल्या साधनांची भांडवली खर्चाकरितां तिप्पट वाढ होईल, आणि त्यानंतर दहा वर्षें जर आपल्याला भांडवल वाढविण्याचें वार्षिक प्रमाण हें राष्ट्रीय उत्पन्नाच्या २० टक्के इतकें उच्च राखावयाचें असेल तर त्याकरितां अत्यंत परिश्रम व तपश्चर्या करावी लागेल.

वर दिलेले हिशेब उदाहरणादाखल आहेत. हे हिशेब बिनचूक येणें न येणें हें आपण आपल्या सामग्रीचा किती कार्यक्षमतेनें उपयोग करूं यावर अवलंबून आहे. ज्या देशांत फार मोठी उपयोगांत न आणलेली मनुष्यशक्ति ताब्यांत आहे, त्या देशांत सुरुवातीलाच त्यांतील बरेंच जरूरीचें भांडवल या साधनांतून पुढें आलें पाहिजे. कालवे खणणें, तळीं दुरुस्त व नीटनेटकीं करणें, रस्ते, पूल, बांध बांधणें, खेड्यांत घरें, स्वच्छतेची सुधारणा, प्राथमिक शिक्षण, यान्त्रिक शिक्षण वगैरेंमध्यें सर्व वर्गांना भाग घेण्यास भरपूर सवड आहे. जितक्या लवकर ही शक्ति कामाला लागेल, आणि अन्नधान्याची व इतर तूट दूर होईल, तसाच सिमेंट, विटा, लांकूड वगैरेंचा तुटवडा कमी होईल, तितक्या लवकर आपण आपलें उत्पन्न दुप्पट करण्याचें ध्येय गांठूं. त्याचप्रमाणें जर लोकसंख्येच्या वाढीला अटकाव झाला तर त्यानेंहि आपल्या उत्पन्न-वाढीला मदत होईल.

## तंत्रांत व उत्पादनांत सुधारणा.

आपल्याजवळ असलेल्या भांडवलावर जी उत्पादन-वाढ करावयाची ती वाढ आपण ज्या तज्ज्ञतेनें तान्त्रिक पद्धतीचा उपयोग करूं त्यावर अवलंबून आहे. उत्पादनांतील तंत्र हळूहळू सुधारणें ही विकासांतील जिव्हाळ्याची बाब आहे. शास्त्र व तंत्र यांत गेल्या कांहीं वर्षांत जी जलद प्रगति झाली आहे तिनें दारिद्र्याचा नाश व सामाजिक सुरक्षिततेची तजवीज याकरितां नवे नवे मार्ग दाखविले आहेत. हिंदुस्थानांत या बाबतींत सुधारणा करण्याकरितां फार मोठी शक्यता आहे. सुधारलेली शेतीपद्धत, चांगलीं बीं-बियाणें, खतें वगैरेंचा उपयोग केला तर येथें खूपच उत्पन्न वाढेल.

## रोजगार व विकास.

आपल्या नियोजनांत फार मोठा विचार रोजगारींत बरीच वाढ व्हावी व ती शक्य तितक्या लवकर व्हावी या दिशेनें केला आहे. या प्रश्नाला दोन स्वरूपें आहेत. प्रथम, रचना-कालांत जो बेकार-वर्ग आहे त्याचा जास्तींत जास्त उपयोग केला पाहिजे. ज्यांना काम द्यावयाचें त्यांना सध्यांच्या दरानें रोजमुरा द्यायचा कीं खरा अधिक रोजमुरा द्यायचा हा प्रश्न नाहीं. ही जी सर्व उपलब्ध साधनसामग्री आहे

तिचें संचलन कमींत कमी समाज-खर्चात करणें हा प्रश्न आहे. दुसरें, सर्वत्र कामगारांची उत्पादनक्षमता वाढविणें; याकरितां उपाय योजले पाहिजेत. त्यामुळेंच वाढत्या दर्जाच्या खऱ्या उत्पन्नाचें काम अधिक लोकांना मिळूं शकेल. विकासाच्या सुरुवातीला हा पूर्वी बेकार असलेला कामगारवर्ग उत्पादनांत फारशी भर घालणार नाहीं. त्यामुळें आपल्या धोरणाचा रोख पैशाच्या स्वरूपांतील या खर्चांत कमींत कमी भर कशी पडेल यावर असला पाहिजे. संपूर्ण काम मिळण्याच्या व वाढत्या खऱ्या वेतनाच्या कार्यक्रमाला जोराची चालना देशांतील भांडवल-वाढीवर अवलंबून राहील. पंचवार्षिक योजनेंत पाटबंधाऱ्यांची, विजेची, मूलभूत उद्योग-धंद्यांची वाहतूक, व इतर सेवाकार्यें यांच्या द्वारां या दिशेनें प्रगति करण्याचें अपेक्षिलेंच आहे. आपल्या अर्थ-व्यवस्थेंत काम मिळण्याची संधि जर झपाट्यानें वाढवावयाची असेल तर पुढच्या पुढच्या कालमर्यादेंत आपलें एकूण भांडवल सारखें वाढत गेलें पाहिजे. ज्या देशांत अपुरी वाढ झालेली असते, त्या देशांत बेकारी नष्ट करण्याचें कार्य हें स्वाभाविकरीत्याच दीर्घकालीन कार्य असतें. ती समस्या सतत व चिकाटीच्या प्रयत्नानेंच सुटेल. तथापि बेकारी-निवारण हा तांतडीचा प्रश्न आहे. त्या प्रश्नाकडे व्यापक सामाजिक दृष्टीनेंच पाहिलें पाहिजे. चांगल्या स्थापन झालेल्या धंद्यांतून विशेषतः जे धंदे फार मोठे कामगार लावतात, त्यांतील यंत्रसामग्री ही स्पर्धेपुढें टिकत नाहीं म्हणून टाकून दिली आहे, ती अशा प्रकारें जुळती घेतली पाहिजे कीं जीमुळें फार मोठा कामगारवर्ग बेकार होणार नाहीं. त्याचप्रमाणें नव्या नव्या व्यवसायांत जें भांडवल वांटून दिलें जाईल त्यांत अधिक कामगारवर्ग खपविला जाईल याकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे.

नियोजनाचें सार आर्थिक व सामाजिक प्रश्न सलगपणें सोडविण्याची दृष्टि ठेवणें हें आहे. आपल्यापुढील समस्या संकुचित तान्त्रिक दृष्टीनें आपल्या साधनांत वाढ करणें ही नाहीं. आपल्याला मानवी जीवनाची योग्यता वाढवावयाची आहे; आणि आपल्यापुढें जीं विशाल ध्येयें आहेत तीं साध्य करण्याकरितां संस्थेचा सांगाडा उभारावयाचा आहे. हें ध्येय गांठतांना समाजांतील सर्व वर्गांनीं श्रेष्ठ प्रतीचे हेतुपूर्वक परिश्रम केले पाहिजेत.

---

## २ : उद्दिष्टें, तंत्रें व अग्रक्रम

### हिंदी अर्थ-व्यवस्थेंतील रचनेचीं वैशिष्ट्यें.

गेल्या ४०-५० वर्षांत हिंदुस्थानांत उद्योगधंद्यांची बरीच वाढ झाली आहे, व त्याबरोबरच शहरीकरण आणि व्यापाराचा फैलाव झाला आहे. आधुनिक व्यापाराच्या, उद्योगधंद्याच्या व पैशाच्या क्षेत्रांत हिंदुस्थाननें बरीच प्रगति केली आहे. नवे नवे आर्थिक व सामाजिक संबंध निर्माण झाले, व त्यामुळेंच त्वरित प्रगति करण्याची इच्छा जन्माला आली. पण देशाच्या गरजा व वाढीची शक्यता याचा विचार केला तर आपली वाढ ही एकांगी व मर्यादित आहे. शेतकी-तंत्राची फारच थोडी प्रगति झाली आहे, आणि शेतीचें उत्पादन कमालीचें कमी आहे. जुने गृहोद्योग व लहान-सहान धंदे कुजत चालले आहेत, आणि खेड्यांत कमी कामाचा रोग हा घर करून बसला आहे. १९३० पासून व विशेषतः गेल्या दहा वर्षांत उद्योगधंद्यांची विशेष वाढ झाली असें म्हणतां येईल. वाहतूक व आधुनिक दळणवळणाचीं साधनें मोठ्या प्रमाणावर वाढलीं आहेत पण त्याचबरोबर लोकसंख्याहि झपाट्यानें वाढत आहे. माणशीं उत्पन्नाचें प्रमाण व कामधंद्यांची संधि या बाबतींत गेल्या दहा वर्षांत कांहीं उल्लेखनीय सुधारणा झाली नाहीं. उलट, उत्पन्नांतील व संपत्तींतील विषमता ही कांहीं प्रमाणांत वाढली आहे. आतां आपल्याला कांहीं हवें असेल तर आपल्या अर्थ-व्यवस्थेंत बदल. त्या बदलामुळें उत्पादनांत नैपुण्य अधिकाधिक यावें, आणि समता व न्याय मिळावा.

### बदलाची दिशा व गति.

जास्तींत जास्त उत्पादन, पूर्ण काम, आर्थिक समता, व सामाजिक न्याय हीं जरी नियोजनाचीं चार उद्दिष्टें असलीं, तरी त्या चार स्वतंत्र कल्पना नसून एकमेकांशीं निगडित झालेलीं ध्येयें आहेत. नियोजनाच्या सुरुवातीलाच आपण दिसण्यासारखी व जलद प्रगति या सर्व दिशांनीं करूं असें समजणें यथार्थ नाहीं. मर्यादित काळांत एक उद्दिष्ट व दुसरें यांत थोडाफार संघर्ष होणें शक्य आहे. म्हणून आपल्याला सावधपणें स्पष्ट

केलेल्या अग्रक्रमाच्या दिशेनें पुढें पावलें टाकलीं पाहिजेत. आपण असें समजूं या कीं, देशांतील निरुद्योगी जन-शक्तीचा उपयोग करावयाचा आहे; पण हा उपयोग करतांना राष्ट्रावर पैशाचा बोजा वाढवून चालणार नाहीं. तसेंच भांडवल-उभारणीचें. तें किती प्रमाणांत उभारावयाचें तें ठरवितांना आपल्या तात्कालिक गरजांची दीर्घकालीन होणाऱ्या फायद्याशीं तुलना करावी लागेल व मगच काय तें ठरवावें लागेल. आपण आतां जितके कष्ट सोसण्यास तयार होऊं तितकें भविष्यकाळांत आपलें राहणीचें मान वाढेल. तीच गोष्ट आर्थिक विषमता कमी करण्याच्या गतीची आहे. ही विषमता कमी झाली म्हणजे पुढच्या काळांत पुष्कळ फायदे होतील हें खरें, पण ही आर्थिक समता आणण्याकरितां करासारखे जे उपाय योजावे लागतील ते उत्पादन बिघडविणार नाहींत व पद्धतशीर वाढ धोक्यांत आणणार नाहींत याबद्दल आपण दक्षता बाळगली पाहिजे.

फार पुढें व फार वेगानें जाण्यांत धोके आहेत; पण जर वेगानें पुढें गेलों नाहीं तरीहि धोके कमी नाहींत.

## आर्थिक विकासांत सरकारचें कार्य.

आवश्यक प्रमाणावर भांडवल उभारण्यास, नव्या नव्या तंत्रांच्या उपयोगांना प्रोत्साहन देण्यास, उत्पादक शक्तींची एकूण पुनर्रचना करण्यास, आणि समाजांतील वर्गावर्गांचे संबंध ठरविण्यास सरकारला फार कसोटीचें काम करावें लागेल. त्याकरितां निर्मितीच्या साधनांचें संपूर्ण राष्ट्रीयीकरण करणें, किंवा शेतींतील, उद्योगधंद्यांतील बिन सरकारी मध्यस्थांचें उच्चाटन करणें जरूर नाहीं. पण सरकारी विभाग क्रमशः वाढवीत जाणें आणि खासगी विभागाची नियोजित अर्थ-व्यवस्थेच्या जरूरीकरितां पुनर्घटना करणें हें मात्र क्रमप्राप्त आहे.

## सरकारी व खासगी विभाग.

संघटित उद्योगधंद्यांच्या ज्या मूलभूत अवश्य गरजा असतात त्यांच्या बाबतींत व या उद्योगधंद्यांच्या वाढीकरितांहि कांहीं प्रमाणांत आजच सरकारी विभागाकडून महत्त्वाचें कार्य होत आहे. सरकारनें घालून दिलेल्या मर्यादेच्या आंत आजच खासगी उद्योगधंदे बरेचसे चालले आहेत. खासगी उद्योगधंदे व खासगी संपत्ति यासंबंधींच्या कल्पना फार जलद बदलत आहेत. आणि खासगी धंदे हे अनियंत्रित नफ्याकरितां चालूं शकतील ही कल्पना इतिहासांत जमा झाली आहे. पुनर्घटनेची क्रिया ही चालूच राहील व तिला गतीहि मिळेल, पण संक्रमण

सुव्यवस्थित व बिन भानगडीनें झालें पाहिजे. नियोजित अर्थ-व्यवस्थेंत सरकारी विभाग व खासगी विभाग यांतील फरक हे सापेक्ष महत्त्वाचे असतात. एकाच शरीराचे हे दोन विभाग आहेत व ते त्याच दृष्टीनें चालले पाहिजेत.

शेतीच्या बाबतींत ज्या आर्थिक हालचाली होतात त्या कुटुंबांतील व्यक्तींच्या साहाय्यानें एकाच व्यक्तीकडून होतात. शेती व शेतीविषयक धंदे हे खासगी विभागांत पडतात किंवा नाहींत हें ठरविणें तूर्त बाजूला ठेवलें तरी इच्छित शेती-सुधारणा ही सरकारच्या मदतीशिवाय व सरकारी उपक्रमाशिवाय होणार नाहीं. याशिवाय सरकारनें पाणी, वीज, रस्ते, वाहतूक वगैरेंसारखीं मूलभूत साधनें पुरवलीं पाहिजेत, आणि पैसे पुरवून हे शेतीचे धंदे सुरू केले पाहिजेत. सरकारनें शेतीच्या मालाला बाजार, तान्त्रिक सल्ला व इतर मदत योग्य त्या मंडळामार्फत शेतकऱ्याला दिली पाहिजे.

औद्योगिक क्षेत्राच्या बाबतींत सरकारी धोरण काय राहील याचें स्पष्टीकरण १९४८ सालच्या निवेदनांत केलें आहे. १९५१ च्या उद्योगधंद्याच्या ( वाढ व नियंत्रण ) कायद्यांत त्या धोरणाची अंमलबजावणी कशी होईल याची रूपरेषा दिली आहे. खासगी धंद्यांना विकासाच्या या व इतर क्षेत्रांत महत्त्वाचें काम आहे. त्यांनीं न्याय्यच नफा घेतला पाहिजे, व उपलब्ध साधनांचा नैपुण्यानें उपयोग केला पाहिजे. नियोजित अर्थ-व्यवस्थेंत खासगी विभागांना कामगार, भांडवल पुरवणारे, ग्राहक, यांच्यासंबंधीं कांहीं जबाबदाऱ्या घ्याव्या लागतात, आणि सचोटी व कार्य-क्षमतेचा उच्च दर्जा राखावा लागतो.

नियोजनाच्या उद्दिष्टाकरितां जी आर्थिक पुनर्घटना करावयाची, तींत सहकारी पद्धतीवरील संस्थांचा झपाट्यानें विस्तार करावा लागेल. प्राथमिक उत्पादन, गृहोद्योग व लहान प्रमाणावरील धंदे, शेत-मालाच्या विक्रीकरितां बाजार, राहण्यास घरें, व घाऊक आणि किरकोळ व्यापार वगैरे बाबतींत सहकार्याला फार मोठी जागा आहे. या बाबतींत सहकारी पद्धतीला अग्रक्रम दिला पाहिजे.

## संस्थांत बदल.

नियोजन-कालांत जो संस्थांत बदल करावयाचा तो दोन उद्दिष्टें पुढें ठेवून करावा. पहिला उद्देश, नियोजनांत निर्दिष्ट केलेलीं सामाजिक ध्येयें गांठण्याकरितां शक्य ती प्रगति करणें; व दुसरा, पुढें झपाट्यानें करावी लागणारी प्रगति अशक्य करतील असे संघटनेंतील दोष काढून टाकणें.

जमिनीची मालकी व व्यवस्था यांत मोठे बदल करणें अवश्य आहे. कारण त्यामुळेंच शेतकऱ्याला आपली सर्व शक्ति शेतीवर खर्च करण्यास उत्तेजन मिळेल. जमीनदारी नष्ट केल्यामुळें देशाचा पुष्कळसा विभाग जुन्या सरंजामी पद्धतींतून मुक्त झाला आहे. उरलेल्या ठिकाणची जमीनधारा-पद्धति लवकर बदलली पाहिजे. जमिनींतील मध्यस्थापासून, सावकारापासून व व्यापाऱ्यापासून शेतकऱ्याला वांचवून बरीच प्रगति करण्यांत आली आहे; पण अजून त्याला उत्पादनाकरितां कर्ज मिळण्याची, तसेंच बीं-बियाणें व खतें मिळण्याची बरीच व्यवस्था व्हावयाची आहे.

औद्योगिक दृष्टया पुढारलेल्या कांहीं देशांत उद्योगधंद्यांतील व व्यापारांतील नफा हा भांडवल-उभारणीकरितां चांगला उपयोगांत आणला गेला आहे. कांहीं विशिष्ट ऐतिहासिक कारणांनीं या गोष्टी तेथें घडल्या, पण येथें आज ती परिस्थिति नाहीं. खासगी संस्थांच्या हातांत नफा सांठावा व त्याचा उपयोग भांडवल-उभारणीकरितां करावा ही परिस्थिति आपल्या इतर उद्दिष्टांच्या दृष्टीनें योग्य नाहीं.

नियोजनाच्या पद्धतींत वांटणीच्या प्रकाराकडे जास्त लक्ष द्यावें लागतें. अपुऱ्या वाढीच्या देशांत जवळचें भांडवल उत्पादनाऐवजीं व्यापाराकडे खर्चीं लावण्याची प्रवृत्ति अधिक असते. सट्टयाच्या व्यापारांत इतर कोणत्याहि व्यापारापेक्षां अधिक पैसा मिळतो. वांटणी-पद्धतीवर नियंत्रण ठेवलें तर त्यामुळें मोक्याच्या जागीं सरकारी विभाग सुदृढ होणें शक्य आहे. कांहीं निवडक वस्तूंच्या बाबतींत घाऊक व्यापार सरकारनें करणें हें नियोजनांतील बलवान् साधन असतें. त्यामुळें वांटणींतील व्यापारांत राहणारी शिल्लक सरकारकडे घेतां येते, आणि वस्तूंच्या विक्रीचे व उत्पादनाचे दर नियंत्रित करतां येतात. त्यांत कांहीं राज्यकारभाराच्या अडचणी येतील; पण ज्या दिशेनें आपण जाणार आहों ती सरळ आहे, आणि या नियोजन-कालांत आपल्याला त्याची सुरुवात करावयाची आहे.

विकास पावणाऱ्या नियोजनांतील उद्दिष्ट, उत्पादनांत व आर्थिक हालचालींच्या बाबतींत सारखी वाढ करण्याचें असतें. कांहीं काळपर्यंत ह्या वाढीकरितां पैशाचा पुरवठा वाढवावा लागेल; कारण अर्थ-व्यवहारांत बऱ्याच विस्तृत घडामोडी होत जातील. शेतीविषयक उद्योगधंदे आणि विशेषतः ग्रामोद्योग व लहान प्रमाणावरील धंदे यांना लागणारें भांडवल पुरविण्याकरितां पतपेढ्या वाढल्या पाहिजेत. अशा संस्थांच्या द्वारां चालू उत्पन्नांतील शिलकांची अधिक बचत होऊं शकेल, आणि पैसा सांठविण्या-ऐवजीं त्याचा उत्पादनाकरितां उपयोग करण्याची संवय लागेल.

हिंदुस्थानची मुख्य बँक ही राष्ट्रीय आहे, हा नियोजनाला मोठाच फायदा आहे. रिझर्व्ह बँकेला इतर बँकांच्या कर्ज देण्याच्या धोरणावर नियंत्रण ठेवण्याची व देखरेख करण्याची व्यापक सत्ता आहे. रिझर्व्ह बँक व खासगी बँका यांच्यांतील दाट सलोख्यामुळें बँकांची पद्धति नियोजनाच्या बाबतींत कार्यान्वित करण्यास फार उपयुक्त ठरणार आहे.

खासगी नफ्यांना नेहमींचें उत्तेजन मिळेल व त्यामुळें बँकांची वाढ होईल, याला काळ लागेल. ज्यांना बँकांत ठेवी ठेवण्याची संवय नाहीं, त्यांना लागणाऱ्या रकमांकरितां अशा बँकांवर सर्वस्वीं अवलंबून राहणें कालहरणाचें ठरेल. नियोजनांत ज्या योजनांना अग्रक्रम दिला आहे त्यांच्या उत्पादनांना लागणारें कर्ज खात्रीनें मिळूं शकेल अशाबद्दल खास प्रयत्न केले पाहिजेत. बँका, विमा, रोखे-बाजार व इतर भांडवलाशीं संबंधित असणाऱ्या संस्था वगैरे सर्व आर्थिक संस्थांची विकास-योजनेंत नीटनेटकी मांडणी केली पाहिजे.

## सामग्रीची वांटणी व दराचें धोरण.

नियोजित अर्थ-व्यवस्थेंत जी आपल्याजवळ साधनसामग्री असेल तिचें पूर्ण संचालन व वांटणी करावी, आणि मोठ्यांत मोठें फळ पदरीं पाडून घ्यावें हें ध्येय असतें. हें ध्येय पुष्कळांशीं दर ठरविण्याच्या धोरणावर अवलंबून असतें. आपलें लक्ष्य सापेक्ष दराची रचना कायम टिकविण्याचें असावें. त्यामुळें नियोजनांत जें प्रातव्य निर्दिष्ट केलें आहे त्याच्याशीं सुसंगत अशी सामग्रीची विभागणी करतां येईल. त्याकरितां आर्थिक व भौतिक नियंत्रणें अपरिहार्य आहेत. नियोजनाच्या सुरुवातीसुरुवातीला पैशाचें उत्पन्न हें निर्मितीपेक्षां अधिक वाढतें, आणि त्यामुळें वस्तूंच्या किंमती वाढतात व अर्थ-व्यवस्था अस्थिर होते. द्रव्य व पतीच्या धोरणांचा हीं संकटें टाळण्याकरितां उपयोग केला पाहिजे.

नियोजित विकास होण्यास दुसरें प्रभावी साधन म्हणजे करविषयक धोरण. सध्यां एकूण राष्ट्रीय उत्पन्नापैकीं सरकारला भांडवल म्हणून उपयोगीं पडेल अशी सापेक्षतः फारच थोडी रकम मिळते; पण कांहीं काळ ती वाढवावी लागेल. एकूण खर्चीं घालावयाचें भांडवल जर वाढवावयाचें असेल तर राहणीच्या दर्जांत वाढ करण्याचें पुढें ढकललें पाहिजे. आजच्या स्थितींत ज्या वर्गाचें उच्चतर उत्पन्न आहे त्यांचा उपयोग्य वस्तूंचा खर्च कापतां येईल; पण कमी उत्पन्न असणाऱ्यांना 'कंबरा कसा' सांगणें कठीण आहे. सामान्य माणसाला विकासाकरितां कांहीं द्रव्य द्यावें लागेल हें खरें, पण सधन-वर्गाला आपल्या शक्तीच्या प्रमाणांत आपला हिस्सा द्यावा लागेल.

## विषमता कमी करणें.

उत्पन्न व संपत्तींतील विषमता अर्थातच हटवावी लागेल. कांहीं देशांत असलेल्या या विषमतेमुळें त्यांच्या विकासाच्या सुरुवातीच्या काळांत त्यांना भांडवल उभारणीकरितां तिचा उपयोग झाला. नियोजित अर्थ-व्यवस्थेंत ह्या विषमतेला सबळ कारणें नाहींत. उत्पन्न व संपत्ति यांच्यांत समता आणावयास वारसा-कर महत्त्वाचा घटक आहे. जर आपण आपलें तात्कालिक ध्येय उत्पन्न व संपत्तींतील विषमता काढून टाकण्याचें ठरविलें तर कांहीं काळपर्यंत अत्याचारानें अर्थव्यवस्थेंत जेथवर उलथापालथ होते तेथवर वारसा-कर तें कार्य करील. जर उत्पन्नावरील कर हे चढते असतील, आणि नियंत्रणाचें तंत्र कायम राहील, तर फाजील नफा घेण्याचें टळेल व कर-व्यवस्थेंत वारसा-करानें घातलेली भर ही विषमता कमी करण्यास उपयोगीं पडेल.

## नियंत्रणें.

साधनसामग्रीची इच्छित विभागणी व्हावी, किंमतीचें प्रमाण खालीं खालीं राहावें, आणि समाजांतील निरनिराळया थरांतील वर्गांत मालाची देवघेव योग्य रीतीनें व्हावी म्हणून नियंत्रण-पद्धत जरूर आहे. कांहीं परिस्थितींत चढते भाव टिकविणें जरूर पडेल. दुसऱ्या परिस्थितींत कांहीं भाव कमींत कमी ठेवणेंहि जरूरीचें होईल. त्याचा उद्देश कांहीं प्रकारच्या आर्थिक व्यवहारांत वाजवी नफा निश्चित केला जाईल. नियंत्रणामुळें कांहीं वर्गांच्या स्वतंत्र कृतीला मर्यादा पडतील; पण जर नियंत्रणाचा वापर नीट रीतीनें झाला तर समाजांतील निरनिराळया वर्गांचे हक्क समतोल राहतील.

## अग्रक्रमाचा आराखडा.

एका विशिष्ट काळांत अग्रक्रमाचा आराखडा जो नियोजन-कालांत अनुसरावयाचा, त्याला तात्कालिक गरजांचा विचार आणि आर्थिक व्यवस्थेंत करावयाचे दीर्घकालीन बदल यांची इष्टता लक्षांत घेतली पाहिजे.

पहिल्या पांच वर्षांत पाट-बंधाऱ्यांसह शेतकी व विद्युत्-शक्ति यांना अग्रतमस्थान आहे. अन्नधान्याच्या व उद्योगधंद्यांना लागणाऱ्या कच्च्या मालाच्या उत्पादनांत चांगली वाढ झाल्याशिवाय उद्योगधंद्यांच्या वाढीला चढणारा जोम टिकणार नाहीं. अर्थ-व्यवस्थेची मजबुती तळाला करावयास पाहिजे; आणि शेतीच्या क्षेत्रांत मोठी शिल्लक निर्माण करून ती इतर विभागांत वाढती रोजंदारी टिकविण्याकडे वळविली पाहिजे.

सध्यांच्या पांच वर्षांच्या काळांत पाटबंधारे, वीज व वाहतूक यांच्याकरितां सरकारचें बहुतेक भांडवल खर्ची पडेल. त्यामुळें औद्योगिक क्षेत्रांत करावयाची प्रगति ही खासगी प्रयत्नांवरच अवलंबून राहील. सरकारवर पोलाद, लोखंड, भारी रासायनिक द्रव्यें, विद्युत्-सामग्री वगैरे मुख्य मुख्य धंदे काढण्याची खास जबाबदारी आहे. त्याशिवाय आधुनिक जगांत विकाससातत्य शक्य होणार नाहीं. त्याची सुरुवात याहि अवस्थेंत केली पाहिजे.

---

## ३ : साधनांची मोजदाद्

साधनांची मोजदाद करतांना तीन प्रश्नांचा सामान्यतः विचार करावा लागेल. ( १ ) मध्यवर्ती व राज्य-सरकार यांच्या विकास-योजनांना निधीचा पुरवठा, (२)या मुदतींत देशांत एकूण उपलब्ध होणारें व विकासाकरितां गुंतवितां येणारें भांडवल, आणि खासगी व सरकारी विभागांत एकूण भांडवल घालण्याचा असणारा कार्यक्रम यांत समतोलपणा, ( ३ ) समान निधि शक्य तितका मोठा करण्याचे उपाय अशाकरितां योजणें कीं, त्यांतून खासगी व सरकारी विभागांना पैसे काढतां यावेत.

### ( १ ) सरकारी विभागाकरितां पैसा.

या नियोजनाकरितां मध्यवर्ती व राज्य-सरकारांना जें भांडवल लागेल तें सरकारी बचतीपासून ७३८ कोटि रुपये उपलब्ध होईल. सरकारी बचत ही सरकारकडून चालू कराच्या जमेंतून बिन विकासाचा खर्च वजा जातां राहणारी आणि रेल्वेसारख्या सरकारी धंद्यांतून राहणारी बचत होय. कर्जाच्या, लहान बचत-योजनांच्या, ठेवी व निधि यांच्या द्वारां जी खासगी बचत होईल, व जी सरकारला उपयोगांत आणतां येईल अशी ५२० कोटि धरली आहे. अशा प्रकारें या दोन मार्गांनीं एकंदर नियोजनाच्या २,०६९ कोटि रुपयांपैकीं १,२५८ कोटि रुपये मिळतील. पुढील कोष्टकांत त्याची फोड केली आहे.

| | आरंभ-वर्ष १९५०–५१ | | | नियोजन-काल १९५१–५६ | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | मध्यवर्ती क राज्यासह | अ व ब राज्यें जम्मू काश्मीरसह | एकूण | मध्यवर्ती क राज्या सह | अ व ब राज्यें जम्मू काश्मीरसह | एकूण |
| सरकारी बचतः— | | | | | | |
| (अ) चालू वसूल | ७१ | ५१ | १२२ | १६० | ४०८* | ५६८ |
| (ब) रेल्वे | २३ | ... | २३ | १७० | ... | १७० |
| खासगी बचती द्वारां:- | | | | | | |
| (अ) लोकांकडून कर्जें | –११ | ८ | –३ | ३६† | ७९ | ११५ |
| (ब) लहान बचती व अनफंडेड कर्ज | ४२ | ... | ४२ | २७० | ... | २७० |
| (क) डिपॉझिट्स्, फंड्स् व इतर | | ३८ | ३८$ | ९० | ४५ | १३५ |
| एकूण | १२५ | ९७ | २२२ | ७२६ | ५३२ | १२५८ |

नेहमींच्या अर्थ-संकल्पाच्या येथें धरलेल्या १,२५८ कोटि रुपयांशिवाय, आन्तरराष्ट्रीय बँक, अमेरिका, कानडा, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड वगैरे देशांकडून १५६ कोटींची हातीं आलेली रक्कम कर्ज म्हणून घेतां येईल. अजूनहि ६५५ कोटींची उणीव राहतेच. ही उणीव आणखी बाहेरून कर्जें आणून किंवा तीं न मिळाल्यास कराचे अधिक उपाय योजून, उसने पैसे घेऊन, आणि तुटीचें अंदाजपत्रक तयार करून भरून काढतां येईल.

विकासाच्या सुरुवातीला बाहेरील मदत ही महत्त्वाची बाब आहे. तीमुळें कुचंबणा दूर होईल, आणि दूरगामी परिणाम ज्यामुळें होतील असे अडथळे काढून टाकतां येतील. तथापि ज्या स्थितींत आपला देश आहे त्या स्थितींत आपल्याला सापेक्षतः नेमस्तपणाच्या लक्ष्याचे कार्यक्रम बाहेरून मिळणाऱ्या भांडवलावर अवलंबून राहून

* यांत काश्मीर–जम्मूचे ३ कोटि धरले आहेत.

† औद्योगिक कामगारांच्या प्रॉव्हिडंट फंडाचे पैसे सरकारी कर्जरोख्यांत गुंतविले जाणारे; हें लक्षांत घेऊन त्या कामगारांच्या घराकारितां ३८·५ कोटि रुपये धरले आहेत.

$ यांतील १६ कोटि रुपये सांठा कमी करून सरकारतर्फे केल्या गेलेल्या व्यापाराचे आहेत. राज्यांत जमलेला कांहीं पैसा यावयाचा आहे. तो मध्यवर्तीकडे येण्यास उशीर लागतो.

आंखतां येणार नाहींत. जर बाहेरील जरूरीइतकें भांडवल मिळालें नाहीं तर नियोजनांतील कांठावर असलेल्या कांहीं गोष्टी जुळवून घेतां येतील. तथापि २,०६९ कोटि रुपयांच्या भांडवलाचें नियोजन आपल्याला उद्दिष्ट म्हणून पुढें ठेवलेंच पाहिजे; कारण त्यामुळेंच आपण भविष्यांतील अधिक जलद विकासाचा पाया घालणार आहों.

तुटीच्या अर्थ-संकल्पामुळें अर्थ-व्यवस्थेंत आधिक क्रय-शक्ति टोचणें अंतर्भूत होतें; त्याचमुळें भाववाढीची शक्यता आहे. नियोजन-कालांत आपल्याला आपल्या पौंडी शिलकेपैकीं २९० कोटि काढतां येतील. ही शिल्लक मध्यवर्तीची किंवा राज्यांची नाहीं. गेल्या महायुद्धांत जी बचत आपल्यावर लादली ती ही शिल्लक आहे. ती रिझर्व्ह बॅंकेकडे आहे. बाहेर देशांतली ही राखीव शिल्लक आहे, व तिचा उपयोग येथील चलनाला स्थैर्याकरितां होतो. पुढील पांच वर्षांत या शिलकेपैकीं जितके पैसे आपण उपयोगांत आणूं तितके पैसे देशांत जे सध्यां वापरण्याकरितां व भांडवलाकरितां पैसे लागतात त्यांत आधिक भर म्हणून होतील. म्हणून जर जनतेची जितकी क्रय-शक्ति आहे तितकीच रक्कम मध्यवर्ती व राज्य-सरकारनीं तुटीच्या अंदाजपत्रकाद्वारां घातली, तर नक्त फुगवट्याचीं दडपणें एकंदरीनें निर्माण होणार नाहींत. पौंडी शिलकेंतील रक्कम पुढील पांच वर्षांत जर २९० कोटि उपलब्ध झाली तर तुटीच्या अंदाजपत्रकांतील सुरक्षित रक्कम शक्य तोंवर तितकीच असावी.

तुटीच्या अंदाजपत्रकाच्या शक्यतेचा विचार एका ठराविक काळीं जो करावयाचा तो राहणीचा निर्देशांक काय आहे या दृष्टीनें मुख्यतः करायचा असतो. जर हा निर्देशांक उच्च असेल तर अर्थ-व्यवस्थेंत अधिक क्रय-शक्तीचें टोचलेलें औषध हें प्राथमिक जरूरीच्या वस्तूंची गरज अधिक वाढवील आणि जीवनाच्या वस्तूंच्या किंमती आधिकच चढवील. या दृष्टीनें विचार करतां तुटीच्या अंदाजपत्रकाचा निकट संबंध जरूरीच्या वस्तूंचे भाव प्रत्यक्षपणें नियंत्रित करण्याशीं आहे हें लक्षांत ठेवणें आवश्यक आहे. जेव्हां तुटीचें अंदाजपत्रक जरूरीच्या वस्तूंचे भाव वाढवितें, तेव्हां तें परिणामीं अत्यंत विषम अशा कराच्या स्वरूपाचें होतें. म्हणून जेव्हां अधिक तुटीचें अंदाजपत्रक करावयाचें असेल तेव्हां कराचे व बचतीचे सर्व रस्ते धुंडून झाले आहेत कीं नाहींत हें तपासावें आणि नंतरच विकास-योजनेकरितां लागणारा खर्च तुटीच्या अंदाजपत्रकानें भागवावा.

एकदां सरकारी विभागानें आर्थिक विकासाच्या मार्गदर्शनाची जबाबदारी स्वतःवर घेतली व स्वतःचा मोठा तद्विषयक कार्यक्रम सुरू केला म्हणजे त्यांच्याजवळ विकासाचीं सर्व साधनें असणें जरूर आहे. सरकारी शिल्लक रकमा याच भांडवलाचा

खरा झरा आहेत. या शिलका वाढविण्याकरितां कर हें मोठें साधन आहे. हिंदुस्थानच्या एकंदर राष्ट्रीय उत्पन्नापैकीं कराचें उत्पन्न फक्त ७ टक्केच आहे. सध्यांची जी कराची पद्धति आहे तीमुळें फक्त एका लहानशा जनतेवरच हा कराचा बोजा पडतो असें सांगितलें जातें. याचा अर्थ बहुसंख्य जनता दरिद्री आहे असें सिद्ध होतें. तथापि जसजसें राष्ट्रीय उत्पन्न वाढेल तसतसे अधिक कर देण्याची जनतेची शक्तीहि वाढेल. जर विकास द्रुतगतीनें करावयाचा असेल तर त्याचें मुख्य तत्त्व असें आहे कीं, समाजांतील अगदीं गरीब वर्गाच्या जीवन-दर्जांत वाढ करण्याच्या जरूरीबरोबरच जें अधिक उत्पन्न वाढविलें जाईल, तें पुनः त्याहिपेक्षां अधिक उत्पन्न वाढविण्याकरितां विकास-योजनेंत भांडवल म्हणून घातलें गेलें पाहिजे. या प्रक्रियेंत करावर अवलंबून राहावें लागतें. कराच्या नव्या मार्गाचा व अधिक कर बसविण्याचा प्रश्न जरी बाजूला ठेवला, तरी आज खरोखर ज्यांच्यावर कर बसविला आहे ते तरी तो कर देतात कीं नाहीं हें पाहणें हा कारभाराच्या व्यवस्थेच्या दृष्टीनें जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. चालू कर चुकविणारे पुष्कळच आहेत. शासनपद्धति भक्कम करणें हाच त्यावर उपाय.

१९५१ च्या एप्रिलपासून हें नियोजन सुरू झालें. त्या वेळेपासून मध्यवर्ती सरकारनें आपली चालू जमा वाढविण्याचे पुष्कळ उपाय योजले. प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कराचे अधिक मार्ग सतत चोखाळले गेले पाहिजेत. राज्याकडून ५३२ कोटि रुपये उभे केले जाण्यास त्यांनाहि अधिक कर बसवावे लागतील. मध्यवर्ती व राज्य-सरकारांची एकूण वसुली नियोजन-काळअखेर, सध्यांच्या अंदाजाप्रमाणें १९५०-५१ पेक्षां ७० ते ८० कोटींनीं वाढेल. जर निर्यात-करासारखी अनपेक्षित जमा वाढली तर ही वसुली १०० कोटि होईल. या अंदाजांत सध्यांच्या कराच्या दराप्रमाणें होणारी अपेक्षित वाढ, तसेंच जमिनीवरील कर, पाटाच्या पाण्याचे अधिक दर, वारसा-कर, चांगली जमीन सुधारणा-वसुली, अधिक निर्दोष कर-वसुली-व्यवस्था, विक्री-कराची व्यापकता, चैनीच्या वस्तूंवर अधिक कर वगैरेंचें वाढलेलें उत्पन्न धरलें आहे. या सर्व करांपासून येणारें उत्पन्न, नियोजन-कालाच्या शेवटीं वाढणाऱ्या राष्ट्रीय उत्पन्नाच्या शेंकडा ७ टक्केच कायम ठेवील. यावरून ही महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, आपल्या कर-वसुली धोरणाची व कर-वसुलीच्या शासन-यंत्राची नवी घडण अधिक क्षेत्र व्यापण्याकरितां केली न गेल्यास, नवीन उत्पन्नांपैकीं कराचें प्रमाण घटण्याकडे प्रवृत्ति वाढत जाईल, आणि विकास-योजनांच्या भांडवला-करितां लागणाऱ्या पैशाच्या बोजाची विभागणी जास्त जास्त अयोग्य होईल.

कर-वसुलीची पातळी वाढविण्याकरितां योजण्यांत येणाऱ्या उपायाबरोबरच जनतेकडून काढावयाच्या कर्जांची व्याप्ति व पद्धतीहि सुधारली पाहिजे. नियोजन-कालांत मध्यवर्ती व राज्य-सरकारना कर्जें, लहान बचती, व तरतें कर्ज ( ट्रेझरी बिल्स सोडून ) यांपासून ३८५ कोटि रुपये उभारावयाचे आहेत. त्यांतील २५० कोटि रुपये लहान बचतीपासून येणार आहेत. नुकतेंच असें ठरलें आहे कीं, सध्यां जे लहान बचतीपासून ४४½ कोटि रुपये जमा होतात, त्यापेक्षां जास्त रक्कम जर राज्यांनीं आपल्या प्रयत्नांनीं जमवली तर वाढलेली जमा राज्यांनीं आपल्याकडे मध्यवर्तींचें कर्ज म्हणून ठेवावी.

देशांतील १,२५८ कोटि भांडवलापैकीं, मध्यवर्तीवर ७२६ कोटींची व उरलेल्या ५३२ कोटींची राज्यावर जबाबदारी आहे. याचा मध्यवर्ती सरकारपुरता अर्थ असा कीं, त्यांनीं पांच वर्षांपैकीं जी मुदत बाकी आहे त्यांत आपली आधिक वसुली २६ कोटि रुपये दर वर्षी कायम टिकविली पाहिजे. राज्यांनीं पांच वर्षांच्या काळांत ५३२ कोटि रुपयांची जादा वसुली केली पाहिजे.

नियोजन-कालांत मध्यवर्तीकडून राज्यांकडे निरनिराळ्या बाबींकरितां आर्थिक मदत जात राहील.कायद्याप्रमाणें राज्यांना मिळणारी मध्यवर्तींची मदत बाजूला ठेवली तरी नद्यांच्या धरण-योजना, लहान पाटबंधारे, निर्वासितांची पुनःस्थापना, ग्रामोद्योग व लहान प्रमाणावरील धंदे, आणि इतर विकास-योजनांना मध्यवर्तीकडून राज्यांना कर्जें मिळतील. त्याचप्रमाणें रस्ते बांधण्याकरितां मध्यवर्ती रस्त्यांच्या निधींतून मदत मिळेल. तशीच मदत निर्वासितांची आपत्ति दूर करण्याकरितां व अन्नधान्य वाढविण्याकरितां मिळेल. कामाच्या दृष्टीनें मदत दिलीं जाणारीं वर दाखविलेलीं कामें हीं विकास-योजनेंत मध्यवर्तींच्या कामाचा भाग म्हणून दाखविलीं आहेत. अशा प्रकारें ( ‘क’ राज्यें वगळून ) ह्या मदतीचा अंदाज राज्यांच्या योजनेकरितां १९३ कोटि रुपये होतो. पण ही बाजू मांडण्याचा प्रकार झाला. तथापि राज्यांना सरकारी विकास-कार्यक्रमांत मिळणारा वांटा, त्याचप्रमाणें मध्यवर्तीकडून राज्याकडे अपरिहार्य म्हणून पाठविण्यांत यावयाच्या बाबींचें प्रमाण ह्या दोन्ही गोष्टी दिसतात त्यापेक्षां फार मोठ्या प्रमाणावर होतील.

१९५१–५२ सालच्या राज्यांच्या योजनांचें व १९५२–५३ च्या अंदाजपत्रकांचें जर प्राथमिक निरीक्षण केलें तर योजना अंमलांत आणावयास लागणाऱ्या भांडवलाची जुळवाजुळव करावयास एकूण त्यांच्याकडून अद्याप सुरुवातच व्हावयाची आहे असें दिसतें. गेल्या दोन वर्षांत राज्यांचे वसूल वाढत आहेत, पण राज्यांचे

योजनांव्यतिरिक्त होणारे खर्चच हे वाढलेले वसूल खाऊन टाकीत आहेत. त्याचप्रमाणें नियोजनांत नसलेल्या जादा योजनाहि नियोजनांतील योजनांच्याबरोबरच हातीं घेण्याकडे प्रवृत्ति दिसून येते. हें शक्य आहे कीं, कांहीं राज्यांत राज्यकारभाराचा दर्जा वाढविण्याकरितां आणि विकासाचा पाया घालण्याची तयारी करण्याकरितां जी राज्यकारभाराच्या यंत्राची वाढ अगर सुधारणा करावयाची त्याकरितां बिनविकास-क्षेत्रांत खर्चाची कांहीं वाढ करावी लागणार आहे. राज्याच्या निधींचा अंदाज करणें, व त्याच्या विकास-योजना तपासणें हें यानंतर केलें जाईल. त्याचबरोबर फिनॅन्स कमिटीच्या शिफारशीहि लक्षांत घेतल्या जातील. राज्यांना मध्यवर्तीकडून मिळणाऱ्या जादा मदतींचें क्षेत्र मर्यादित आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. मध्यवर्तीच्या पैशावर पडणाऱ्या दडपणाचा विचार केला म्हणजे त्यांना फिनॅन्स-कमिशनच्या शिफारशींच्या अनुरोधानें स्वतःच्या मदत-योजनांची फेर-आंखणी करावी लागेल.

## सरकारी व खासगी विभागांचें भांडवल.

मध्यवर्ती राज्य-सरकारच्या योजनांकरितां उपलब्ध होणाऱ्या पैशाचा विचार करतांना खासगी विभागांना किती पैसा लागेल व त्यांच्या गरजा काय हेंहि ध्यानांत ठेवलें पाहिजे. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, खाजगी व सरकारी विभागांचा निधि एकच आहे. त्यांतूनच दोघांना पैसे काढावयाचे आहेत. त्यामुळें प्रश्न जो आहे तो सरकारी विभागाकरितांच भांडवल शोधावयाचें नसून हा समान निधि जो आहे त्याची व्याप्ति जास्त वाढविण्याबद्दल आहे,—आणि ही जी एकूण व्याप्ति वाढेल ती संमत अशा अग्र-योजनांकरितां दोन्ही विभागांमध्यें ठराविक प्रमाणांत वांटून द्यावयाचा आहे.

हिंदुस्थानच्या एकूण उत्पन्नाचा अंदाज काढण्यास भरपूर माहिती नाहीं. तथापि नियोजन-अहवालांतील अंदाजाप्रमाणें आपलें १९५०–५१ चें राष्ट्रीय उत्पन्न ९,००० कोटि रुपये होतें व जनतेच्या उपभोग्य वस्तूंच्या जरूरीचा खर्च ९५टक्के होता. याचा अर्थ दरसाल शिलकी भांडवलाची मर्यादा ४५० कोटींची होती. विकासयोजनांमुळें जें उत्पन्न वाढेल तें १९५५–५६ मध्यें १०,००० कोटि अपेक्षित आहे; आणि या प्रक्रियेंत राष्ट्राची अधिक रकमा भांडवलाकरितां टाकण्याची शक्ति वाढत जाईल. हें खरें कीं, राष्ट्रीय उत्पन्नांत जी वाढ होईल त्यांतील निम्म्याहून अधिक पैसा दरम्यान वाढणाऱ्या जनसंख्येच्या गरजांकडून शोषिला जाईल. म्हणून भांडवल उभारणीमध्यें जी काय भर आपण घालूं, ती राहणीचा दर्जा वाढविण्याकरितां आपण अधिक उत्पादन जें करणार आहों त्यांतून उरणाऱ्या रकमेपेक्षां कमीच होईल.

भांडवल-उभारणीची आवश्यकता तथापि निकडीची आहे; आणि अशी अपेक्षा आहे कीं, १९५०-५१ च्या ४५० कोटि भांडवलावरून १९५५-५६ सालीं हें भांडवल ६७५ कोटि रुपयांवर जाईल. हें जें ५० टक्के वाढीचें प्रमाण भांडवल-उभारणीकरितां आपण धरलें आहे तें येथें विचार केलेल्या गोष्टींच्या दृष्टीनें फार भयंकर आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं.

जर राष्ट्रीय उत्पादन १,००० कोटींनीं वाढलें, आणि त्या वाढलेल्या उत्पन्नापैकीं आधिक प्रमाणांत भांडवलांत पैसे घातले गेले, तर २,७०० ते २,८०० कोटि रुपयांचा भांडवली खर्च या पांच वर्षांत आपल्या देशांतील पैशांतूनच भागविला जाईल. हिंदुस्थानच्या पौंडी शिलकीपैकीं २९० कोटींची भर आपल्या भांडवलांत पडेल. हिंदुस्थानला बाहेरील मदत १५६ कोटि आजपर्यंत मिळाली आहे. अशा प्रकारें एकूण विसंबून राहतां येईल असें भांडवल ३,१५०ते३,२५० कोटि रुपयांचें होईल.

सरकारी विभागांत विकासाकरितां जो भांडवली खर्च धरला आहे तो १,६००-१,७०० कोटि होईल. बाकीचा सुमारें ४०० कोटि रुपये खर्च शेतकी-वाढ-कामें, आरोग्य, शिक्षण, ग्राम-विकास-योजना वगैरेंकरितां सालोसालचा खर्च आहे. यावरून सरकारी विभागांतला भांडवली खर्च एकूण भांडवलापैकीं ५० टक्के जिरवून टाकील. सामान्यतः राष्ट्राचे भांडवली खर्चापैकीं निम्मे पैसे सरकारी विभागांत खर्च होणें हें जबरदस्त प्रमाणावर आहे असें मानलें गेलें असतें. पण हिंदुस्थानांत पाटबंधारे, वीज व वाहतूक वगैरेंकडे खासगी संस्थांचें आकर्षण होत नाहीं, म्हणून हा खर्च अर्थ व्यवस्थेच्या वाढीकरितां अपरिहार्य आहे.

तुटीच्या अर्थ-संकल्पाच्या विस्ताराचा विचार करतांना असें नमूद केलें आहे कीं, तो जरूरीच्या वस्तूंच्या प्राप्तीशीं अगदीं निगडित आहे. अन्नाची दुर्मिळता हा विशेष महत्त्वाचा घटक आहे, व तो विकास-खर्च मर्यादित करतो. जर विकास-खर्च जरूरीच्या वस्तूंचा पुरवठा व वांटणी यांत सुधारणा काय होते हें न पाहतां वाढविला तर अर्थ-व्यवस्थेंत निरनिराळीं दडपणें उद्भवतील. विशेषतः आयातीचें दडपण वाढेल, आणि देशामध्यें ज्या वस्तु अधिक होतात त्या अन्यथा निर्यात करण्याऐवजीं घरींच वापरून टाकण्याची प्रवृत्ति वाढेल. ह्या दोन्ही गोष्टींचा राष्ट्राच्या 'बॅलन्स ऑफ पेमेंट्स्' (आयात-निर्यातींतील अंतर) वर परिणाम होईल. त्यामुळें एकूण परराष्ट्रीय हुंडणावळीचाहि विचार करणें क्रमप्राप्त आहे.

सरकारी विभागाच्या विकास-कार्यक्रमाकरितां पुढील पांच वर्षांत आयातहि कमीच लागेल. सुमारें ४०० कोटि ती असेल. नियोजनांतील निरनिराळ्या क्षेत्रांत

जें अपेक्षित आधिक उत्पादन होईल त्यामुळें देशाच्या आयात गरजा कमी होतील, व निर्यात करण्यालायक वस्तु वाढतील. आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, आयात वस्तूंच्या गरजा आणि अतिरिक्त उत्पादनांची निर्यात यांचा आपल्याकडून उपयोगांत आणल्या जाणाऱ्या वस्तूंच्या मर्यादांशीं तसेंच देशांत घालाव्या लागणाऱ्या भांडवलाशीं संबंध असतो; आणि त्यांचें अंतिम प्रमाण जितकें जास्त तितका परराष्ट्रीय हुंडणावळीवर बोजा वाढण्याचा कल अधिक. परराष्ट्रीय हुंडणावळीची परिस्थितिसुद्धां व्यापाराच्या परिस्थितीप्रमाणें बदलण्याकडे प्रवृत्त असते. १९५०–५१ सालीं जी व्यापाराची अनुकूल परिस्थिति होती तीच जर कायम राहिली, आणि आपला सरकारी विकास-कार्यक्रम हा १,७००कोटींतच मर्यादित राहिला, तर १९५५–५६ सालीं आपली परराष्ट्रीय हुंडणावळीची परिस्थिति समाधानकारक राहील. पण ह्या दोन्ही गोष्टी गृहीत धरणें खरें नाहीं. सरकारी विभागाची अंतिम मर्यादा २,०६९ कोटि रुपये आहे, आणि व्यापाराची परिस्थिति ( आज ती फारच बिघडली आहे ) फ़ार तर १९४८–४९ इतकीच राहील.

या सर्व गोष्टींचा विचार करून आणि १९४८–४९ च्या व्यापाराची परिस्थिति गृहीत धरून दर वर्षी परराष्ट्रीय व्यापारी देण्याची तूट १८० ते २०० कोटि रुपयेपर्यंत येईल, व ती येणें आवश्यकहि आहे. शिलकी देण्यापैकीं ( बॅलन्स ऑफ पेमेंट ) ५० कोटींची तूट दर वर्षी पौंडी शिलकींतून भरून काढतां येईल; यापेक्षां जर तूट आधिक आली तर मात्र बाहेरील मदतीशिवाय भागणार नाहीं. जर बाहेरील मदत जरूरीइतकी मिळाली नाहीं, आणि शिलकी देण्याच्या अडचणी वाढत गेल्या, तर देशांतील कांहीं निर्यात करण्याजोग्या वस्तूंची उपलब्धी कमी करावी लागेल, आणि अशा प्रकारें मुक्त झालेल्या रकमा आपले परदेशी हिशेब समतोल करण्याकरितां खर्च कराव्या लागतील. पण यामुळें अर्थ-व्यवस्थेंत बिघाड होईल;आणि वापरण्यांत येणाऱ्या वस्तूंचें जें अंतिम आपण ठरविलें आहे तें गांठतां येणार नाहीं. बाहेरची मदत मिळाली तर हा बिघाड होणार नाहीं, आणि देशांतील अर्थ-व्यवस्थेचें स्थैर्य कांहीं प्रमाणांत राखतां येईल. या सर्व गोष्टींचा एकंदर विचार करतां परराष्ट्रीय मदत आपल्या नियोजनाच्या बाबतींत पुढील कार्य करूं शकेल. विकास-क्रमांत ज्या वस्तूंची अधिक मागणी निर्माण होईल, व ज्यांचा आपल्या देशांत मर्यादित पुरवठा आहे त्या वस्तूंची देशांतील खऱ्या द्रव्य-साधनांत भर घालणें हें तें कार्य होय.

## अधिक द्रव्य-साधनांना चालना.

व्यापकपणें बोलावयाचें म्हणजे आधिक द्रव्य-साधनांना चालना देण्याला दोन

बाजू आहेत. एक भौतिक, व दुसरी आर्थिक. भौतिक बाजूचा चालनेकरितां उपयोग करावयाचा म्हणजे ज्या मनुष्यशक्तीला अपुरें काम आहे, तिचा विकास-कार्यात उपयोग करणें. पूर्वी सांगितल्याप्रमाणें, संपूर्ण काम देण्याच्या मार्गांत मुख्य अडचण जी आहे ती अन्नधान्यासारख्या प्राथमिक वस्तूंच्या तुटवड्याची आहे. नियोजनांतील शेतकीच्या कार्यक्रमांत, लवकर लवकर पूर्णत्वाला पोहोंचतील अशा बाबींत खर्च करण्यावर भर दिला आहे.

त्यानंतर जें अधिक धान्य तयार होईल त्याचा उपयोग संपूर्ण मनुष्यबळाचा उपयोग करण्याआड जी ही अडचण आहे ती दूर करण्याकडे केला जाईल. या नियोजनांत असेंहि दृष्टीसमोर ठेवलें आहे कीं, ज्या ज्या ठिकाणीं शक्य होईल तेथें पैशाचा विनियोग, कमी उपयोगांत आणलेली मनुष्यशक्ति व इतर साधनें यांना आकर्षित व संघटित करण्याकडे केला जाईल. ग्राम-विकास-योजना हें एक त्याचें उदाहरण आहे.

या नियोजनांत जेथें योजनांकरितां स्थानिक प्रयत्न होत असतील तेथें स्थानिक स्वराज्य-संस्थांना मदत करण्याचीहि तरतूद केली आहे. लहान पाटबंधारे हें एक दुसरें क्षेत्र असें आहे कीं, ज्यांत स्थानिक मनुष्यशक्तीला जर चालना मिळाली तर ती शक्ति किंमती कमी करण्याला पुष्कळच मदत करूं शकेल. विकासाला लागणारें भांडवल कमी करण्याकरितां वेतनाचा कांहीं हिस्सा सेव्हिंग्ज सर्टिफिकेटच्या स्वरूपांत देण्याचा प्रकारहि चांगल्या प्रकारें धुंडाळतां येईल.

अनुपयुक्त मनुष्यशक्तीचा पूर्ण उपयोग करण्याच्या या प्रयत्नाबरोबरच नियोजनामागें असलेली द्रव्याची फळी मजबूत करावी लागेल. जर सरकारी विभागाला विकासामध्यें अधिकाधिक महत्त्वाची कामगिरी करावयाची असेल तर त्याला जरूरीची अट आहे. अर्थ-पद्धतींत असे घटनात्मक बदल केले पाहिजेत कीं, ज्यामुळें सरकारी अधिकाऱ्यांना अवश्य तो द्रव्यनिधि मिळूं शकेल. कराचें क्षेत्र वाढवावें व शासन-पद्धति सुधारावी हें मागें सांगितलेंच आहे. कर्ज उभारण्याच्या बाबतींतसुद्धां तान्त्रिक प्रकारांत सुधारणा करण्यास वाव आहे. जो देश दीर्घ मुदतीचा विकास-कार्यक्रम हातीं घेत आहे, त्या देशांत कर्जाचीं तंत्रें अशा रीतीनें उपयोगांत आणावींत कीं ज्यामुळें लोकांना कोणत्या मोठ्या कार्याकरितां कर्जें काढलीं जात आहेत हें पटेल. या तंत्राचा उपयोग अशाकरितांहि करावा कीं, लोकांना निरनिराळ्या विकास-योजनांच्या कार्यांत कर्ज देण्यांत आपलेपणा वाटावा. याकरितां त्यांना जास्तींत जास्त अवसर देण्यांत यावा. लहान बचत-योजनेच्या चळवळीनें अलीकडे जी प्रगति केली आहे तीवरून

असें सूचित होतें कीं, जर समाजांतील निरनिराळ्या वर्गांच्या पसंतीला पडतील अशी सोईस्कर व्यवस्था केली, आणि देशाच्या अत्यंत दूर असलेल्या भागापासून पैसे जमा करण्याची पद्धत जर आंखली तर कमी उत्पन्न असलेल्या वर्गांकडून जी बचत होईल ती आपल्या विकास-योजनेकरितां लागणाऱ्या भांडवलाचें चांगलें साधन होईल. विकास-योजनेंत आपला न्याय्य वांटा उचलावा म्हणून विमा-पद्धतीचेंसुद्धां संघटन झालें पाहिजे. इतर उपायांचा विचार केला जाईलच; पण सध्यां पोस्ट ऑफिसचा जो विमा-निधि आहे तो या क्षेत्रांत उतरण्यास आजहि आधिक क्रियावान् करतां येईल. प्रॉव्हिडंट फंडाची संस्था ही अशी दुसरी संस्था आहे कीं, जिचा उपयोग मोठ्या प्रमाणावर बचत करण्यास चालना व उत्तेजन देईल. अलीकडे सहा मोठ्या उद्योग-धंद्यांतील कामगारांचा समावेश तींत केला आहे. या पद्धतीवर जर संघटनेंत बदल केले तर त्याचा उपयोग विकासाच्या सुरुवातीच्या काळांत भांडवल जमविण्याचें एक बलिष्ठ साधन म्हणून होईलच, पण पुढील अवस्थांतसुद्धां आधिक स्वावलंबी होण्यास त्याची मदत होईल.

---

## ४ : पंचवार्षिक नियोजनाची रूपरेषा

१९५१–५६ च्या काळांत सरकारला २,०६९ कोटि रुपये नियोजनांतील विकासाकरितां भांडवल म्हणून लागेल. ही खर्चाची मर्यादा पुढील कारणांवरून ठरवली.—

( १ ) पुढील काळांत जो फार मोठा प्रयत्न करावा लागेल त्याचा पाया म्हणून विकासाची पद्धति सुरू करण्याची आवश्यकता आहे. ( २ ) विकासाकरितां एकूण उपलब्ध होणारें द्रव्यसाधन. ( ३ ) सरकारी व खासगी विभागांकरितां द्रव्य-साधनांची लागणारी जरूरी व विकासाची गति यांचा निकट संबंध. (४) मध्यवर्ती व राज्य-सरकारनें ज्या योजना नियोजनापूर्वी पूर्वी हातीं घेतल्या त्या पुऱ्या करण्याची जरूरी. ( ५ ) युद्ध व फाळणीमुळें अर्थ-व्यवस्थेंत जो घोटाळा झाला आहे तो दुरुस्त करण्याची जरूरी.

## अग्रक्रम व भांडवलाच्या खर्चाचें स्वरूप.

सरकारी विभागांतील खर्चाचें वांटप पुढीलप्रमाणें—

| | रु. कोटि | शेंकडा |
|---|---|---|
| १. शेती व समाज-विकास | ३६१ | १७.५ |
| २. पाटबंधारे | १६८ | ८.१ |
| ३. विविधकार्यी पाटबंधारे व वीज-योजना | २६६ | १२.९ |
| ४. वीज | १२७ | ६.१ |
| ५. वाहतूक व दळणवळण | ४९७ | २४.० |
| ६. उद्योगधंदे | १७३ | ८.४ |
| ७. समाजसेवा-कार्यें | ३४० | १६.४ |
| ८. पुनर्वसाहत | ८५ | ४.१ |
| ९. इतर | ५२ | २.५ |
| | २,०६९ | १००.० |

वरील विभागणींत अग्रक्रमांचें स्वरूप दिसून येईल. सध्यांच्या नियोजनांत शेतीला प्राधान्य असल्यामुळें लहानमोठ्या पाट-बंधाऱ्यांच्या योजनांची अपरिहार्यता सिद्ध होते. विद्युत्-शक्ति-उत्पादन हें बहुतेक मोठ्या पाटांच्या योजनांशीं संलग्न असल्यामुळें त्यालाहि उचित असें प्राधान्य प्राप्त झालें आहे. विद्युत्-शक्तीचें उत्पादन व तिचें मोठ्या प्रमाणावर विस्तृत विभाजन हें लहान धंद्यांनाच नव्हे तर विशाल अर्थानें ग्रामीण विकासाला आणि उद्योग-वाढीला आवश्यक आहे. सरकारवर वाहतुकीची खास जबाबदारी आहे. रेल्वे ह्या राष्ट्रीय आहेत; त्यांना शेती व उद्योगधंदे यांच्या वाढीच्या गरजा पुरवाव्या लागतात. याशिवाय सरकारला सर्व देश खेड्यांशीं जोडण्याकरितां रस्त्यांचें जाळें विणावें लागतें; त्याचबरोबर जहाजें व विमानें यांची वाढ करावी लागते.

शेतीला ( पाट-बंधारे धरून ) विजेला व वाहतुकीला जो अत्युच्च अग्रक्रम दिला आहे त्यामुळें सरकारतर्फें उद्योगधंदे सुरू करण्याचा योजनावरील खर्च मर्यादित होतो. या पांच वर्षांतली औद्योगिक वाढ ही खासगी प्रयत्नावर व पैशावर अवलंबून राहणार असली तरी सरकारी विभागांतून व परराष्ट्रीय भांडवलापासून कांहीं कांहीं ठिकाणीं त्याला पुरवणी मदत दिली जाईल. अशा प्रकारें सरकारी व खासगी प्रयत्नांनीं औद्योगिक कार्यक्रम पुष्कळच होतील. सामाजिक सेवा-कार्यांची देशांत इतकी प्रचंड जरूरी आहे कीं, सरकारतर्फें घातलें जाणारें भांडवल मर्यादितच वाटणार. या

कामांत सरकारतर्फे खर्च होणाऱ्या भांडवलांत जनतेनें आपल्या प्रत्यक्ष प्रयत्नांनीं निरक्षरता नष्ट करणें, स्वच्छता व आरोग्य सुधारणें, तसेंच प्राथमिक यान्त्रिक शिक्षण देणें वगैरेसारख्या गोष्टींनीं भर घातली पाहिजे. समाज-विकास-योजनांच्या कार्यक्रमाकरितां व स्थानिक कार्यांकरितां एक ठोक रक्कम नियोजनांत धरली आहे. त्या साहाय्यामुळें जनतेकडून कार्याचा उठाव होईल अशी उमेद आहे.

खालीं ढोबळ दिलेल्या विभागणीवरून २,०६९ कोटि रुपयांचें भांडवल खासगी व सरकारी विभागांतील उत्पादक सामग्रींत व समाजाच्या उत्पादक-शक्तींत किती भर घालील हें दिसून येईल.

| | कोटि रुपये |
|---|---|
| (१) भांडवल जें मध्यवर्ती व राज्य-सरकारच्या मालकीच्या उत्पादक भांडवलांत भर घालील तें - - - - - | १,१९९ |
| (२) भांडवल जें खासगी विभागांत उत्पादक भांडवल उभारण्यास मदत करील तें:— | |
| (अ) शेती व ग्राम-विकास ( समाज-विकास-योजना व दुर्भिक्ष्यग्रस्त क्षेत्रें सोडून ) - - - - - - | २४४ |
| (ब) वाहतूक व उद्योगांना कर्जें - - - - - - | ४७ |
| (क) समाज-विकास-योजना व स्थानिक कार्यें - - - - | १०५ |
| (३) सामाजिक कार्यें भांडवल - - - - - - - - - | ४२५ |
| (४) वर न आलेलें ( दुर्भिक्ष्यग्रस्त क्षेत्रांना मदत धरून ) - - | ४९ |
| | २,०६९ |

वरील कोष्टकावरून असें दिसून येईल कीं, एकंदर नियोजित भांडवलापैकीं ६० टक्के उत्पादक भांडवल निर्माण करील. पाट, वीज, वाहतूक-दळणवळण व उद्योग-धंदे हे या भांडवलापासून निर्माण होतील, व ते सरकारी मालकीचे होतील. उरलेल्या ४० टक्के भांडवलापैकीं कांहीं खासगी विभागाच्या उत्पादक साधनाकरितां, कांहीं चालू खर्चाकरितां लागणाऱ्या भांडवलाला मदत म्हणून, किंवा सल्ला देणाऱ्या व राज्यकारभारांतील नोकऱ्यांकरितां, कांहीं सामाजिक सेवा-कार्य वाढवण्याकरितां व टिकवण्याकरितां, आणि कांहीं विकासाकरितां जनतेकडून केल्या जाणाऱ्या प्रयत्नांना उत्तेजन म्हणून खर्च होईल.

## वांटणी व खर्चाचें स्वरूप.

एकंदर भांडवलापैकीं मध्यवर्ती व राज्यें यांच्यांत कशी वांटणी होईल हें खालीं दिलें आहे.

| | कोटि रुपये |
|---|---|
| मध्यवर्ती सरकार ( रेल्वे धरून ) :— | १,२४१ |
| राज्यें:—भाग 'अ' | ६१० |
| भाग 'ब' | १७३ |
| भाग 'क' | ३२ |
| जम्मू व काश्मीर | १३ |
| | २,०६९ |

वरील वर्गीकरणावरून मध्यवर्ती सरकारचें रेल्वेसह भांडवल एकूण भांडवलाच्या ६० टक्के होतें. हें आग्रहपूर्वक प्रतिपादन केलें पाहिजे कीं, ही जी भांडवलाची वांटणी केली आहे ती मध्यवर्ती व राज्यें यांच्या क्षेत्रांत पडणाऱ्या योजनांची निदर्शक नाहीं. मध्यवर्तीच्या विविध-कार्यी नद्यांच्या योजना ( उदाहरणार्थ दामोदर, भक्रा, नानगल, हिराकुड व हरिके) या खरोखर राज्य-सरकारच्या योजना आहेत; पण कांहीं योजना दोन किंवा तीन राज्यांत पसरल्या असल्यामुळें कोणत्या राज्यावर किती कर्ज आकारावयाचें हें आतां सांगणें कठीण आहे. या योजनांकरितां राज्यांना जें कर्ज द्यावयाचें तें मिळवून देण्याची आरंभींची जबाबदारी मध्यवर्तीवरच पडते. दुसऱ्या योजनांबाबत आर्थिक जबाबदारी कोणीं किती घ्यावयाची ह्याचा अखेरचा निर्णय व्हावयाचा आहे. या व अशाच अन्य कारणांकरितां या नियोजनांतील पुढील योजना जरी त्या मुख्यतः राज्याच्या योजना असल्या तरी त्या मध्यवर्तीच्या विकास-योजना म्हणून दाखविल्या आहेत. त्या योजना पुढीलप्रमाणें:—समाज-विकास योजना; लहान पाट व इतर स्थानिक योजना; पांच मोठ्या धरणाच्या व विजेच्या योजना; दुर्भिक्ष्यग्रस्त विभाग, निर्वासितांचें पुनर्वसन; मूलोद्योग व सामाजिक शिक्षण; औद्योगिक कामगारांकरितां घरें बांधणें वगैरे.

खालील कोष्टकांत मध्यवर्ती व राज्यें यांच्यामार्फत होणाऱ्या भांडवली खर्चाचे आंकडे दिले आहेत. त्यांत जम्मू काश्मीर सोडला आहे.

( कोटि रुपये )

| | मध्यवर्ती | 'अ' वर्ग | 'ब' वर्ग | 'क' वर्ग |
|---|---|---|---|---|
| शेती व समाज-विकास | १८६·३ | १२७·३ | ३७·६ | ८·७ |
| पाट व वीज | २६५·९ | २०६·१ | ८१·५ | ३·५ |
| वाहतूक व दळणवळण | ४०९·५ | ५६·५ | १७·४ | ८·८ |
| उद्योग - - | १४६·७ | १७·९ | ७·१ | ·५ |
| सामाजिक सेवा व पुनर्वसन | १९१·४ | १९२·३ | २८·९ | १०·४ |
| किरकोळ - - | ४०·७ | १०·० | ·७ | ... |
| | १,२४०·५ | ६१०·१ | १७३·२ | ३१·९ |

## राज्यांचें नियोजन.

राज्यातर्फे व्हावयाच्या विकासाच्या कार्यक्रमाला लागणारें संयोजित भांडवल—

| 'अ' वर्गीय राज्यें | | 'ब' वर्गीय | | 'क' वर्गीय | |
|---|---|---|---|---|---|
| आसाम | १७·४९ | हैद्राबाद | ४१·५५ | अजमीर | १·५७ |
| बिहार | ५७·२९ | मध्यभारत | २२·४२ | भोपाळ | ३·९० |
| मुंबई | १४६·४४ | म्हैसूर | ३६·६० | बिलासपूर | ·५७ |
| मध्यप्रदेश | ४३·०८ | पेप्सु | ८·१४ | कुर्ग | ·७३ |
| मद्रास | १४०·८४ | राजस्थान | १६·८२ | दिल्ली | ७·४८ |
| ओरिसा | १७·८४ | सौराष्ट्र | २०·४१ | हिमाचल | ४·५५ |
| पंजाब | २०·२१ | त्रावणकोर | २७·३२ | कच्छ | ३·०५ |
| उत्तरप्रदेश | ९७·८३ | | | मणिपूर | १·५५ |
| पश्चिमबंगाल | ६९·१० | कोचीन | | त्रिपुरा | २·०७ |
| | | | | विंध्य | ६·३९ |
| | ६१०·१२ | | १७३·२६ | | ३१·८६ |

ह्या राज्यांच्या योजना एक वर्षापूर्वी प्रथम त्या त्या राज्यांच्या सल्ल्यानें आंखल्या गेल्या. त्या आंखतांना त्यांची पांच वर्षांत वसुली व खर्च किती येईल याचा अंदाज करण्यांत आला. ज्या राज्यांनीं मागाहून आपल्या योजना वाढाव्या म्हणून सूचना केल्या त्या वाढीच्या योजना तात्पुरत्या स्वीकारण्यांत आल्या आहेत. वाढीच्या योजनांना लागणारा पैसा जीं तीं राज्यें पुरवूं शकलीं तरच त्यांचा अखेर स्वीकार होईल.

खालील कोष्टकांत नियोजनाचा आर्थिक आधार दाखविला आहे—

(कोटि रुपये)

| | मध्यवर्ती | जम्मू काश्मीर-सह सर्व राज्यें | एकूण |
|---|---|---|---|
| विकासावर नियोजित भांडवल | १,२४१ | ८२८ | २,०६९ |
| अंदाजपत्रकांतील पैसा | | | |
| (१) चालू वसूल शिल्लक | ३३० | ४०८ | ७३८ |
| (२) भांडवली जमा (शिलकींतून काढावयाचे पैसे सोडून) | ३९६ | १२४ | ५२० |
| (३) सरकार-सरकारांत नियोजन-विषयक अदलाबदल (मध्यवर्ती मदत) | -२२९* | २२९* | ... |
| | ४९७ | ७६१ | १,२५८ |
| बाहेरील मिळालेली मदत | १५६ | ... | १५६ |
| एकूण ... | ६५३ | ७६१ | १,४१४ |

नियोजनाच्या द्रव्यबलाचा अंदाज करतांना ६५५ कोटि रुपयांची तूट पडेल असें मागें सांगितलें आहे. ती तूट बाहेरील मदत, देशांतील कर, शक्य तितकी उसनवारी, आणि तुटीचें अंदाजपत्रक या मार्गांनीं भरून काढावी लागेल.

पुष्कळशा राज्यांनीं सुरुवातीला विकास-खर्चाचा अनुक्रम सूचित करतांना पहिल्या दोन वर्षांतच भांडवलावर अत्यंत जोर दिला होता. कांहीं बाबतींत हें अपरिहार्य होतें. ज्या योजना सुरू होत्या त्यांचें उच्च टोंक गांठलें गेल्यामुळें खर्चाकरितां धांवपळ होत होती. १९५१-५२ च्या दुरुस्त अंदाजपत्रकाप्रमाणें आणि १९५२-५३ च्या अंदाजाप्रमाणें असें दिसतें कीं, पहिल्या दोन वर्षांत जी खर्चाची गर्दी मुळांत धरल्याप्रमाणें होणार होती ती पुष्कळशी दुरुस्त केली गेली आहे. तथापि १९५३-५४ सालीं ज्या योजना हातीं घेतल्या गेल्या आहेत त्या कळसाला पोहोंचतील, आणि त्या वेळीं मध्यवर्ती व राज्यें यांच्यावर खर्चाचें भारी दडपण पडेल. या वर्षांत ज्या नव्या योजना सुरू न केल्यास भागेल त्या हातीं घेऊं नयेत. आजच्या अंदाजाप्रमाणें ज्या नव्या योजना एकदां सुरू केल्या म्हणजे खर्च आवरणार नाहीं त्या सुरू करण्याला १९५४-५५ सालीं व १९५५-५६ मध्यें अवसर सांपडेल.

* यांत ४ कोटि अनुसूचित जातींकरतां धरले आहेत. ते आसाममधील आदिवासींकरतां असून त्यांच्या विकास-योजनांना मदत म्हणून उपलब्ध होतील.

नियोजनाच्या परिणामाचें परिगणन करतांना फक्त सरकारी विभागांतील विकास-कार्यक्रम घेऊन भागणार नाहीं. अर्थव्यवस्थेच्या एकंदर गरजा विचारांत घेऊन त्यांच्या पायावर हा कार्यक्रम उभारला आहे; आणि त्याचा अंदाज खासगी विभागांतून होणाऱ्या संभाव्य प्रयत्नाशीं निगडित आहे. शेतीच्यापुरतें बोलावयाचें म्हणजे शेतीचा प्रश्न हा पाटपाणी, खतें, चांगलीं बीं-बियाणें, त्याचप्रमाणें शेतकऱ्या-पर्यंत जाऊन भिडणारी यान्त्रिक पद्धतीची सुधारणा, ह्यांची व्यवस्था करण्याचा प्रश्न आहे; पण त्याला पुरवणी-मदत लागेल ती पुष्कळ प्रमाणांत स्वतः शेतकऱ्यांकडून केल्या जाणाऱ्या शरीर-श्रमाची. औद्योगिक विकासाच्या बाबतींत आपण ४० मोठ्या व मध्यम प्रमाणावरील चालू असलेल्या योजनांचाच विचार केला आहे. हे उद्योगधंदे आपल्या देशांत निघूं शकणाऱ्या एकूण कारखान्यांच्या $\frac{२}{३}$ इतके आहेत.

शेती व माल तयार करणाऱ्या उद्योगधंद्यांपुरतेंच म्हणावयाचें म्हणजे, आपल्या नियोजनाचें मूल्यमापन या व्यापक भूमिकेवरून केलें पाहिजे. विकासाच्या अन्य क्षेत्रांत विशेषतः व्यवसाय व सेवा-साधनें आणि लहान प्रमाणावरील वाहतूक व उद्योग यांच्या बाबतींत सध्यांच्या परिस्थितींत फक्त ठोकळ अंदाज सांगतां येतील. शिक्षणप्रसार, स्वच्छता, दळणवळण यांचें भवितव्य जनतेच्या प्रयत्नावर अवलंबून असल्यामुळें त्यांचा आतांच नक्की अंदाज करतां येणार नाहीं. पुढील परिच्छेदांत खासगी व सरकारी विभागांतील विकास-कार्यक्रमाचे महत्त्वाचे मुद्दे मांडले आहेत. पण कांहीं निवडक कार्यक्रमांची अंतिम मर्यादा व निर्देशांक यांचे परिणाम खालील कोष्टकांत दिले आहेत.

| | १९५१-५२ | १९५५-५६ |
|---|---|---|
| १. शेती. * | | |
| अन्नधान्यें ( दशलक्ष ) - - - - | ५२·७ | ६१·६ |
| कापूस ( लाख गांठी ) - - - - | २९·७ | ४२·२ |
| ताग ( लाख गांठी ) - - - - | ३३·० | ५३·९ |
| ऊंस ( दशलक्ष टन ) - - - - | ५·६ | ६·३ |
| तेल-बिया ( दशलक्ष टन ) - - - | ५·१ | ५·५ |
| २. पाटपाणी व विद्युत्‌शक्ति. | | |
| मोठाले पाट ( दशलक्ष एकर ) - - | ५·० | ८·५ |
| लहान ,, ,, ,, - - | | ११·२ |
| विद्युत्-शक्ति ( दशलक्ष किलोवॅट्स् ) - | २·३ | ३·५ |

* यांत हरभरे व कडधान्यें धरलीं आहेत. १९४९-५० चें उत्पादन ५४ दशलक्ष टन होतें. त्याच आधारावर १९५५-५६ चें कमाल उत्पन्न अंदाजिलें आहे.

| | १९५०-५१ | १९५५-५६ |
|---|---|---|
| ३. उद्योगधंदे. | | |
| लोखंड व पोलाद ( लाख टन) | | |
| अशुद्ध लोह-भट्टयांना मिळणारें | ३.५ | ६.६ |
| तयार पोलाद | ९.८ | १३.७ |
| सिमेंट ( लाख टन ) | २६.९ | ४८.० |
| अल्युमिनियम ( हजार टन ) | ३.७ | १२.० |
| खतें ( हजार टन ) | | |
| ॲमोनियम सल्फेट | ४६.३ | ४५०.० |
| सुपरफॉस्फेट्स् | ५५.१ | १८०.० |
| रेल्वे एंजिनें ( संख्या ) | | १७०.० |
| लहान यांत्रिक हत्यारें ( हजार ) | १.१ | ४.६ |
| पेट्रोल ( दशलक्ष गॅलन ) | ... | ४०३.० |
| बिटयुमेन ( हजार टन ) | ... | ३७.५ |
| गिरणींचें सूत ( दशलक्ष पौंड ) | १,१७९.० | १६४०.० |
| गिरणी-कापड ( दशलक्ष वार ) | ३,७१८.० | ४७००.० |
| हातमाग-कापड ( दशलक्ष वार ) | ८१०.० | १७००.० |
| तागाचें कापड वगैरे ( हजार टन ) | ८९२.० | १२००.० |
| शेतीचीं यंत्रें:— | | |
| (अ) यंत्रावर चालणारे पंप्स ( हजार ) | ३४.३ | ८५.० |
| (ब) डिझेल एंजिनें ( हजार ) | ५.५ | ५०.० |
| बायसिकल्स ( हजार ) | १०१.० | ५३०.० |
| पॉवर अल्कोहोल ( दशलक्ष गॅलन्स ) | ४.७ | १८.० |
| ४. वाहतूक. | | |
| जहाजें ( टन ):— | | |
| किनाऱ्यावरील ( जीआरटी हजार ) | २११.० | ३१५.० |
| अफाट समुद्रावरील ( जीआरटी हजार ) | १७३.५ | २८३.० |
| रस्ते:— | | |
| राष्ट्रीय रस्ते ( हजार मैल ) | ११.९ | १२.५ |
| प्रान्तिक रस्ते ( हजार मैल ) | १७.६ | २०.६ |

| | १९५०–५१ | १९५५–५६ |
|---|---|---|
| **५. शिक्षण. ***** | | |
| विद्यार्थी प्राथमिक शाळा ( लाख ) - - | १५१·१ | १८७·९ |
| ज्यूनियर बेसिक शाळा ( लाख ) - - | २९·० | ५२·८ |
| दुय्यम शाळा ( लाख ) - - - | ४३·९ | ५७·८ |
| औद्योगिक शाळा ( हजार ) - - - | १४·८ | २१·८ |
| इतर धंदे व व्यवसाय-शाळा ( हजार ) - | २६·७ | ४३·६ |
| **६. आरोग्य.** | | |
| इस्पितळें ( खाटा हजार ) - - - | १०६·५ | ११७·२ |
| दवाखाने ( संख्या ) शहरांतील - | १,३५८·० | १,६१५·० |
| दवाखाने ( संख्या ) खेड्यांतील - | ५,२२९·० | ५८४०·० |
| **७. विकास-संस्था.** | | |
| पंचायती ( हजार ) - - - - - - | ५५·१ | ६९·१ |
| सहकारी सोसायट्या, पतपेढ्या (हजार)× - | ८७·८ | ११२·५ |
| विक्री व बाजार ( हजार ) - - - | १४·७ | २०·७ |
| विविध कार्यांच्या ( हजार ) - - - | ३१·५ | ४०·५ |
| लिफ्ट इरिगेशन ( संख्या ) - - - | १९२·० | ५१४·० |
| सहकारी-शेती ( संख्या ) - - - | ३५२·० | ९७५·० |
| इतर ( हजार ) - - - - - - | २७·३ | ३५·८ |
| एकूण ( हजार ) ... | १६१·९ | २११·१ |

## उत्पन्न व रोजगारीच्या दृष्टीनें योजनांची पाहणी.

समाजाच्या सुख-स्वास्थ्यांत सुधारणा किती झाली यावरच सरतेशेवटीं विकास-कार्यक्रमाचा निर्णय दिला जातो. त्या सुख-स्वास्थ्याचीं नेहमींचीं गमकें म्हणजे उत्पन्न, वस्तूंचा उपभोग ( Consumption ), व नोकऱ्या या तीनहि बाबतींत आज असलेले आंकडे अपुरे आहेत. राष्ट्रीय उत्पन्नाचे आंकडेसुद्धां बाल्यावस्थेंत आहेत.

---

* या अंदाजांत हैद्राबाद, राजस्थान, अजमीर व विंध्य यांमधील अंदाज ( औद्योगिक शाळा सोडून ) नाहीं. कांहीं बाबतींत थोड्या राज्यांचा ( उत्तरप्रदेश प्राथमिक शाळा, मध्यप्रदेश ज्यूनिअर बेसिक व दुय्यम शाळा ) अंदाज यांत नाहीं.

× यांत पंजाब, ओरिसा, हैद्राबाद, पेप्सू व ‘ क ’ वर्ग नाहीं.

राष्ट्रीय उत्पन्नाची विभागणी कशी होते व राष्ट्रांत संपत्ति किती याची अगदींच थोडी माहिती आहे. खानेसुमारीवरून जें सर्वसाधारण चित्र दिसतें त्यापेक्षां व्यवसायांच्या नमुन्यांच्या बाबतींत तुटपुंजी माहिती आहे.

१९५०–५१ सालचें राष्ट्रीय उत्पन्न ठोकळ मानानें ९,००० कोटि रुपये अंदाजलें आहे. नियोजनाच्या शेवटीं उत्पादनांत जी अपेक्षित वाढ होईल तीवरून (किंमती कायम धरून) एकूण उत्पन्न १०,००० कोटि रुपये म्हणजे ११ टक्के वाढेल. या काळांत विकास-योजनांत जें भांडवल घातलें जाईल त्याचे फायदे पूर्णपणें दिसणार नाहींत. उदाहरणार्थ, पाट-पाण्याच्या च विजेच्या योजनांचे परिणाम हे पुढील पांच वर्षांत दिसतील; पण त्यांच्याकरितां लागणारा कांहीं खर्च मात्र या पांच वर्षांत करावा लागेल.

जनतेंतील उपक्रमशीलता व द्रव्यबल उत्तेजित करण्याकरितां ज्या समाज-विकास-योजना व इतर योजना आंखल्या आहेत, त्या हे प्रयत्न जितके वाढवूं शकतील तितक्या प्रमाणांत राष्ट्रीय उत्पन्न वाढेल. कांहीं ठराविक विभागांत मनुष्य-शक्तीचा व द्रव्याचा प्रत्यक्ष वापर आणि उत्पादन वाढविण्याचे एकवटून केलेले प्रयत्न यांमुळें हें उत्पन्न २५ टक्के अगर जास्त वाढूं शकेल.

दर वर्षी राष्ट्रीय उत्पन्नांत जी दोन टक्के वाढ होईल त्यांतील $\frac{१}{५}$ उत्पन्न हें परत दर वर्षी नियोजनांत ठरविलेला विकास-कार्यक्रम कायम ठेवण्याकरितां घातलें पाहिजे. त्यामुळें राष्ट्रीय उत्पन्न ज्या प्रमाणांत वाढेल त्या प्रमाणांत वस्तूंच्या उपभोगाचा एकूण खर्च वाढणार नाहीं, तो कमी प्रमाणांतच वाढेल. जरी या काळांत नियोजना-कडून जनतेच्या अन्नवस्त्रासारख्या अत्यंत तांतडीच्या गरजा भागवल्या जातील, तरी देशांतल्या उत्पादन-क्षमतेंत महत्त्वाची भर या काळांत नियोजनाकडून घातली जाईल.

नियोजनाचा रोजगार-धंदा मिळण्यावर काय परिणाम होईल याचा विचार करण्यापूर्वी आपल्या देशाचा प्रश्न बिनरोजगारीचा नसून कमी रोजगारीचा आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कमी रोजगारी हा कमी उत्पादनाचा एक पैलू आहे; तें कमी उत्पादन भांडवली साहित्याच्या व तान्त्रिक कलेच्या तुटपुंजेपणामुळेंच होत असतें. तेव्हां कमी रोजगारी काढून टाकणें, आणि खऱ्या उत्पन्नाच्या चढत्या प्रमाणांत सर्वांना रोजगारीची संधि मिळवून देणें, हा प्रश्न विकास-कार्यक्रमाच्याच समानार्थी ( Syncnymous ) प्रश्न आहे. हा प्रश्न सोडविण्याकरितां नियोजन दोन प्रकारें

मदत करील. पहिला प्रकार असाः—जे बांधकाम करतात त्यांच्यासंबंधीं भांडवल खर्ची घालतांना त्या खर्चाचें प्रमाण अशा रीतीनें वाढविलें जाईल कीं, ज्यामुळें त्या लोकांना अधिक रोजगार मिळेल. दुसरा प्रकार असाः—या पद्धतींतील मोक्याच्या जागीं भांडवल घालून पुढच्या टप्प्याला उत्पादन-पद्धतींत अधिकाधिक लोक जिरवले जातील अशी आंखणी करावयाची.

या नियोजनांत सरकारतर्फें होणारा विकास-खर्च दुप्पट करण्याची तरतूद आहे. याचा अर्थ १९५०–५१ सालीं जो २३२ कोटि खर्च होत होता तो १९५५–५६ सालीं ५०० कोटि केला जाईल. ठोकळ मानानें या वाढणाऱ्या खर्चापैकीं निम्मे पैसे अधिक वेतन व पगार म्हणून दिले जातील. खासगी विभागांत जास्तींत जास्त खर्च बांधकामावर होणार आहे. सध्यां देशांत किती प्रमाणावर बांधकाम होत आहे ह्याचा अंदाज करण्यास पुरेशी माहिती नाहीं. पण कांहीं ढोबळ अंदाज सिमेंट, लोखंड व त्यावरून निघणारी इमारतींची किंमत यापासून करतां येईल, तो अंदाज असा:—ही सामग्री वापरल्यामुळें बांधकमांत १९५०–५१ मध्यें अंदाजी १०० कोटि भांडवल घातलें गेलें. नियोजन-कालांत सिमेंटचें उत्पादन ८० टक्के व पोलादाचें ४० टक्के वाढणार आहे. ह्या उत्पादनापैकीं कांहीं सरकारी विकास-योजनांमार्फत खार्चिलें जाईल. तथापि खासगी बांधकाम सिमेंट व लोखंडाच्या वाढीमुळें पुष्कळच वाढेल.

खर्ची पडणाऱ्या भांडवलाचे दुय्यम परिणाम दिसावयास काळ लागेल; पण ते परिणाम प्रभावी होतील असें वाटतें. औद्योगीकरणाच्या सुरुवातीच्या अवस्थेंत हें प्रत्ययास येईल. मोठ्या प्रमाणावरील उद्योगांच्या बाबतींत नियोजनाचा कटाक्ष उत्पादक मालाच्या उद्योगावर राहील. उत्पादक वस्तूंच्या धंद्यांना भांडवल फार लागतें. त्यामुळें या काळांतील औद्योगीकरणाच्या कार्यक्रमामध्यें अधिक रोज-गारीचें प्रत्यक्ष प्रमाण थोडेंच असेल. नियोजनाप्रमाणें पाट-पाण्याचे जे फायदे शेतीला मिळावयाचे ते फक्त १ कोटि ९० लक्ष एकर लागवडीच्या शेतीला मिळतील. जेथें सतत पाणी वाहील तेथें दोन पिकें काढण्याची संधि प्राप्त होईल, आणि त्यामुळें हंगामी बेकारी कमी होण्यास मदत होईल. बाकीच्या शेती-विभागांत पाण्याच्या सोयी, खतें व बीं-बियाणें यांमुळें उत्पादन वाढेल, व उत्पन्नांत भर पडेल. ह्या अधिक वाढलेल्या उत्पन्नाचा रोजगारीवर तात्कालिक सांगण्यासारखा परिणाम दिसून येण्याचा संभव नाहीं; पण वाढणाऱ्या उत्पन्नाचा कांटा जसजसा स्थिरावेल तसतशी ग्रामीण विभागांत परिणामकारक मागणी वाढत जाईल, आणि लहान प्रमाणावरील धंद्यांत

व वस्तूंच्या उत्पादक धंद्यांशीं संलग्न असलेल्या सेवा-कार्यांत रोजगारीचें क्षेत्र रुंद होत जाईल. या नियोजनांत लहान प्रमाणावरील धंद्यांच्या वाढीला व संरक्षणाला बऱ्याच तजविजी आहेत. या धंद्यांत बऱ्याच अडचणी आहेत. तान्त्रिक तज्ज्ञतेची वाण, बाजार-संघटनांचा अभाव, कच्चा माल व भांडवल मिळण्याच्या मार्गांतील अडचणी, व इतर उद्योग-विभागांच्या विस्ताराशीं अपुरी जुळणी. ग्रामोद्योग व लहान प्रमाणावरील धंद्यांना योग्य त्या बाबतींत प्रत्यक्ष मदत देण्याचें तत्त्व नियोजनानें मान्य केलें आहे. त्याचप्रमाणें संक्रमण-कालांत त्यांना त्यांच्या क्षेत्रांत फाजील चढाओढीपासून संरक्षण देण्याचेंहि मान्य केलें आहे.

उत्पन्नांतल्या व रोजगारांतल्या वाढीचा प्रश्न आपल्यासारख्या अपुऱ्या विकास पावलेल्या देशांत शेवटीं भांडवलाच्या सांठ्याशींच निबद्ध झालेला असतो. सध्यांच्या नियोजनाचें उद्दिष्ट, देशांतील भांडवलांत गुंतवतां येतील अशा शिलकांचें प्रमाण १९५०–५१ सालीं जें ४५० कोटि रुपये होतें तें १९५५–५६ सालीं ६७५ कोटि रुपयेपर्यंत वाढवावें असें आहे. ज्या गोष्टी भांडवल वाढवण्याच्या गतीआड येतात त्याच उत्पन्न व रोजगारींत अधिक जलद वाढ करण्याआड येतात. ह्या प्रश्नांची सोडवणूक, जी फार मोठी उपयोगांत न आणलेली मनुष्य-शक्ति व इतर साधनें आहेत त्यांच्या उपयोगानेंच होणार आहे. हा प्रश्न संस्थेच्या चौकटींत संघटनात्मक बदल करण्याचा आहे. त्या संघटनेच्या उपायांना अत्यंत महत्त्व आहे.

---

## ५ : राज्यकारभार व जनता-सहकार्य

हिंदी राज्यघटनेमध्यें जीं सामाजिक व आर्थिक धोरणाचीं ध्येयें सांगितलीं आहेत तीं जरूरी व साधनें यांच्या पायावर राष्ट्रीय कार्यक्रम उभारून कृतींत आणण्याचा प्रयत्न पंचवार्षिक योजना करीत आहे. विकासाची गति ही राज्यकारभाराचा दर्जा, ज्या नैपुण्यानें तो कारभार केला जाईल तें नैपुण्य, आणि त्यांतून जें सहकार्य निर्माण होईल तें सहकार्य यांवर अवलंबून राहील. म्हणून पुढील पांच वर्षांचा काळ हा सरकारी नोकऱ्यांचा जनतेच्या सहकार्यानें आत्यंतिक प्रयत्न करण्याचा काळ

आहे. लोकशाही साधनांनीं जर आर्थिक व सामाजिक बाबतींत झपाट्यानें विकास करावयाचा असेल तर प्रत्येक कार्यक्षेत्रांत नेतृत्वाची जरूरी लागेल.

लोकशाही राज्यांत सरकार बनविणारें राजकीय नेतृत्व आणि राज्यकारभार हांकणाऱ्या सरकारी नोकऱ्या हीं एकमेकांना पूरक असतात; आणि दुसऱ्याची प्रत्यक्ष मदत व विश्वास असल्याशिवाय दोघांपैकीं एकहि आपलें कार्य करूं शकणार नाहीं. राजकीय कार्यकारीनें जनतेच्या इच्छा काय आहेत, त्यांच्या मूलभूत गरजा कोणत्या, व त्या कशा भागवितां येतील हें समजून घेतलें पाहिजे. म्हणून सरकारला प्रत्येक कार्यक्षेत्रांत तत्त्वें व धोरण ठरविण्याकडे खास लक्ष द्यावें लागतें; आणि त्यांची प्रामाणिकपणें अंमलबजावणी होते कीं नाहीं याबद्दल दक्ष असावें लागतें. सरकारी नोकऱ्यांचें मुख्य काम म्हणजे सरकार-मान्य धोरणाची अंमलबजावणी करणें व त्याला अनुसरून राज्यकारभार चालविणें.

राष्ट्रीय नियोजनामध्यें बिनचूक धोरण ठरविण्याला अत्यंत महत्त्व आहे. आपल्याकडे व्यावसायिक शिक्षण घेतलेलें मनुष्यबळ फार कमी आहे, म्हणून सरकारला कोणत्या क्षेत्रांत आपण काम केलें पाहिजे हें ठरविणें आवश्यक आहे. अलीकडच्या कांहीं वर्षांत अनुभवानें सिद्ध झाल्याप्रमाणें सरकारवरील जबाबदाऱ्या ह्या दिवसेंदिवस वाढणारच आहेत. गेल्या कांहीं वर्षांत जरी मध्यवर्ती व राज्य-सरकारकडून पुष्कळ कामें झालीं, तरी राज्यकारभाराच्या दर्जाचा थोडासा ऱ्हास झाला आहे. राज्यकारभारावरील कामाचा बोजा वाढला आहे. सरकारी नोकऱ्यांत अनुभवी नोकरवर्गाची संख्या घटली आहे, आणि जीं महत्त्वाचीं माणसें आहेत तीं चहूंकडेच मोठ्या दडपणाखालीं व ताणाखालीं काम करीत आहेत. देशांतील निरनिराळीं राज्यें यांना जर आपल्या जबाबदाऱ्या व जनतेच्या आकांक्षा पुऱ्या करावयाच्या असतील, तर राज्यकारभारांत सुधारणा होण्याची तांतडीची गरज आहे. सध्यांच्या पिढींतील सरकार, नोकर, आणि विशेषतः वरिष्ठ हुद्दयावर असलेले अधिकारी यांना एक संधि आहे, आणि त्यांच्यावर वैयक्तिक व सामुदायिक एक जबाबदारीहि आहे, ती म्हणजे राज्यकारभाराची इमारत व नोंकरीच्या परंपरा अशा रीतीनें स्थापन करण्यास मदत करावयाची कीं, ज्यामुळें हा राष्ट्रीय कार्यक्रम यशस्वी होईल, व पुढच्या प्रगतीचा भक्कम पाया घातला जाईल. या बाबतींत विचार करण्यासारख्या प्रश्नांचे तीन मुख्य गट आहेत.

(१) सर्व सरकारी कारभाराच्या बाबतींत सचोटी, तज्ज्ञता व काटकसर ह्यांची उच्च पातळी संपादन करणें.

( २ ) जनतेच्या जिव्हाळ्याचे व त्यांच्या जीवनाशीं दाट संबंध असलेले जे विकास-कार्यक्रम आहेत ते यशस्वी करण्याकरितां जिल्ह्याच्या कारभाराची पुनर्घटना करणें.

( ३ ) विकास-कार्यक्रम आंखतांना व पार पाडतांना जनतेचें सहकार्य मिळवणें, व त्यांना सहभागी करणें.

## सरकारी कारभार-सुधारणा.

सरकारी कारभारांत मुख्य उद्देश जें साध्य करावयाचें तें सचोटी, तज्ज्ञता, काटकसर व जनतेचें सहकार्य. हे उद्देश अगदीं परस्परांशीं संलग्न आहेत, व परस्परावलंबीहि आहेत. या उद्देशांपैकीं एक उद्देश साध्य करण्याकरितांहि जे उपाय योजले जातील तेच उपाय इतरहि उद्देश साध्य करण्याला साहाय्यक होतील.

**सचोटीः**—प्रत्येक सरकारी कामाच्या खात्यांत सचोटीबद्दल जर खात्री पटविण्याला आपण चुकलों तर त्यामुळें राज्यकारभाराची इमारत धुळीस मिळविण्याची व जनतेचा राज्यकारभारावरील विश्वास नष्ट करण्याची प्रवृत्ति वाढते. म्हणून राज्यकारभारांतील व सार्वजनिक जीवनांतील प्रत्येक प्रकारच्या लांचलुचपतीविरुद्ध सतत युद्ध करीत राहिलें पाहिजे.

लोकशाही राज्याच्या हिताच्या दृष्टीनें, सरकारी जीवनामध्यें विशिष्ट दर्जाचें प्रमाण असेल अशी खात्री वाटण्याइतके उपाय योजणें आवश्यक आहे. विशेषतः ज्या वेळीं या प्रमाणांचा मोठ्या प्रमाणांत दुरुपयोग केला जातो त्या वेळीं तर हें जरूरच असतें. याकरितां कांहीं यंत्र उभें केलें पाहिजे, व त्यानें मोठ्या हुद्दयावर असलेले सरकारी, राजकीय व इतर अधिकारी यांच्यावर जे गैरवर्तणुकीचे आक्षेप घेतले असतील त्यांची चौकशी केली पाहिजे. ज्या ठिकाणीं चौकशी करतां प्रथम-दर्शनींच पुरावे असतील तेथें वस्तुस्थिति काय आहे हें सिद्ध करण्याकरितां चौकशी केली पाहिजे. मध्यवर्ती व राज्य-सरकारमार्फत या बाबतींत इलाज योजण्याकरतां खास कायदे करणें जरूरहि पडेल.

सरकारी राज्यकारभारांत सचोटीचा दर्जा वाढविण्याकरितां ज्या सूचना केल्या आहेत, त्यांतील कांहीं पुढीलप्रमाणें आहेत.—

(१) सरकारी नोकराचे जवळचे नातेवाईक जर एकदम श्रीमंत झाले असतील तर अशा बाबतींत सध्यांचा लांचलुचपतीचा कायदा वाढवावा कीं काय ह्याचा विचार करावा.

(२) सरकारी नोकरांनीं किंवा त्यांच्या जवळच्या नातेवाइकांनीं दर वर्षी स्थावरच नव्हे तर जंगम मालमत्ता जी संपादन केली असेल त्याचें माहितीपत्रक सरकारला सादर करावें कीं काय ह्या सूचनेचा विचार केला जावा.

(३) ज्या अधिकाऱ्यांची प्रामाणिकपणाबद्दल ख्याति नसेल त्यांना ज्या ठिकाणीं स्वतःच्या बुद्धीनें निर्णय देण्याला भरपूर वाव असेल अशा ठिकाणीं नेमूं नये.

(४) मध्यवर्तीचें खास पोलीस खातें जें आहे त्याला मध्यवर्तीचे गुन्हे तपासण्याचीच फक्त सत्ता न देतां, राज्यांच्या ज्या महत्त्वाच्या गुन्ह्यांत स्थानिक अधिकाऱ्यांना मदत लागेल किंवा देणें जरूर असेल त्या ठिकाणींहि अधिकार द्यावेत.

(५) एखाद्या वैयक्तिक सरकारी नोकराचें नांव घेऊन वृत्तपत्रांत लांचलुचपतीचे आरोप त्याच्यावर लादले तर सरकारनें ज्या पक्षानें हे आरोप लादले त्याच्यावर खटला भरावा कीं काय हें खात्यातर्फें वरिष्ठ अधिकारी नेमून प्राथमिक व गुप्त चौकशी करून ठरवावें, किंवा त्या आरोपित व्यक्तीला कोर्टात जाऊन आपली अब्रू साफ करून घेण्यास परवानगी द्यावी कीं तसें करण्यास त्याला भाग पाडावें हें सरकारनें ठरवावें.

(६) खात्यातर्फें होणाऱ्या चौकशा तांतडीनें व्हाव्यात. मध्यवर्तीनें याबद्दल नुकत्याच सूचना पाठविल्या आहेत.

(७) राजकीय किंवा सरकारी जबाबदारीच्या जागेवर असणाऱ्यांनीं आपले सामाजिक संबंध अशा रीतीनें ठेवावेत कीं ज्यामुळें जनतेला त्याच्या त्रयस्थपणा-बद्दल व निःपक्षपातीपणाबद्दल संपूर्ण विश्वास वाटेल. हें सचोटीबद्दल झालें. लांचलुचपतीविरुद्ध जो मुख्य हल्ला चढवावयाचा तो कारभाराच्या प्रत्येक खात्यांत कार्यक्षमतेची खातरजमा करूनच चढविला पाहिजे. याकरितां पुढील सूचना केल्या आहेत:—

(१) जे खात्याचे मुख्य असतील त्यांनीं सध्यांच्या धोरणांत व पद्धतींत लांचलुचपतीला कोठें जागा आहे याची सतत पाहणी करावी, आणि त्याकरितां स्पष्ट सूचना द्याव्यात व तत्त्वें ठरवावीं.

(२) खटले किंवा अर्जांचे निकाल जर उशिरां लागले तर लांचलुचपतीला अवसर मिळण्याची ती महत्त्वाची संधि असते. निकाल लावायला कां वेळ लागला याची चौकशी करावी, व त्यावर इलाज योजावेत.

(३) ज्या अधिकाराच्या जागेवर लांचलुचपतीला जास्त सवड असेल तेथें अधिकारी निवडतांना खास दक्षता घ्यावी.

(४) नालायकी व अप्रामाणिकपणाला शिक्षा करण्याकरितां जसे उपाय योजावयाचे, तसे प्रामाणिकपणा व चांगलें काम याला पारितोषिक देण्याचेहि उपाय योजावेत. लांचलुचपत काढून टाकण्याचें महत्त्व किती आहे याबद्दल जनमत जागृत करणें अवश्य आहे. सरकारी कारभार चोख राखण्याकरितां जनतेचें सहकार्यहि संपादन करणें महत्त्वाचें आहे.

## कार्यक्षमता.

जर राज्यकारभाराचें यंत्र आपल्या कामाला योग्य ठरावयाचें असेल तर कार्यपद्धतींत, संघटनेंत, व दृष्टिकोणांत नावीन्य आलें पाहिजे. अलीकडे जशा जशा नव्या जबाबदाऱ्या घेतल्या गेल्या, तसतसें मध्यवर्ती व राज्य-सरकारच्या सचिवालयांत कामाचें केंद्रीकरण होऊं लागलें; आणि ज्या अवस्थेंत निखालस निकाल खात्याला द्यावे लागतात, ते वर ढकलले जाण्याकडे प्रवृत्ति वाढली. सचिवालय व खातीं यांच्यावरील जबाबदारीची रेषा स्पष्टपणें आंखली गेली पाहिजे, आणि खात्यांना परिणामकारक रीतीनें काम करतां आलें पाहिजे. म्हणून मध्यवर्ती व राज्य-सरकारनें नव्या कार्यांची पद्धतशीर पाहणी करावी, आणि त्यांतील कांहीं कामें दुय्यम अधिकाऱ्यावर सोपवितां येतील कीं नाहीं याचा विचार करावा.

सरकारचें वाढलेलें काम लक्षांत घेतां सध्यांच्या नोकरविषयक व्यवस्थेला पुढील बाबतींत जोड दिली पाहिजे.

( १ ) आर्थिक धोरण व कारभार यांच्या क्षेत्रांतील कामें.

( २ ) सरकारी उद्योगधंद्यांची व्यवस्था.

( ३ ) जिल्हा-विकास-योजना, जमीन-सुधारणा, व अन्नाची व्यवस्था यांसंबंधीं कामें. ह्याची जबाबदारी मुख्यतः राज्यानें पत्करावयाची आहे.

पहिल्या बाबीपुरतें म्हणावयाचें म्हणजे, सरकारी कारभारांतील नोकऱ्यांत पुरेसा अर्थ-व्यवस्थेचा अनुभव व पार्श्वभूमि असलेला नोकरवर्ग असावा. त्याकरितां खालील सूचना करीत आहों.

( १ ) ज्यांना अर्थशास्त्रांत विद्यापीठाची उच्च पदवी असेल, किंवा खास अनुभव असेल त्यांना सरकारी नोकऱ्यांत घ्यावें.

( २ ) सरकारी कारभारांत असलेल्या कनिष्ठ अधिकारीवर्गामधून कांहीं प्रमाणांत

कांहींची त्यांच्या नोकरीच्या सुरुवातीलाच निवड करावी, व त्यांना आर्थिक क्षेत्रांतील सखोल शिक्षण द्यावें; आणि

( ३ ) वरिष्ठ अधिकाराच्या जागेकरतां जेव्हां जरूर वाटेल तेव्हां, विद्यापीठें, बँका, अर्थ आणि उद्योग या क्षेत्रांत खास अनुभव व ज्ञान असलेल्या व्यक्ति संपादन कराव्यात. त्यांना नोकऱ्या देणें, शिक्षण देणें, धंदा करणें, देखरेख—तपासणी करणें वगैरेंबद्दल सूचना नियोजनांत केल्या आहेत.

## राज्यांत विकासाकरितां नोकरवर्ग.

हें नियोजन कार्यान्वित करण्याकरितां राज्यामध्यें सुसंघटित असा विकासाकरितां नोकरवर्ग हवा. साऱ्या देशाचा विचार केला तर—राज्यामध्यें असा कोणताहि विकास-विभाग नाहीं, किंवा जबाबदारीचें क्षेत्र नाहीं कीं जेथें पुरेसा लायक नोकरवर्ग आहे. जसजसे कार्यक्रम वाढत जातील तसतशी ही उणीव तीव्रतेनें भासेल. मर्यादित प्रमाणांत ही गरज आपल्या व शेजारच्या राज्यांचा संयुक्त नोकरवर्ग तयार करून किंवा दुसऱ्या राज्यांतील नोकरवर्ग डेप्युटेशनवर आणून भागूं शकेल. पण दुसऱ्याहि तजविजी अवश्य आहेत. मध्यवर्ती सरकारनें राज्यांच्या सल्ल्यानें शेती, स्थापत्य, जंगल व सार्वजनिक आरोग्य यांसारख्या महत्त्वाच्या बाबतींत मध्यवर्ती-नोकरवर्ग-विकास-संस्था स्थापन करावयाची कीं काय याचा विचार करावा.

## सरकारी उद्योगधंद्यांचा कारभार.

पांच वर्षांतल्या नियोजनांत जो विकास कल्पिला आहे त्यांत सरकारी विभाग क्रमाक्रमानें विस्तार पावणारच आहे. सरकारी उद्योगधंद्याचीं कामें कार्यक्षमतेनें व चांगलीं चालून यशस्वी झालीं पाहिजेत. प्रत्येक हातीं घेतल्या जाणाऱ्या उद्योगाला एक स्वतंत्र डायरेक्टर-बोर्ड असावेंच, पण शिवाय सरकारला औद्योगिक व्यवस्थेकरितां लागणारा वरच्या दर्जाचा नोकरवर्ग—वित्तीय, हिशेब वगैरेंचे प्रश्न, किंमती ठरविण्याचें धोरण, भांडवल घालण्याचा कार्यक्रम, वगैरे महत्त्वाच्या बाबतींत सल्ला देण्याकरितां व तपशिलांत लक्ष घालण्याकरितां एका मध्यवर्ती बोर्डाची आवश्यकता आहे. अशा प्रकारचें एक मध्यवर्ती बोर्ड धोरण, व्यवस्था व संघटना या सर्वांना समान असणाऱ्या प्रश्नांचा विचार करण्याकरतां लवकर स्थापन करावें अशी शिफारस आहे.

## जिल्हावार विकास-कार्यक्रमांची व्यवस्था.

कांहीं वर्षांपूर्वी जिल्ह्यामध्यें मुख्य कामें जीं केलीं जात तीं कायदा व सुव्यवस्था राखणें व जमीनमहसूल गोळा करणें एवढींच होतीं. पण आतां जिल्ह्याच्या

कारभाराचें महत्त्व द्रव्यसाधनें आणि जनतेच्या राहणीचें मान वाढविण्याचें आहे. सध्यांच्या कार्यांना त्यांना सुसज्ज करणें आतां अवश्य आहे. जनतेचें प्रत्यक्ष पाठबळ व सहकार्य यांच्या साहाय्यानें विकास-योजना कार्यान्वित करण्यावर आतां मुख्य भर दिला पाहिजे. जिल्ह्याचा कारभार लोकशाही सरकारच्या सुराशीं जुळता घेतला पाहिजे. जिल्ह्याच्या कारभाराच्या पुनर्घटनेंत पुढील तरतुदी केल्या जाव्यात.

( १ ) सर्वसामान्य शासनयंत्र मजबूत केलें पाहिजे, व सुधारलें पाहिजे.

( २ ) खेड्यांत विकास करण्याकरितां खेड्यांतील जनतेकडून ज्याला आधिकार प्राप्त होईल असें एक सुयोग्य मध्यस्थ-मंडळ स्थापणें.

( ३ ) जिल्ह्यांत जीं निरनिराळीं विकासाचीं खातीं असतील त्यांच्या कार्यांचें एकत्रीकरण करणें, आणि सर्वांना समान असणाऱ्या एका व्यापक संघटनेची स्थापना करणें.

( ४ ) सरकारी खात्याशीं सर्व विकास-काम करणाऱ्या स्थानिक स्वराज्य-संस्थांचा दुवा जोडणें.

( ५ ) जिल्हा-विकास-कार्यक्रमावर देखरेख ठेवणें, व प्रादेशिक एकसूत्रीपणा आणणें.

## सर्वसामान्य कारभारांत मजबुती.

यापुढें विकासाचा कार्यक्रम वाढत जाणार आहे, आणि त्यामुळें जिल्हाधिकाऱ्यांचें काम व जबाबदारी अधिक वाढणार आहे. त्यामुळें त्याला पुरेशी मदत मिळणें अवश्य आहे. त्याबद्दल कांहीं सूचना खालीं दिल्या आहेत.

( १ ) रयतवारी व तात्पुरती धारापद्धति जेथें आहे, तेथल्याच पद्धतीवर कायमधारा व जहागिरदारी विभागांत महसूल-अधिकारी नेमावेत. जमीन-सुधारणा करणें, व विकास-योजना-कार्यक्रम अंमलांत आणणें हें त्यामुळें अडून राहिलें आहे.

( २ ) राज्य-सरकारनीं विकास-कार्यक्रम उत्तम रीतीनें अंमलांत कसा येईल ह्या दृष्टीनें आपल्या विद्यमान जिल्ह्यांच्या आकाराची फेर-पाहणी करावी. जेथें जिल्ह्याचा आकार बदलणें जरूर नसेल तेथें अधिक उपविभाग पाडणें जरूर आहे का याचा विचार करावा.

( ३ ) जिल्हाधिकाऱ्यांच्या शिक्षणक्रमांत अधिकाऱ्यांना ज्या योगानें खेडयांतल्या पातळीवरचे कार्यकर्ते म्हणून व मोठाल्या विकास-योजनांचे अधिकारी म्हणून कांहीं वेळ काम करितां येईल अशा शिक्षणाचा अंतर्भाव व्हावा.

( ४ ) जिल्ह्यांतील तपशीलवार कारभाराची बरीचशी जबाबदारी राज्यांतील नोकरवर्गावर असल्यामुळें त्यांच्या शिक्षणाकडे खास लक्ष द्यावें.

## विकासाकरितां ग्राम-संस्था.

खेड्यांतील साधन-सामग्रीची वाढ करण्याकरितां जें नेतृत्व लागतें त्याची तरतूद करण्याकरितां आणि जबाबदारी घेण्याकरितां खेड्यामध्यें जनतेची प्रतिनिधि होईल अशा एका संघटनेची जरूरी आहे. हें काम ग्रामपंचायत करूं शकेल. ग्राम-विकास-कार्यक्रमांची संघटना करतां यावी म्हणून पंचायतींना जे अधिकार लागतात ते अधिकार व तीं कामें राज्यांच्या विद्यमान कायद्यांत पंचायतीकडे सोंपवलीं आहेत. पंचायतींना पुढील कामाची जबाबदारी घेतां यावी म्हणून जरूर तर पंचायतीचे कायदे अधिक बळकट करावेत.

( १ ) खेड्याकरितां उत्पादनाचे कार्यक्रम ठरविणें.

( २ ) हे कार्यक्रम अंमलांत आणण्याकरितां लागणारा पैसा व साधनें यांच्या आवश्यकतेचीं अंदाजपत्रकें तयार करणें.

( ३ ) सहकारी संस्थांच्यामार्फत जी मदत दिली जाते त्याव्यतिरिक्त अन्य सरकारी वाढती मदत खेड्याला पोहोंचेल अशाकरितां मध्यस्थ म्हणून पंचायतीचा उपयोग करणें.

( ४ ) खेड्यांत अधिक उत्पादन व्हावें या दृष्टीनें लागवडीचें किमान प्रमाण निश्चित करणें.

( ५ ) ओस पडलेली जमीन लागवडीला आणणें.

( ६ ) जी जमीन मालकाकडून पिकाखालीं आणली जात नाहीं, किंवा तिची व्यवस्था केली जात नाहीं तिची लागवड करणें.

( ७ ) सामाजिक कार्याकरतां स्वेच्छेनें काम करूं इच्छिणाऱ्या कामगारांची संघटना करणें.

( ८ ) जमिनीच्या व्यवस्थेसंबंधीं जे विद्यमान कायदे असतील त्यांच्या कक्षेंत खेड्यांतील जमिनींची व इतर साधनांची सहकारी व्यवस्था करणें.

( ९ ) जमीन सुधारण्याकरितां योजावयाच्या उपायांचा अंमल खेड्यांत व्हावा म्हणून मदत करणें.

ग्रामपंचायतीवर लोकमतांनीं निवडून आलेल्या प्रतिनिधींशिवाय कांहीं थोडेसे अधिक लोक पंचायतीवर घेण्याची तरतूद असावी. देशांत निरनिराळ्या भागांत

निरनिराळी परिस्थिति असते, याकरितां कोणत्या गांवाला कोणती संघटना उपयुक्त ठरेल हें स्थानिक गरजांप्रमाणेंच निश्चित करावें लागेल.

## ग्रामीण विस्तार व विकास-कार्याचें एकत्रीकरण.

ग्रामीण विभागापर्यंत नोकऱ्यांचा विस्तार झाला पाहिजे. ही गरज आतां सर्वत्र मान्य केली जात आहे. 'अधिक धान्य पिकवा' चौकशी-समितीनें केलेल्या शिफारशीनुसार नियोजनांत एका राष्ट्रीय-विस्तार-संघटना-योजनेची शिफारस केली आहे. मध्यवर्ती सरकारची मदत राज्य-सरकारला या बाबतींत व्हावी. आपली परिस्थिति व गरजा यांना सोईस्कर पडेल अशी एक विस्तार-संघटना प्रत्येक राज्याला करावी लागेल. राज्यकारभाराची तपशीलवार व्यवस्था करतांना पुढील मूलभूत मुद्दे लक्षांत ठेवले पाहिजेत.

( १ ) सर्व विकास-खात्यांचा जो मध्यस्थ म्हणून असेल, व जो खात्यांचें म्हणणें खेड्यांतील जनतेला सांगेल असा विविध-कार्यी ग्राम-सेवक.

( २ ) सुमारें १०० खेड्यांचा विकासाकरितां एक गट करून त्यावर एक विकासाधिकारी असणें. तो आधिकारी सब-कलेक्टर किंवा जेथें प्रान्तविभाग नसेल तेथें जिल्हा-कारभाराशीं निकट संबंध असलेला अधिकारी; आणि

( ३ ) कलेक्टरला विस्तारित नोकऱ्यांचें प्रमुख स्थान देणें, आणि त्यानें जिल्ह्यांतील जे विकास-आधिकारी असतील त्यांनीं त्याच्याबरोबर एकजुटीनें काम करणें.

## विकास-योजनांत स्थानिक स्वराज्य-संस्थांचें काम.

गेल्या दहा वर्षांत स्थानिक स्वराज्य-संस्थांच्या कामांत पीछेहाट झाली आहे. सामान्यतः म्हणावयाचें म्हणजे या स्थानिक संस्थांनीं आपल्या द्रव्यसाधनांत कांहीं म्हणण्यासारखी भर टाकली नाहीं, आणि त्यांना आपल्या चालू कामाचा खर्च भागविणेंहि जड जात आहे. एकेका कार्यक्रमांत स्थानिक सहकार्य मिळावें व त्यांनीं अंशभागी व्हावें, आणि लोकशाही राज्याची इमारत बळकट व्हावी याकरितां जे स्थानिक विकास-कार्यक्रम असतील ते राज्य-सरकारच्या संस्था आणि जनतेच्या मतांनीं स्थानिक स्वराज्य-संस्थांवर निवडून आलेले जनतेचे प्रतिनिधि यांच्या निकटच्या सहकार्यानें पार पाडावेत, व ते दोघांचेहि कार्यक्रम आहेत असें समजण्यांत यावें. सर्व-सामान्य धोरण स्थानिक स्वराज्य-संस्थांना उत्तेजन देण्याचें व त्यांच्या क्षेत्रांत जितकीं कारभाराचीं व सामाजिक सेवेचीं कामें असतील त्यांतील जितका अधिक जबाबदारीचा

भाग त्यांना उचलतां येईल तितका उचलण्यास मदत करण्याचें असावें. स्वराज्य-संस्था व सरकार यांच्यांत तात्काळ विकासाबाबत पुढीलप्रमाणें निकट सहकार्य स्थापित करितां येईल.

( १ ) स्थानिक स्वराज्य-संस्थांनीं हातीं घेतलेले कार्यक्रम काळजीपूर्वक राज्याच्या कारभाराच्या सूत्रांत आणावे.

( २ ) राज्य-सरकारनीं शक्य तोंवर आपले समाज-सेवेचे कार्यक्रम स्थानिक संस्थांमार्फत अंमलांत आणावेत.

( ३ ) ज्याप्रमाणें राज्य-सरकार स्वतःच्या संस्था व नोकऱ्या यांची तपासणी, देखरेख व मार्गदर्शन आपल्या यंत्र-विशारद व राज्य-कारभार-धुरंधराकडून करवितें, त्याचप्रमाणें त्यांनीं याच मंडळींकडून स्थानिक स्वराज्य-संस्थांच्या संस्थांची व नोकऱ्यांचीहि तपासणी, देखरेख व मार्गदर्शन करावें.

( ४ ) कोणत्याहि विभागांत जर विकास-कार्यक्रम अंमलांत आणावयाचा असेल तर त्या कार्यक्रमाशीं पुष्कळ बिनसरकारी अधिकाऱ्यांचा संबंध जोडला पाहिजे. या बिनसरकारी अधिकाऱ्यांचें बीज स्थानिक संस्थांतील निवडून आलेले प्रतिनिधि असावे.

( ५ ) जेथें जेथें प्रान्त-अधिकारी असतील, किंवा जेथें पुढें प्रान्त-विभाग करतां येतील तेथें प्रान्त-विभागाकरितां लोकलबोर्डें स्थापण्याचा विचार केला जावा.

राज्याच्या कायदेमंडळांतील व पार्लमेंटांतील सभासदांचा स्थानिक विकास-कार्यक्रम बनविण्याच्या व अंमलांत आणण्याच्या बाबतींत निकट संबंध घडवून आणावा. पक्षाचा विचार न करतां ज्या बिनसरकारी विकास-कमिट्या असतील तेथें या सभासदांना नेमल्यास त्यांच्या व्यापक अनुभवाचा, दृष्टिकोणाचा फायदा मिळेल.

## प्रादेशिक सुसंगति व जिल्हा-कार्यक्रमांची देखरेख.

प्रादेशिक कार्यांत सूत्रबद्धता यावी व जिल्ह्याच्या कामावर देखरेख ठेवावी, म्हणून सेक्रेटरिएटचीं खातीं व जिल्हाधिकारी यांच्यामध्यें एक अधिकारी-खातें असावें. हें नवें अधिकारी-खातें दैनंदिन राज्यकारभारांत लक्ष घालणारें नसावें. हें खातें प्रदेशाच्या मुख्य गांवीं असावें कीं राज्याच्या राजधानींत असावें हें स्थानिक परिस्थितीनुसार ठरवावें.

## समाज-सेवा-मंडळें व जिल्हा-कारभार.

समाज-सेवा करणाऱ्या संस्था विकास-कार्यक्रमांत फार मोलाचें काम करूं शकतील. ग्रामपंचायतींत व सहकारी संस्थांत काम करावयास लागणारे कार्यकर्ते ते पुरवूं

शकतील. या समाज-सेवा-मंडळांना त्यांची इच्छा असल्यास त्यांच्यामार्फत दिल्या जाणाऱ्या शिक्षणाकरितां आणि त्यांच्या कार्यकर्त्यांना दिल्या जाणाऱ्या पगाराकरितां कांहीं आर्थिक मदत देण्यांत यावी. खेड्यांत बिनसरकारी नेतृत्व निर्माण करण्याकरितां समाज-सेवक-संस्थांशीं केलेलें सहकार्य उपयुक्त ठरेल.

## राष्ट्रीय विकासांत जनतेचें सहकार्य.

नियोजनामागें जनतेचें सहकार्य व जनमत असणें ही मुख्य प्रभावी शक्ति आहे. या नियोजनांत जनतेचें सहकार्य जें दृष्टीसमोर ठेवलें आहे तें पक्षातीत आहे. लोकशाहींतील नियोजन हें खरेंखुरें नियोजन एवढ्याचकरितां असतें कीं, त्यांत जनतेला असा विश्वास वाटतो कीं ह्या नियोजनामुळें समाजांतील आर्थिक विषमता बरीच कमी होईल, आणि सर्वांना समान संधि मिळेल. याच एका विचारामुळें पक्षाचें हित-आहित मागें पडतें, आणि राष्ट्राचीं समान ध्येयें एक होतात.

नियोजनाचें यथातथ्य आकलन होणें हें त्याच्या यशाचें एक पाऊल आहे. हें आकलन वृत्तपत्रें, सृजनशील लेखक, कलाकार, रेडिओ, सिनेमा, नाटकें व गाणीं यांच्या सहकार्यानें घडवितां येतें. सामान्य गरजा व सामान्य प्रश्न यांच्याद्वारें नियोजनाची कल्पना मांडतां येईल, आणि साध्या भाषेंत वाङ्मय व माहिती पुरवितां येईल.

सरकारी कारभारांत असणारे जर लोकांच्याकडे बंधुत्वाच्या नात्यानें गेले, आणि शिकण्याची व मदत करण्याची त्यांची उत्सुकता असली तर ते असें वातावरण निर्माण करतील कीं ज्यांत जनतेचें सहकार्य वाढूं शकेल. जनतेचें जास्तींत जास्त साहाय्य घेण्याची इच्छा असली पाहिजे, व समाजाच्या ऐच्छिक कार्यांना देतां येईल तितका वाव दिला पाहिजे. जनतेचें सहकार्य व राष्ट्रीय विकास यांचें शेवटचें ध्येय एकच आहे.

ग्रामीण विभागांत सरकार जी मदत देणार असेल ती मुख्यतः खेड्यांतील जनतेच्या प्रयत्नानें खेड्याचा विकास व्हावा अशा स्वरूपाची असावी. स्थानिक जनता जितकें कार्य स्वतःच्या प्रयत्नानें अंगावर घेऊं शकेल तितकें अधिक साहाय्य सरकारला देतां येईल. याकरितां ग्राम-विकास-योजनांचें उद्दिष्ट खेड्यांतील सामान्य गरजा भागविण्याकरितां खेड्यांतील जीवनाची पुनर्रचना करण्याचें आहे. या कामाकरितां नियोजनांत १५ कोटि रुपये खास राखून ठेवले आहेत. सार्वजनिक सहकार्याच्या ज्या मुख्य संस्था आहेत त्या पुढीलप्रमाणें—

## ( १ ) स्थानिक स्वराज्य-संस्था.

यांच्याबद्दलच्या अपेक्षा मागेंच सांगितल्या आहेत.

## ( २ ) व्यावसायिक संस्था.

या संस्थांनीं आपल्या सदस्यांनीं कोणतें प्रमाण मानावें याच्या मर्यादा घालून द्याव्या, व त्या उत्तरोत्तर वाढवाव्यात. आपल्या व्यवसायाशिवाय जनतेला कांहीं निराळें देतां येईल अशासंबंधींचे कल्याणकारी कार्यक्रम आपल्या सदस्यांकरितां त्यांनीं आंखावे.

## ( ३ ) विद्यापीठें.

विद्यापीठांना राष्ट्रीय विकासाकरितां देण्यासारखें पुष्कळच आहे. पण त्यांनीं विशेषतः अलीकडे जो शिक्षणाचा दर्जा उतरला आहे तो उंचावण्याचा प्रयत्न करावा.

## ( ४ ) स्वयंसेवा करणाऱ्या संघटना.

समाज-कार्य करणाऱ्या या संघटनांना राष्ट्रीय नियोजनाचें क्षेत्र बरेंच व्यापक करतां येईल. त्यांनीं विशेष प्रयत्न करून स्त्रिया, तरुण व शिक्षक यांच्याकरितां विधायक कार्याचीं क्षेत्रें शाळांतून वाढवावींत. या तीनहि वर्गांना फार महत्त्वाचें कार्य करावयाचें आहे. त्यांच्या अव्यक्त शक्तीचें कार्यांत अजून परिवर्तन व्हावयाचें आहे. नियोजनांत या ऐच्छिक संघटनांच्या मदतीकरितां ४ कोटि रुपये ठेवले आहेत. १कोटि रुपये तरुणांच्या शिबिराकरितां व विद्यार्थ्यांच्या श्रमकार्याकरितां ठेवले आहेत.

अलीकडे कांहीं महिन्यांत जनतेचें सहकार्य राष्ट्रीय प्रमाणांत मिळावें म्हणून दोन संस्था निघाल्या आहेत. एक नॅशनल ॲडव्हायजरी कमिटी फॉर पब्लिक को-ऑपरेशन, व दुसरी, भारत-सेवक-समाज.

पहिली संस्था निरनिराळ्या मतांच्या वर्गांची प्रातिनिधिक आहे, व तिच्यापासून पुढील अपेक्षा आहेतः —

( १ ) राष्ट्रीय विकासाशीं संबद्ध असें जनता-सहकार्याच्या कार्यक्रमाचें परीक्षण करणें, व त्याचा अंदाज घेणें.

( २ ) नियोजनाच्या पूर्तीसाठीं जनता-सहकार्यामध्यें झालेल्या प्रगतीची नियोजन-कमिशनला वेळोवेळीं कल्पना देणें.

( ३ ) भारत-सेवक-समाजाच्या मध्यवर्ती मंडळाकडून आलेले अहवाल स्वीकारणें, व त्यांनीं सल्लयाकरितां ज्या विशिष्ट बाबींचा उल्लेख केला असेल त्यांचा विचार करणें.

( ४ ) भारत-सेवक-समाजाच्या मध्यवर्ती मंडळाला जनता-सहकार्यासंबंधीं कार्यक्रमाच्या व धोरणांच्या बाबतींत सूचना देणें व शिफारशी करणें.

विधायक कार्याकरितां बिन राजकीय व बिन सरकारी असें एक राष्ट्रीय स्थान निर्माण करावें म्हणून हा समाज स्थापन करण्यांत आला आहे. या समाजाचीं मुख्य ध्येयें:—

( १ ) हिंदी नागरिकांकरितां स्वयंसेवेचीं क्षेत्रें शोधून काढणें, व वाढाविणें; त्यापासून—( अ ) राष्ट्रीय स्वयंपूर्णतेची वाढ होणें, आणि राष्ट्राची आर्थिक शक्ति उभारली जाणें; ( ब ) समाजाचें सामाजिक सुख वाढविणें, आणि त्यांतील कमनशीबवान् वर्गाचें दारिद्र्य व यातना कमी करणें हें साधण्यांत यावें.

( २ ) जनतेचा अनुपयुक्त काळ, शक्ति व इतर साधनें जीं उपलब्ध होण्यासारखीं असतील तीं बाहेर आणणें, आणि त्यांचा निरनिराळ्या सामाजिक व आर्थिक चळवळींत उपयोग करणें.

जे आपल्या वेळेचा व शक्तीचा कांहीं भाग देऊन राष्ट्रीय नियोजनाच्या बाबतींत जनतेचे स्वतःचे प्रयत्न वाढवूं इच्छितात अशा सर्वांना एकाच व्यासपीठावर आणण्याची भारत-सेवक-समाजांत तजवीज आहे. त्याचप्रमाणें विद्यमान स्वयंसेवा संघटनांच्या विकासाला त्या समाजानें मदत करावी असाहि हेतु आहे.

---

# ६ : शेतीचा कार्यक्रम

## शेतीची परिस्थिति.

एकंदर ८१ कोटि १० लक्ष एकर भौगोलिक क्षेत्रफळापैकीं ६१ कोटि ५० लक्ष एकरांसंबंधीं जमिनीच्या उपयोगाचे आंकडे मिळतात. हिंदुस्थानांत एकंदर लागवडीचें क्षेत्र ३२ कोटि ४० लक्ष एकर आहे. शेतीच्या प्रगतीची तुलना कठीण आहे; कारण एकेका राज्यांत सीमेच्या रेषा बदलल्या आहेत. ज्या राज्यांत विशेष सीमा बदलल्या नाहींत अशा राज्यांच्या गटांचा गेल्या ४० वर्षांतील परिस्थितीचा अभ्यास केला तर असें आढळतें कीं, लागवडीचें क्षेत्र लोकसंख्येच्या वाढीबरोबर आपली गति ठेवूं

शकलें नाहीं. पेरलेल्या निव्वळ क्षेत्रांत फारशी वाढ झाली नसली तरी दोन पिकें निघणाऱ्या जमिनींत २० टक्के वाढ झाली आहे. मोठाल्या पाटबंधाऱ्यांकडून भिजल्या जाणाऱ्या जमिनींत सुमारें १० टक्के वाढ आहे; पण लहान योजनांकडून भिजलें जाणारें क्षेत्र जवळजवळ तेंच राहिलें आहे. नवे लहानलहान पाट एकीकडे बांधले जात असतां दुसरीकडे नीट सांभाळ नसल्यामुळें अगर अन्य कारणांमुळें जुने लहान पाट उपयोगांतून जात होते. जमिनीवर वाढतें दडपण पडत असतांहि नवी पड-जमीन फारशी लागवडीला आली नाहीं. याचा अर्थ असा कीं, मोठाल्या पड-जमिनी उपयोगांत आणावयाच्या असतील तर त्याकरितां खास प्रयत्न केले पाहिजेत. ते प्रयत्न एकट्या-दुकट्या शेतकऱ्याला शक्य नाहींत. जवळ असलेल्या गमकावरून जमिनीच्या कसामध्यें कांहीं घट झाली आहे असें दिसत नाहीं.

पिकाच्या उत्पन्नाचे जे अंदाज आहेत त्यांना अर्थात् मर्यादा आहेत. देशांतील बऱ्याच मोठ्या विभागांत मुख्य मुख्य पिकांचा अंदाज काढण्याकरितां, प्रत्यक्ष पिकें कापून प्रयोग करण्याची पद्धत अलीकडे सुरू केली आहे. तिचा उद्देश अधिक बरोबर अंदाज केले जावेत हाच आहे. आपल्याकडे सरासरी अन्नधान्याचें उत्पादन जवळजवळ ४ कोटि ४० लक्ष ते ४ कोटि ५० लक्ष इतकें आहे. प्रत्येकाला दररोज १३·७ औंस धान्य मिळावें याकरितां १९५५–५६ सालीं आपलें उत्पादन ६७ लाख टनांनीं वाढलें पाहिजे. आधिक उत्पादनाचें उद्दिष्ट ७६ लाख टन धरलें आहे. आपल्याला कापसाच्या गांठी ५३ लाख व तागाच्या ७२ लाख लागतील.

## शेतीची वाढ कशी करावी.

वरील गोष्टीवरून आपली ग्रामीण अर्थ-व्यवस्था बरीचशी स्थिरावलेली आहे असें वाटेल; पण गेल्या बऱ्याच वर्षांत खरोखरच कित्येक उल्लेखनीय बदल झाले आहेत. ज्या विभागांत अवर्षण वारंवार होई, तेथें पाटबंधारे झाले. देशाच्या उत्पादनांत व व्यापारांत नव्या नव्या पिकांना महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे. शेती व उद्योग-धंद्यांचे अर्थ व्यवहार परस्परांवर जोरदार परिणाम करीत आहेत. खेड्यांतील कर्जाचा आणि खेड्यांतील सावकारीचा प्रश्न राज्यकारभार व जनता यांच्यावर १५–२० वर्षांपेक्षां पुष्कळच कमी ताण पाडीत आहेत; आणि देशांत आजच राहणीचें मान वाढविण्याकरितां जागृति व इच्छा निर्माण झाली आहे. शेतीच्या अर्थ-व्यवस्थेंत असलेला समतोलाचा ओघ फाळणीमुळें मोठ्या प्रमाणावर बिघडला; तथापि आतां बरीच स्थिरस्थावर करण्यांत आली आहे.

शेतकऱ्याचें जीवन हें संपूर्ण असतें, आणि त्याचे प्रश्न परस्परांवर इतके आघात करतात कीं त्याला खण्डशः ते पाहतांच येत नाहींत. त्यामुळें शेतीच्या विकासाचा प्रश्न हातीं घेतांना शेतकऱ्याचें जीवन व त्याचे प्रश्न यांचा एकत्रच विचार केला पाहिजे. असें करीत असतांना कांहीं बाबींवर विशेष जोर देणें भाग पडेल; पण आपलें ध्येय शेतकऱ्याचा दृष्टिकोण व त्याच्या भोंवतालची परिस्थिति बदलण्याकरितां निरनिराळ्या बाजूंनीं व व्यापक प्रमाणावर प्रयत्न करण्याचें असले पाहिजे. आपल्या दृष्टीसमोर जें साध्य आहे तें ग्रामीण जनतेचीं मनुष्य व पदार्थविषयक साधनें वाढविण्याचें आहे. हें सिद्धीला जाण्याकरितां मुख्यतः ग्रामीण जनतेला स्वतःचे प्रश्न स्वतःच सोडविण्यास समर्थ करणें, आणि नवें ज्ञान व नवीं साधनें आपल्या गरजांच्या कामीं लावण्याकरितां सहकारी पद्धतीचा अवलंब करावा म्हणून संघटित होण्यास सांगणें. सहकारिता हा समाजाच्या कार्यारंभाचा पाया आहे, आणि सरकारी शासन-यंत्राकडे विशेषतः खेड्यांतील विस्तारित कामगारांकडे त्यांना मार्ग दाखविण्याचें व मदत करण्याचें काम आहे.

समाज रचनेंत आलेला ताठपणा आणि उपयोगांत न आणलेली साधन-सामग्री हीं अपुऱ्या विकास पावलेल्या अर्थ-व्यवस्थेचीं लक्षणें असतात. जमिनीच्या मालकीभोंवतीं उभारलेली समाजरचना बदलणें, आणि नवी साधनसामग्री व नवें तांत्रिक ज्ञान दररोजच्या कामीं लावणें; ही विकास-क्रमांतील मध्यवर्ती गोष्ट ठरते. नियोजनाचा हेतु जलदीनें बदल घडविणें हा आहे. तो बदल अशा रीतीनें घडवावा कीं ज्यामुळें अर्थ-व्यवस्था समतोलपणें, एकत्रित पद्धतीनें पुढें पुढें जाईल. हें घडत असतांना जी मुख्य गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती समाजाच्या विकासाच्या ध्येयाची, अधिक उत्पादनाची, व न्याय्य वांटणीची. ह्या ध्येय-साधनाच्या दृष्टीनें नियोजनांत सूचना केल्या आहेत.

पंचवार्षिक योजनेंत शेतीच्या उत्पन्नांत भरपूर वाढ होणें ध्यानांत ठेवलें आहे. अन्नधान्यें व व्यापारी पिकें हीं दोन्ही वाढलीं पाहिजेत. जे कमाल उत्पादनाचे आदर्श दृष्टी-समोर ठेवले आहेत ते मोठ्या व लहान धरणांच्या योजना द्वारां लागवड वाढवून, पड-जमीन लागवडीला आणून, आणि संशोधनाचे परिणामांचा उपयोग पिकांचें उत्पादन वाढविण्याकरितां करून साध्य केले जावयाचे आहेत. जी विद्यमान साधन-सामग्री जमिनींत व जंगलांत आहे तिचें रक्षण करण्यावर नियोजनांत बराच जोर दिला आहे. ग्रामीण अर्थ-व्यवस्थेंत जी वाढ करावयाची व जी विविधता आणावयाची ती—दूधदुभतें, आणि बागाइत, तसेंच जेथें शक्य असेल तेथें विद्युत्-

शक्तीच्या व सुधारलेल्या हत्यारांच्या द्वारां ग्रामीण उद्योगधंद्यांची वाढ करून आणावयाची आहे. जमिनीच्या साधन-सामग्रींत समुद्र व नद्यांच्या सामग्रीची भर घालावयाची आहे व त्याकरितां नियोजनांत नवा व व्यापक असा मत्स्य-व्यवसाय वाढविण्याचा कार्यक्रम आहे. ग्रामीण अर्थव्यवस्था द्रव्याच्या अभावीं उपाशीं राहिली आहे. त्याकरितां शेतीला द्रव्य पुरविण्याच्या कार्यक्रमाचा नियोजनांत तरतूद केली आहे.

उद्योगधंदे, वाहतूक व समाज-सेवा या बाबतींत दृष्टीसमोर ठेवलेल्या उपायांचा ग्रामीण अर्थ-व्यवस्था वाढीस लागण्यावर परिणाम होईल. कारण त्यांच्यामुळें उपयोगांत न आणलेली अर्थ-व्यवस्था उंचावते, नवी साधन-सामग्री उपयोगांत येते; आणि सर्वांपेक्षां ज्या वातावरणांत शेतकरी जगतो व काम करतो तें वातावरण बदलतें. अशा प्रकारें जरी शेतीविषयक कार्यक्रम हे पंचवार्षिक योजनेच्या केंद्रस्थानीं असले तरी ते विशाल योजनेच्या दृष्टिकोणांतून पाहिले पाहिजेत. त्या विशाल योजनेंत राष्ट्रीय विकासाच्या सर्व बाजूंचा समावेश केला आहे.

## सहकारी चळवळ.

प्रत्येक विकास-क्षेत्रांत व विशेषतः खेड्यांतील अर्थ-व्यवस्थेंत सहकारी संघटनांकडून केल्या जाणाऱ्या कामावर नियोजनांत भर दिला आहे. लोकशाहींत सहकारिता हें आद्य तत्त्व आहे. हिंदुस्थानांत १,७३,००० सहकारी सोसायट्या आहेत. त्यांची सभासद-संख्या १ कोटि २० लक्ष आहे, व चालू कामाचें भांडवल २३३ कोटि रुपये आहे. गेल्या पांच वर्षांत सहकारी संस्थांची फार वाढ झाली; व त्यांच्याकडून निरनिराळ्या प्रकारच्या चळवळी केल्या जात आहेत. नियोजन अंमलांत आणतांना सरकारी अधिकाऱ्यांनीं जनतेमध्यें सहकारी संघटनांचें महत्त्व त्रिंबवावें; तें सहकारी खात्याचें काम आहे असें मानूं नये. रिझर्व्ह बँक सहकारी संस्थांना मदत देत आहे, व अधिक मदतहि देईल; त्यामुळें या संस्थांचें पांच वर्षांतलें भवितव्य उज्ज्वल आहे. मध्यवर्ती सरकारनें नियोजन-कालांत सहकारितेच्या शिक्षणाकरितां व निरनिराळ्या प्रकारच्या सहकारी संघटनांच्या प्रयोगाकरितां ५० लाख रुपयांची तरतूद केली आहे.

## जमिनींसंबंधीं धोरण.

राष्ट्रीय विकासामध्यें ज़मीन-मालकीचें भवितव्य व जमीन-लागवड हे मूलभूत प्रश्न आहेत. ज्या प्रकारें जमिनीचा प्रश्न सोडविला जाईल त्यावर आर्थिक व सामाजिक संघटनांचें स्वरूप अवलंबून राहील.

आपल्याला एकीकडे शेतींतून या पांच वर्षांत ठरविलेल्या मर्यादेपर्यंत उत्पन्न काढलें पाहिजे, आणि दुसरीकडे जमिनीसंबंधीचें धोरण असें आंखलें पाहिजे कीं, ज्यामुळें संपत्ति व उत्पन्न यांमध्यें असलेली विषमता कमी होईल, शोषणांचें उच्चाटन केलें जाईल, कुळें व मजूर यांना शाश्वती लाभेल, आणि खेड्यांतील निरनिराळ्या वर्गांना समान दर्जा व समान संधि यांबद्दल खात्री वाटेल.

जमिनीविषयक धोरण हें मुख्यतः स्थानिक गरजा व परिस्थिति यांवरून ठरवावें लागेल. तथापि ढोबळ मानानें जमीन सुधारण्याचा कार्यक्रम आंखतांना सर्वत्र समान धोरण असलें पाहिजे. मध्यवर्ती व राज्य-सरकारांनीं ह्या सुधारणा कोणकोणत्या टप्प्यानें करावयाच्या हें ठरवावें.

या नियोजनांत जमीन-सुधारणा करतांना पुढील हितसंबंधींचा विचार केला आहे. ( १ ) मध्यस्थ, ( २ ) मोठे जमीनदार, ( ३ ) लहान व मध्यम मालक, ( ४ ) सालोसालचीं कुळें, ( ५ ) बिगर जमीनदार मजूर. ज्या राज्यांत मध्यस्थ होते त्या राज्यांत ते नाहींसे केले आहेत अगर केले जात आहेत. पूर्वी जमीनदारी-खालीं असलेले जे विभाग होते त्यांच्याकडे व्यवस्थेच्या दृष्टीनें खास लक्ष दिलें पाहिजे, व या विभागांत खेड्यांतील रेकॉर्ड्स्संबंधीं चांगली व्यवस्था केली पाहिजे.

जमिनीची मालकी व लागवड याबद्दलची माहिति सध्यां अगदीं अपुरी व सदोष आहे. १९५३ सालीं याबद्दल एक खास खानेसुमारी करावी.

## प्रत्यक्ष जमीन-मालक.

जे खरे जमीनदार आहेत यांच्यापैकीं फारच थोडे कुळांच्या मदतीशिवाय जमीन करीत असतात. एका व्यक्तीनें किती जमीन धारण करावी हें सर्वसामान्यपणें ठरवावें लागेल. त्याची जमीन फेरवांटणीकरितां किती मिळेल हें पाहण्याची दृष्टि त्यांत नसावी. जमिनीबद्दल ( आणि इतर गोष्टींबद्दलहि ) वैयक्तिक मालकी ही कोणत्या प्रकारची अधिक आहे हें ठरवितांना सार्वजनिक हिताचा विचार करावा; फक्त व्यक्तीच्या हक्काचा व सत्तेचा विचार करूं नये. एका व्यक्तीनें जास्तींत जास्त किती जमीन धारण करावी यासंबंधींचें तत्त्व प्रतिपादन करावें अशी शिफारस केली आहे.

कमाल मर्यादा जी घालावयाची ती ( १ ) पुढें संपादन करावयाच्या व ( २ ) स्वतः लागवडीकरितां घ्यावयाच्या जमिनीकरितांहि घालावी.

वरची मर्यादा ही निरनिराळ्या प्रकारच्या कसोटीवरून ठरवावी. जमीन-महसूल; जमिनींतील उत्पादनाची एकूण ठोक किंमत; निव्वळ उत्पादनाची किंमत; जमिनीचें उत्पन्न; विक्री केली असतां अगर पट्ट्यानें दिली असतां येणारी किंमत.

प्रत्येक राज्यांत ज्या जमीन-धारापद्धति असतील, व महसूल-व्यवस्था असेल, यांच्या पार्श्वभूमीवर कोणती एक पद्धत अगर निरनिराळ्या पद्धतींचें एकत्रीकरण चांगलें उपयुक्त ठरेल हें ठरवावें लागेल. कमाल मर्यादेची जमीन धारण करणें यांत उत्पन्नाची सरासरी मर्यादा पाहणें, किंवा सरासरीनें शेतीचें उत्पादन खरोखर किती होतें हें पाहणें गृहीत धरलेंच आहे. उत्पन्नावर ही मर्यादा ठरविणें शक्य होईल. दुसरी उपयुक्त ठरणारी पद्धति-एका कुटुंबाला विशिष्ट भागांत धारण करितां येणारी जमीन असेल तिची पट काढणें. कुटुंबाला धारण करितां येणारी जमीन म्हणजे स्थानिक किंवा विद्यमान परिस्थितीचें जें तंत्र असेल त्याला अनुसरून एका नांगरानें नांगरतां येणारी जमीन, अगर शेतीच्या हंगामांत इतरांच्या मदतीनें सरासरी आकाराची जी एका कुटुंबाकडून कसली जाणारी जमीन असेल ती. प्रत्येक राज्याला आपापल्या परिस्थितीनुरूप ही मर्यादा ठरवावी लागेल; पण ठोकळ मानानें एका कुटुंबाला धारण करितां येणाऱ्या जमिनीच्या अंदाजें तिप्पट ही मर्यादा योग्य ठरेल.

ही मर्यादा पुढें संपादन करण्यांत येणाऱ्या व स्वतः लागवडीकरितां घेणाऱ्या जमिनीलाहि लागू पडेल. पुढें आणखी कांहीं सूचना मालकीच्या जमिनीबद्दल केल्या आहेत. ह्या जमिनी एक तर कुळाकडे असतात, अगर स्वतः मालक कसत असतो. कुळाकडे असलेल्या जमिनींचे मालक होण्याला कुळांना समर्थ करावें. कुळांना जमीन धारण करण्याचें संरक्षण मिळावें. हें संरक्षण भोगवटयाचे हक्क ( Occupancy rights ) देण्यापर्यंतचें असावें. दुसरें, जमिनीची किंमत कशी काढावयाची व ती कशी घ्यावयाची याचीं तत्त्वें ठरवून टाकावीं. सामान्यतः जी खंडाची किंमत असेल तिच्या पटीनें ही किंमत ठरवावी. ती किंमत देण्याचे हप्ते कांहीं वर्षांचे असावेत. सरकारनें प्रत्यक्ष कुळांशीं संबंध आणावेत, आणि त्यांच्यापासून सारवसुली करावी. या साऱ्याबरोबरच जमिनीची किंमत वसूल करावी.

मोबदल्याचे पैसे मध्यस्थांच्या हक्काप्रमाणेंच कर्जरोख्याच्या स्वरूपांत द्यावेत. जेथें खरे मालक प्रत्यक्ष जमिनी करीत असतील तेथें पुढील दोन तत्त्वें लक्षांत ठेवावींत.

( १ ) एका व्यक्तीनें किती जमीन धारण करावी याची निश्चित मर्यादा घालून द्यावी. सध्यांचे प्रश्न व शेतीविषयक इतिहास यांचा विचार करून राज्यानें स्वतः ही मर्यादा घालावी. १९५३ सालीं जमिनीची व लागवडीची जी खानेसुमारी सूचित केली आहे तींत जरूर ती माहिती मिळाल्यानंतर निर्णय करतां येईल.

( २ ) वैयक्तिक मालकाकडे असलेल्या जमिनीची लागवड व व्यवस्था ही कायद्यानें ठरविल्या जाणाऱ्या कार्यक्षमतेच्या दर्जाला धरून असली पाहिजे.

प्रत्येक राज्यानें जमिनीच्या व्यवस्थेकरितां योग्य असे कायदे करावेत. त्यांत पिकांचा व व्यवस्थेचा दर्जा घालून द्यावा; आणि त्यांत जें अधिक धान्य-उत्पादन होईल तें सरकारला विकावें; सुधारलेल्या बीं-बियाणांची वाढ व उत्पादन करावें; वेतन व राहणीची परिस्थिति, आणि शेतकी-कामगारांकरितां रोजगारी वगैरेंबाबत स्पष्ट जबाबदाऱ्या असाव्यात. हा कायदा प्रथम ठराविक मर्यादेपेक्षां जास्त जमीन धारण करणारांना लावावा. ही ठराविक मर्यादा वैयक्तिक लागवड करतां येणारी; किंवा पुढें संपादन केली जाणारी जितकी जमीन असेल तितकी अगर त्यापेक्षां थोडी जास्त असावी.

वैयक्तिक देखरेखीखालीं असलेल्या भारी उत्पन्नाच्या शेतीचे दोन गट करावेत. क्षमतापूर्वक जिची देखरेख केली जात असेल, पण जिचे तुकडे पाडले असतां उत्पादन घटेल; व दुसरी, या कसोटींखालीं न येणारी. या दुसऱ्या प्रकारच्या जमिनीकरितां जमीन-व्यवस्थेच्या कायद्यानें, योग्य त्या अधिकाऱ्यांना अशी सर्व जमीन किंवा त्या जमिनीचा हिस्सा व्यवस्थेकरितां घेण्याची सत्ता द्यावी. हा हिस्सा व्यक्तीला जर जमीन कसायची असेल तर त्याकरितां जी मर्यादा आहे तिच्यापेक्षां जास्त जमिनीचा असला पाहिजे. त्या कायद्यांत अशा प्रकारें घेतलेली जमीन ही लागवडीकारितां देण्याचा हक्कहि त्यांत असला पाहिजे. ही घेतलेली जमीन लागवड करण्याकरितां देतांना पहिली निवड सहकारी गटांची व नव्या व्यवस्थेखालीं जाण्यापूर्वी तेथें जे मजूर कामाला असतील त्या मजुरांची केली जावी.

ठराविक प्रमाणाबाहेर असलेल्या जमिनींना हा कायदा केव्हां लागू होईल हें कायद्यांत निर्दिष्ट केलेलें असावें. जमिनीच्या व्यवस्थेकरितां नवें यंत्र उभारण्यास व त्याची परिणामकारक बजावणी होण्यास दोन किंवा तीन वर्षांचा काळ लागेल. या सूचनांमुळें जे ऐपतदार मालक असतील त्यांच्या जमिनीची पुष्कळ फेरवांटणी करतां येईल.

## लहान व मध्यम मालक.

एका कुटुंबाकारितां लागणाऱ्या जमिनीपेक्षां जास्त जमीन ज्यांच्याजवळ नसेल त्यांना लहान मालक आणि ज्यांच्याजवळ वैयक्तिक लागवडीकरितां लागणारी जमीन असेल ( जी कुटुंबाच्या जमिनीपेक्षां तिप्पट असेल ) त्यांना मध्यम मालक म्हणतां येईल.

एकंदर धोरणाचा हेतु लहान व मध्यम मालकांना आपलें उत्पादन वाढविण्यास व स्वतः शक्य तोंवर सहकारितेनें संघटित होण्यास उत्तेजन व मदत देण्याचा असावा.

लहान शेतकऱ्याकरितां प्रत्येक राज्यानें लहान तुकडे एकत्र करण्याचें व अमुक एका किमान क्षेत्राखालीं पोट-तुकडे पडूं न देण्याचे कायदे करणें अत्यंत महत्त्वाचें आहे.

लहान व मध्यम मालकांच्या जमिनीचे दोन प्रकार आहेत. प्रत्यक्ष लागवडीखालीं असणाऱ्या व ज्या दरसालीं कुळांना खंडानें दिल्या जातात त्या. आणखीहि त्या जमिनींचे जे स्वतः कसतात, व जे स्वतः कसत नाहींत असे प्रकार पाडतां येतील. कुळाकडे असलेली जमीन व्यक्तिगत कसण्याचा हक्क त्या मालकांना द्यावा कीं जे ती स्वतः अगर आपल्या कुटुंबाच्या मंडळीकडून कसतील. स्वतःकडे कसण्याकरितां जमीन परत घेण्याला उदाहरणार्थ, पांच वर्षें मुदत असावी. जर या मुदतींत जमीन परत घेतली नाहीं तर कुळांना तो कसत असलेली जमीन विकत घेण्याचा हक्क असावा. मोठ्या जमीन-मालकांच्या कुळांना ज्या अटीवर जमिनी खरेदी करतां येतील त्याच अटीवर यांनाहि खरेदी करूं द्याव्यात.

जीं इच्छेनुरूप बदलतां येणारीं कुळें असतील, त्यांच्या जमीन-धारणाची मुदत पांच ते दहा वर्षांची केली जावी. ह्या खंडाचिठ्या पुनः करतां याव्यात, आणि जमिनी परत करण्याला परवानगी फक्त मालक जर जमीन स्वतः करूं इच्छित असेल तरच द्यावी.

जमिनीचा खंड ठरवितांना मुख्य विचार जो करावयाचा तो लागवडीला लागणारा खर्च आणि इतर धोके लक्षांत घेऊन, खंडकऱ्याला योग्य वेतन राहिलें पाहिजे हा करावयाचा. कांहीं राज्यांत उत्पादनाच्या एक तृतीयांश व एक चतुर्थांश पटीपर्यंत खंड कमी करण्यांत आला आहे. आमची अशी सूचना आहे कीं, देशाच्या पुष्कळ विभागांत उत्पादनाच्या $\frac{1}{4}$ किंवा $\frac{1}{5}$ इतका खंडाचा दर असणें हें योग्य होईल.

## बिगर-जमीन-कामगार.

जमिनी विभागणीच्या योजनांचा फायदा मुख्यत्वेंकरून जे खंडकरी म्हणून जमिनी करीत असतील त्यांना मिळणार आहे. भू-दान-यज्ञाच्या चळवळीला खास महत्त्व आहे. कारण ज्याच्याजवळ जमीन नाहीं त्याला मिळणारी देणगीची संधि त्याला अन्यथा प्राप्त होणार नाहीं.

गरीबाच्या पोटीं आलेल्या जन्मामुळें किंवा विशिष्ट परिस्थितीमुळें कांहीं व्यक्तींना जमिनीचे मालक किंवा जमीन कसणारे होतां न आल्याकारणानें सामाजिक दर्जा प्राप्त होत नाहीं. हें खरें असलें तरी त्याकरितां एखादी पद्धत घालून देणें कठीण आहे. म्हणून हा प्रश्न सोडविण्यास संस्थेंतच बदल केला पाहिजे. त्याकरितां सहकारी व्यवस्था-पद्धत आंखणें जरूर आहे. या पद्धतीप्रमाणें गांवची जी जमीन व इतर साधन-सामग्री असेल तिची व्यवस्था व विकास केला जावा. त्यामुळें उत्पादन वाढावें व भिन्न भिन्न प्रकारचें व्हावें, आणि जे धडधाकट व राजी असतील त्यांना रोजगार मिळावा.

## सहकारी शेती.

शेतकी सुधारण्याच्या मार्गांत जर कोणत्या अडचणी असतील तर त्या लहान व बिन किफायतशीर ( uneconomic ) जमिनीच्या. जमिनीवर पडणाऱ्या वाढत्या भारामुळें अशा जमिनीची संख्या वाढत आहे. म्हणून जे लहान व मध्यम शेतकरी असतील त्यांना राजी-खुषीनें आपल्या सहकारी शेती सोसायट्या काढण्यास उत्तेजन व साहाय्य द्यावें.

## सहकारी ग्राम-व्यवस्था.

सहकारी शेती व इतर सहकारी चळवळीमुळें खेड्यांतील सामाजिक व आर्थिक जीवन विकसित होण्यास मदत होईल, व लहान आणि मध्यम शेतकऱ्यांचा फायदा होईल. ग्रामीण पुनर्घटनेचा फार व्यापक दृष्टीनें विचार केला पाहिजे. ‘ कुटुंबापुरती जमीन ’ हें उद्दिष्ट सहकारी पद्धतीच्या संघटनावर अधिकाधिक भर देऊन ‘ कसेल त्याची जमीन ’ हें तत्त्व व्यवहारांत आणण्याचा मार्ग आहे. हें तत्त्व परिणामकारक रीतीनें यशस्वी करण्यास ग्रामीण अर्थ-व्यवस्था विकसित करण्याचें ध्येय व्यापक असलें पाहिजे. खेड्यांतील जनतेकडून उठाव मिळेल व खेड्यांच्या विकासाकरितां कार्यक्रम हातीं घेण्याची जबाबदारी घेईल अशा ग्राम-संघटनांची जरूरी आहे. ग्राम-पंचायतींनीं हें काम करावें असें नियोजनांत सुचविलें आहे. जमिनीच्या धोरणाबद्दल ग्राम-पंचायतीशिवाय दुसऱ्या कोणाला करितां न येण्यासारख्या महत्त्वाच्या गोष्टी आहेत. कूळ-कायद्याची अंमलबजावणी, बिगर जमिनीच्या कामगार-कुळांचें हितरक्षण, लहान जमीन-मालकांना कमींत कमी जमीन-क्षेत्र देणें, मोठ्या जमीनदाराकडून घेतलेल्या जमिनीवर बसविण्याकरितां नव्यांची निवड, व खेड्यांतील पड-जमिनीची लागवड, हीं तीं कामें आहेत. ग्राम-पंचायतीनें खेड्यांतील

जमिनीची सुधारणा व व्यवस्था करावी असें सुचविलें आहे. कायद्यानें निर्धारित केलेल्या मर्यादेपर्यंत भाडेपट्ट्यानें द्यावयाची जमीन पंचायतीमार्फतच दिली जावी.

जमिनीवर फार दडपण आहे, व इतर रोजगारीचे मार्ग अजून वाढले नाहींत. त्यामुळें साऱ्या गांवच्या जमिनीची व्यवस्था सहकारी पद्धतीनें केली जावी, आणि शेतीव्यतिरिक्त अन्य व्यवसाय निर्माण करावेत, व समाज-सेवा-कार्येंहि त्या पद्धतीनें केलीं जावींत.

जमीन-व्यवस्थेचा जो कायदा केला जावा, त्यांत ग्राम-पंचायतीला खेड्यांतील ज्या जमिनींची लागवड केली जात नसेल, किंवा ज्या स्वतः मालकांकडून केल्या जात नसतील त्यांची व्यवस्था करण्याचे हक्क द्यावेत. दुसरें, त्या कायद्यांत अशीहि तरतूद करावी कीं, जर बहुसंख्य मालक व खंडकरी कुळें खेड्यांतील जमिनीची व्यवस्था सहकारी पद्धतीनें करावी असें ठरवण्याची इच्छा करतील, तर त्याचा निर्णय साऱ्या खेड्यावर बंधनकारक असावा. त्यांच्यांत विश्वास निर्माण व्हावा म्हणून, कायद्यांत असेंहि असावें कीं, जे सहकारी व्यवस्थेला अनुकूल असतील, त्यांच्याकडे संस्था या नात्यानें खेड्यांतील सर्व जमिनींपैकीं कमींत कमी निम्या जमिनीचे कायमचे हक्क राहतील, आणि याकरितां एखाद्या व्यक्तीला पुढेंमागें स्वतः कसण्याकरितां परत जमीन घेण्याची जी मर्यादा असेल ती जास्त असली तरी विचारांत घेतली जाणार नाहीं.

खेडयाची व्यवस्था सहकारितेनें करावी असें सांगण्याचा मूळ उद्देश असा आहे कीं, खेड्याची जी जमीन व इतर सामग्री असेल त्याची नीट संघटना आणि त्याचा विकास खेड्यांतील साऱ्या लोकांच्या दृष्टीनें करतां येईल. मालकी हक्क कोणाचे, मोबदल्याला आधार कोणता, खंडाचें प्रमाण काय असावें, किंवा मालकी हक्काकरितां कोणत्या दरानें नफ्याचा हिस्सा द्यावा हें सर्व राज्याच्या विद्यमान कायद्यानें ठरवावें. जमीन-व्यवस्थेचा कायदा फक्त, खेड्यांतील जनतेला आपली सर्व जमीन एकच जमीन आहे या भावनेनें व्यवस्था करावयास लावील. त्या जमिनीची प्रत्यक्ष लागवड, जसें शक्य होईल त्याप्रमाणें, कौटुंबिक जमीन म्हणून, लहान लहान गट करून, किंवा निरनिराळ्या पद्धतींचें एकत्रीकरण करून करतां येईल. जसजशी तान्त्रिक वाढ होईल, आणि शेतीशिवाय अन्य व्यवसायांत अधिक कामधंदा मिळेल, तसतशीं अनेक कामें सहकारितेच्या पद्धतीनें करतां येतील. खेड्यांतील संघटनेचा अत्यंत सोईस्कर नमुना तयार होण्यापूर्वी पुष्कळसे प्रयोग करावे लागतील. तथापि या सर्व प्रयोगांचें उद्दिष्ट सहकारी ग्राम-व्यवस्था निर्माण करण्याचें असावें. त्यामुळेंच अनेक कारणांनीं आलेली विषमता दूर होईल.

## जमीन सुधारण्याची मध्यवर्ती संघटना.

मध्यवर्ती सरकारनें जमीन सुधारण्याकरितां मध्यवर्ती संघटना स्थापन करावी. तिनें जमीन-सुधारणा-कार्यक्रमाचें मूल्यमापन करावें, जमिनीच्या प्रश्नांची तपासणी करावी, देशांतील निरनिराळ्या विभागांतील सहकारी शेतीच्या अनुभवाचा अभ्यास करावा, बिनचूक माहिती मिळवावी, व या सर्वासंबंधींच्या माहितीचें दप्तर चांगलें ठेवावें.

## शेतींतील कामगार.

१९५१ च्या खानेसुमारींत खेड्यांतील २९ कोटि ५० लक्ष लोकसंख्येपैकीं २४ कोटि ९० लक्ष लोकसंख्या शेतीमध्यें असल्याचें नमूद केलें आहे. त्यांतील १८ टक्के लोकसंख्या, लागवड करणारे कामगार व त्यांच्यावर अवलंबून असणाऱ्यांची आहे. शेती-कामगारांचे स्थूल मानानें दोन वर्ग पडतात. हंगामी कामगार, आणि कायमचे कामगार. त्यांतील हंगामी कामगार ८९ टक्के आहेत.

खेड्यांतील उद्योगधंद्याचा जसजसा ऱ्हास होत गेला, तसतसे त्या धंद्यांतील कारागीर कांहीं वेळ मजुरी करणारे कामगार बनले. जमिनीच्या तुकड्यांत झालेली वाढ व पडलेले पोटहिस्से, यामुळें जे शेतकरी होते त्यांना हंगामी मजूर व्हावें लागलें. शेतीचीं मोठालीं क्षेत्रें घटत चाललीं, त्यामुळें व अन्य कारणांमुळें हा प्रश्न आधिकच तीव्र होत चालला. ज्यांना सतत काम मिळत नाहीं, आणि ज्यांना सामाजिक अडथळ्यामुळें हाल भोगावे लागतात, अशांची फार मोठी संख्या असणें हें एक भयंकर दुर्बलतेचें मूळ आहे, एवढेंच नव्हे तर सध्यांच्या शेती-पद्धतीच्या अस्थिरतेचेंहि मूळ आहे असें मानलें पाहिजे.

पंचवार्षिक कार्यक्रम हा प्राधान्येंकरून, जीं शेतकऱ्यांच्या आजच्या स्थितीला आर्थिक व सामाजिक कारणें आहेत तीं दूर करण्याचा प्रयत्न आहे. शेती-उत्पादन, जमीन-सुधारणा, खेड्यांची सहकारितेच्या दिशेनें पुनर्घटना, ग्रामीण उद्योगधंद्यांची वाढ, व नवीं कामें वगैरे कार्यक्रम हे शेतकऱ्याला अधिक संपूर्ण कामधंदा मिळण्यास निःसंशय साहाय्यक होतील. मागासलेल्या जमातींच्या कल्याणाकरितां नियोजनांत जी भरपूर तजवीज केली आहे तिनें त्यांना खास मदत होईल. मध्यवर्ती सरकारच्या नियोजनांत जे बिगर शेती मजूर आहेत त्यांच्या पुनर्वसनाच्या योजनेकरितां दोन कोटि रुपये खास राखून ठेवले आहेत. किमान वेतन कायदा हा देशांतील आधिकांश

भागाला लागू करण्यांत येत आहे. हा कायदा ज्यांचीं वेतनें अगदींच कमी असतात त्यांना व मोठाल्या शेतांवरील नोकऱ्यांना राज्य-सरकार लावीत आहे. शेतकऱ्याच्या सुस्थितीकरितां नियोजनांत पुढील कांहीं शिफारशी केल्या आहेत.

( १ ) सध्यांच्या खेड्यांत व खेड्याबाहेर वाढलेल्या भागांत घराकरितां ज्या जागा असतील त्या वहिवाटीच्या हक्कानें देणें; त्याचप्रमाणें जेथें शक्य असेल तेथें भाजीपाला लावण्यास लहान जागा देणें.

( २ ) भू-दान-यज्ञाच्या चळवळीला पाठिंबा तो द्यावयाचा जो बिन जमिनीच्या कामगारांकरितां खास मदत करून द्यावा. भू-दान हा ग्राम-विकासाचा कायमचा भाग असावा.

( ३ ) शक्य तितक्या आधिक, कामगारांच्या सहकारी संस्था काढाव्यात. या संस्थेमार्फत जीं स्थानिक पाटबंधारे बांधण्याचीं व इतर कामें असतील तीं करवून घ्यावींत.

( ४ ) जमीन नसणारे जे शेत-मजूर असतील त्यांचे गटांना आणि जे लहान, बिनकिफायतशीर जमीन धारण करणारे असतील त्यांना सहकारी पद्धतीनें वसवण्याकारितां, नव्यानें लागवडीस आणली जाणारी जमीन आणि लागवडीला योग्य अशी पड-जमीन राखून ठेवावी.

( ५ ) घरें बांधण्याकारितां, बैल व शेतीचीं उपकरणीं खरेदी करण्याकारितां, ज्या दुय्यम धंद्यांचें शिक्षण मिळालें असेल त्या धंद्याकारितां, जे बिनशेतीचे मजूर असतलि त्यांच्या सहकारी गटांना आर्थिक मदत द्यावी.

( ६ ) पुष्कळ राज्यांत ज्याप्रमाणें शिक्षणाकारितां शिष्यवृत्त्या, व धंदे आणि यान्त्रिक शिक्षणाकारितां मदत दिली जाते, त्याप्रमाणें सर्वत्र दिली जावी.

( ७ ) खेड्यांत ज्या सरकारी नोकऱ्यांचा विस्तार करावयाचा आहे, त्या नोकरांनीं जितकें शेतकऱ्यांच्या हिताकडे व रोजगाराकडे लक्ष जबाबदारीनें द्यावयाचें आहे तितकेंच शेती-कामगाराकडे द्यावयाचें आहे. ग्राम-पंचायतीवर कामकरी शेतकऱ्यांच्या सुस्थितीची जबाबदारी आहे हें खास त्यांनीं ध्यानांत ठेवलें पाहिजे.

## अन्नविषयक धोरण.

नियोजनाच्या यशस्वितेकरितां अन्नविषयक धोरण सुस्पष्ट असणें ही एक अपरिहार्य अट आहे. किंमतीची जी रचना आहे तींत अन्नधान्याला आद्यस्थान आहे; कारण अन्नाच्या किंमती जर वाढल्या तर राहणीचा खर्च वाढतो, आणि सर्वच

उत्पादनाचे खर्च वाढत जातात. अन्नधान्याचें नियंत्रण हें जरी युद्ध-कालीन दुर्मिळतेनें निर्माण झालेल्या अपवादात्मक परिस्थितीमुळें करावें लागलें, तरी नियोजित अर्थ-व्यवस्थेंत नियंत्रणाला कांहीं निश्चित स्वरूपाचीं कामें करावीं लागतात. उदाहरणार्थ, जो अधिक गरीब-वर्ग आहे त्याच्या खाण्याच्या किमान प्रमाणाचें संरक्षण करावें लागतें; जे सुस्थितींत आहेत त्यांच्याकडून प्रमाणबाह्य अन्न खर्चीं पडणार नाहीं, त्यांत भपकेबाजपणा असणार नाहीं या गोष्टी सांभाळाव्या लागतात. नियंत्रणामुळें जी बेकार मनुष्य-शक्ति आहे तिचा देशाच्या कार्यक्रमाकरितां प्रत्यक्ष उपयोग करण्याचा मार्ग सुलभ होतो.

जरी आपल्या देशांत नियंत्रणाची पद्धत बरींच वर्षें चालू आहे, तरी वेळोवेळीं ही पद्धत तुलनेनें एकंदर देशाला नफ्याची कीं तोट्याची याबद्दल संशय व्यक्त करण्यांत आले आहेत. अनुभवाचे धडे हे अचूक असतात. देशामध्यें मालाचा तुटवडा असल्यामुळें किंवा बाहेर-देशांत प्रतिकूल परिस्थिति असल्यामुळें ज्या वेळीं अर्थव्यवस्थे-वर दाब पडतो, अगर दाब पडण्याचा संभव असतो, त्या वेळीं खुल्या बाजारावर अवलंबून राहतां येत नाहीं. दुसरें असें कीं,ज्या निर्नियंत्रणाच्या पुष्कळ सूचना येतात, आणि खुला बाजार सुरू करा म्हणून सांगितलें जातें, त्यांत स्वस्त धान्याचीं दुकानें, व्यापाऱ्यांना परवाने, सांठे ताब्यांत घेणें, वगैरे संरक्षक उपाय गृहीत धरलेले असतात. हे नियंत्रणाचे प्रकार सुरुवातीला योजून पाहण्यांत आले, व ते असमाधानकारक ठरले. त्यामुळेंच धान्यवसुली, धान्याच्या ने-आणीवर बंधनें, किंमतीचें नियंत्रण, व शिधावांटप यांसारखे कडक उपाय योजावे लागले.

'अधिक धान्य पिकवा' मोहिमेमुळें लहान लहान पाटबंधाऱ्यांच्या द्वारां व जमीन-सुधारणेनें देशांतील उत्पादन-क्षमता वाढली असली तरी हें उत्पादन किती वाढलें आहे यासंबंधींचे निश्चित आंकडे उपलब्ध नाहींत. नव्या प्रवृत्तींचा जम बसण्यास कांहीं काळ लागेल. देशांतील निरनिराळ्या विभागांत अन्नधान्य खाण्याचें प्रमाण भिन्न भिन्न आहे. त्यामुळें उत्पादन व गरजा यांच्या आधारावर देशाला किती तुटीची भरपाई करावी लागेल हें अजमावणें कठीण आहे. तथापि गेल्या कांहीं वर्षांत आपण दरसाल सरासरीनें ३० लक्ष टन धान्य आयात करीत होतों हें सत्य आहे. १९४८ पासून आयात धान्याची किंमत ७५० कोटि रुपये झाली.

नियोजन-कालांत अन्नधान्याचें धोरण पुढीलप्रमाणें असलेंच पाहिजे. देशांतील उत्पादन वाढावेंणें, त्याची वांटणी जितकी योग्य प्रमाणांत करतां येईल तितकी करणें,

आणि पायरीपायरीनें धान्याची आयात बंद करणें. ज्या अर्थी अधिक धान्य उत्पादनाचे जे प्रयत्न केले जात आहेत त्याचे संपूर्ण परिणाम कालान्तरानेंच दिसणार आहेत, त्या अर्थी आपलें धोरण सापेक्षतः दुर्मिळता व ओढाताण पुढें चालूच राहणार आहे या भूमिकेवरून ठरविलें पाहिजे. आपल्या या नियोजनांत भारी प्रमाणांत आपण भांडवल घालण्याचें कल्पित आहों, त्यामुळें ओढाताण व दुर्मिळता होईल. अन्नधान्याची नियंत्रण-पद्धति जर स्थिरपणें राखावयाची असेल तर तिची किल्ली शिधा-वांटप, धान्य-वसुली, व कमींत कमी कांहीं आयात हीच असली पाहिजे.

१९४७ सालीं नियंत्रणें उठवलीं, आणि किंमती ३० टक्क्यांनीं वाढल्या. १९४८ सालीं पुनः नियंत्रणें बसविलीं व कांहीं प्रमाणांत किंमती स्थिरावल्या. पण हा कल १९४९ सालीं जेव्हां रुपयाचें व कित्येक चलनाचें अवमूलन केलें तेव्हां कांहींसा बिघडला. कोरियन युद्धामुळें बाजारांत खळबळ झाली, आणि किंमती वाढण्याला त्याची मदत झाली; पण त्या वेळीं फुगवटा थोपविण्याचें धोरण जें अवमूलनापाठोपाठ अवलंबण्यांत आलें, त्यामुळें किंमती स्थिरावण्यास मदत झाली. एकंदर किंमतीचा गेल्या पांच वर्षांतला कल पाहिला तर १९४७–४८ सालीं जें क्षेत्र आपण हातचें घालवलें तें पुन्हा काबीज करतां आलें नाहीं हें स्पष्ट आहे. सध्यांच्या किंमतीचें मान हें मध्यम वर्गाला जाचक होत आहे, व त्याचें न्याय्य हितरक्षण करणें आवश्यक आहे. त्याकरितां किंमती चढूं न देण्याच्या धोरणाची जरूरी शिल्लक उरते. दुसरें असें कीं, जरी एकूण किंमती १९५१ एप्रिलपासून खालीं येत आहेत, तरी ह्या किंमती औद्योगिक कच्च्या मालाच्या बाबतींत अधिक सुस्पष्ट आहेत. अन्नधान्याच्या किंमती अगदीं कमी प्रमाणांत उतरल्या आहेत. गहूं एक टक्का व तांदूळ ५ टक्के. यामुळेंच राहणीचा निर्देशांक फारसा खालीं येत नाहीं.

किंमती स्थिर राखण्याच्या धोरणामध्यें कांहीं कमाल किंमती व कांहीं किमान किंमती ह्या दृष्टीसमोर असल्या पाहिजेत. ज्या वेळीं अर्थ-व्यवस्थेवर भाव-वाढीचें दडपण पडत असतें, त्या वेळीं कमाल किंमती कायम राखण्यावर आपला भर असला पाहिजे. पण जर किंमती खालीं येण्याकडे प्रवृत्ति होऊं लागली तर धान्य-वसुलीच्या नियंत्रित किंमती स्पष्टपणें ठरविल्या गेल्या पाहिजेत. त्यामुळेंच जो उत्पादक आहे त्याच्या हिताचें रक्षण अधिक किंमती घसरण्याचें थांबवून करतां येईल.

भांडवल खर्चीं घालण्याच्या कार्यक्रमावर धान्य-धोरणाचा प्रत्यक्ष परिणाम होणार आहे. कारण जितका अन्नधान्याचा उपलब्ध होणारा सांठा अधिक असेल व त्या

सांठ्याचा जितका परिणामकारक रीतीनें उठाव केला जाईल तितकें समाजाकडून केलें जाणारें भांडवल खर्चीं घालण्याचे तांतडीचे प्रयत्न अधिक होतील. कारण बांधकामा-करितां, व भांडवली सामान आणि सरंजाम यांच्या उत्पादनाकरतां लावलेली मजूर-सेना कायम टिकविण्याकरतां अन्न हें महत्त्वाचें साधन आहे. जसजसे विकास-कार्यक्रम वाढत जातील तसतसें खेड्याकडे अधिक अधिक उत्पन्न येत जाईल, आणि त्या उत्पन्नामुळें अन्नाची मागणी वाढेल. म्हणून जें उपलब्ध धान्य असेल त्याची हालचाल व वांटणी योग्य प्रकारें केली पाहिजे. वाढगाऱ्या मागणीमुळें साऱ्या अर्थ-व्यवस्थेवर किंमती वाढीचें दडपण येऊं नये याला जपलें पाहिजे. विकास-योजनेकरितां द्रव्य-योजना किती तुटीची करावयाची हेंहि अन्नाच्या योग्य धोरणावर अवलंबून आहे. तुटीच्या द्रव्य-योजनेची किती मर्यादा असावी हा नुसता पैशाचा प्रश्न नाहीं. त्या पैशामुळें ज्यांची द्रव्यप्राप्ति अधिक आहे ते फुगवट्याचीं दडपणें निर्माण करतील, व साऱ्या अर्थ-व्यवस्थेवर अनिष्ट परिणाम होतील. म्हणून जे आधिक उत्पन्नाचे लोक आहेत त्यांचें नियंत्रण केलें, आणि अन्नधान्याचा व जरूरीच्या वस्तूंचा पुरवठा व वांटणी योग्य किंमतीला करण्याची व्यवस्था केली, तर तुटीची द्रव्य-योजना अधिक संपूर्ण काम देण्याकरितां बिनधोकपणें पुढें चालू करतां येईल.

वर नमूद केलेल्या गोष्टींकरितां सध्यां जो अन्नधान्य-नियंत्रणाचा सांगाडा आहे तो आहे तसाच या पांच वर्षांत ठेवावा. आमचें असें स्पष्ट मत आहे कीं, आपल्या देशांतील धान्य-उत्पादन हें ७५ लाख टनांपर्यंत वाढल्याशिवाय आपल्या देशांतील गरजा योग्य रीतीनें भागविण्याकरितां खात्रीचा व पुरेसा अन्नसांठा आपल्याजवळ आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं.

हें अधिक उत्पादनाचें शिखर आपण गांठल्यावर, आणि देशांतील एका भागांतून दुसऱ्या भागांत धान्याची ने-आण जलदीनें करण्याची वाहतूक-व्यवस्था खात्रीची झाल्यावर आपल्याला नियंत्रणें सैल करतां येतील, किंवा त्यांचें स्वरूप बदलतां येईल. हीं नियंत्रणें कोणत्या मर्यादेपर्यंत सैल करतां किंवा बदलतां येतील हें त्या वेळीं आपल्याला जास्तींत जास्त किती भांडवल त्यानंतर गुंतवावें लागेल यावर अवलंबून राहील.

एका विशिष्ट आकाराच्या वरचीं गांवें व शहरें जीं निरनिराळ्या राज्यांत निरनिराळीं असतील त्यांना सक्तीची शिधा-वांटप-पद्धत लागू केली पाहिजे; आणि त्रावणकोर, कोचीनसारखीं जीं भयंकर तुटीचीं राज्यें आहेत त्यांच्या गरजांकडे तसेंच लक्ष दिलें पाहिजे. इतर विभागाकरितां बिन-सक्तीच्या शिधा-वांटप-पद्धतीचें नियंत्रित

वांटप मामुली काळांत पुरेसें होईल. धान्य-वसुलीचे प्रकार दोन आहेत. सक्तीची व लेव्हीची. त्यांतील कोणताहि प्रकार राज्यांनीं आपापल्या स्थानिक परिस्थितीप्रमाणें ठरवावा. जीं अधिक उत्पादनाचीं राज्यें आहेत त्यांतून अधिक धान्य मिळेल अशी व्यवस्था करावी.

धान्य-नियंत्रण हें अखिल भारताचें धोरण म्हणून अंमलांत आणावें. निरनिराळ्या राज्यांत कारभाराच्या व्यवस्थेनुसार तपशिलांत फेरफार होण्याची शक्यता आहे हें खरें; पण धोरणाचें उद्दिष्ट अधिक धान्य पिकवणाऱ्या प्रत्येक राज्याकडून जास्तींत जास्त धान्य मध्यवर्ती सांठ्याकरितां घेण्याचें असावें. प्रत्येक तुटीच्या राज्यांत वसुली व वांटपपद्धत अशी असावी कीं, जीमुळें मध्यवर्तीकडून कमींत कमीं धान्य मागितलें जाईल. वसुली व विक्रीचे दर ठरविणें, आणि निरनिराळ्या राज्यांतील नियंत्रणाच्या पद्धतींत सुसंगति आणणें याची जबाबदारी मध्यवर्तीकडे राहिली पाहिजे.

शेवटची सूचना अशी कीं, जगांत तांदुळाची असलेली कमतरता व आयात तांदुळाकरितां द्यावी लागणारी भारी किंमत याचा विचार करतां, जनतेनें आपल्या आहाराच्या संवयी बदलणें इष्ट आहे. आपल्याला एकूण लागणाऱ्या तांदुळापैकीं शेंकडा २ ते ३ टक्केच तांदूळ आपल्याकडे कमी होतो. एवढी कमतरता दूर करणें कठीण नाहीं. त्यासाठीं अल्प प्रमाणांत गहूं किंवा इतर पूरक अन्नें नित्य संवयीच्या तांदुळाच्या अन्नाऐवजीं खावींत.

## अधिक उत्पादन इष्टांक.

अधिक उत्पादन आपणास किती धरावें लागेल हें पुढें दिलें आहे.

| पदार्थ | प्रमाण ( लाख ) | शेंकडा वाढ |
|---|---|---|
| अन्नधान्यें | ७·६ ( टन ) * | १४ |
| कापूस | १२·६ ( गांठी ) | ४२ |
| ताग | २०९ ( गांठी ) | ६३ |
| ऊंस | ७०,००० ( टन ) ¶ | १२ |
| तेल-बिंया | ४०,००० ( टन ) | ८ |

* ७६ लाख टनांत ४० लाख टन तांदूळ, २० लाख टन गहूं, १० लाख टन हरभरे, तूर वगैरे, व ५ लाख टन ज्वारी वगैरे येतात.

¶ गुळाच्या प्रमाणांत.

हे जे इष्टांकाचे आंकडे दिले आहेत ते राज्यांबरोबर फार दिवस वाटाघाट करून काढले आहेत. प्रथम ते १९५१ च्या उन्हाळ्यांत तयार केले, व नंतर त्यांची फेर-तपासणी १९५२ च्या सुरुवातीला केली. पैशाच्या पिकांतील इष्ट वाढीमध्यें बदल झाला नसला तरी संकल्पित भांडवल घातल्यावर पांच वर्षांमध्यें फक्त ६५ लाख टनच अन्नधान्यांत वाढ होईल. नियोजनाच्या पहिल्या मसुद्यांत ही वाढ ७२ लाख टन होईल असें धरलें होतें, शिवाय अन्न-धान्याकडील जमीन जर धंद्याच्या पिकाकडे लावली तर नक्त वाढ फक्त ६० लाख टनच होईल. ही तूट कशी भरून काढतां येईल याची नुक्तीच 'अधिक धान्य पिकवा' चौकशी-कमिटीनें तपासणी केली, व त्यांनीं ७२ लाख उत्पादन होण्याकरितां आणखी कार्यक्रम हातीं घेण्याची शिफारस केली आहे.

ह्या उत्पादनाच्या कार्यक्रमाचे दोन भाग आहेत.

( १ ) राज्यांच्या योजनांप्रमाणें १२५ कोटि रुपये भांडवल घालून अधिक नक्त ६० लाख टन उत्पादन वाढेल.

( २ ) नियोजन-समितीनें पुरवणी-योजना सुचविल्या आहेत. त्या योजनांमुळें कमींत कमी १६ लाख टन अधिक धान्य निर्माण व्हावयास पाहिजे.

प्रत्येक राज्यानें शेतकीचें उत्पादन जास्तींत जास्त किती वाढविलें पाहिजे याचे आंकडे खालीं दिले आहेत.

| | अन्नधान्यें (हजार टन) | कापूस (हजार गांठी) | ताग (हजार गांठी) | ऊंस (हजार टन) | तेल-बिंया ( हजार टन ) |
|---|---|---|---|---|---|
| 'अ' भाग राज्यें | | | | | |
| आसाम | २५५·९ | ... | २२५ | ... | ... |
| बिहार | ७७५·९ | ... | ३९० | ५० | ... |
| मुंबई | ३७६·५ | २७५ | ... | ८७ | १० |
| मध्यप्रदेश | २८१·० | १७० | ... | ... | १० |
| मद्रास | ८९०·० | १८० | ... | ८० | १०० |
| ओरिसा | २५९·६ | ... | २०० | ... | ४ |
| पंजाब | ४६३·८ | १५० | ... | ७० | ४ |
| उत्तर प्रदेश | ९८३·० | ४० | २५० | ४०० | ६१ |
| प. बंगाल | ५५३·१ | ... | १,००० | ... | ५ |

| | अन्नधान्यें (हजार टन) | कापूस (हजार गांठी) | ताग (हजार गांठी) | ऊंस (हजार टन) | तेल-बिंया (हजार टन) |
|---|---|---|---|---|---|
| 'ब' भाग राज्यें | | | | | |
| हैद्राबाद | ६२४·५ | २०० | ... | ... | १५० |
| मध्यभारत | १६८·१ | ९२ | ... | ... | २५ |
| म्हैसूर | ९७·५ | ८ | ... | ... | ५ |
| पेप्सू | १७०·५ | ८० | ... | ७ | १ |
| राजस्थान | १८६·० | ५० | ... | ... | १६ |
| सौराष्ट्र | ८८·३ | ६ | ... | ... | १ |
| त्रावणकोर को. | १३१·१ | ... | ... | ... | ... |
| 'क' वर्ग राज्यें | | | | | |
| अजमीर | १२·५ | ... | ... | ... | ... |
| भोपाळ | १०३·८ | ६ | ... | ४·६ | ४ |
| बिलासपूर | ४·७ | ... | ... | ... | ... |
| कूर्ग | ३·० | ... | ... | ... | ... |
| दिल्ली | ४·५ | ... | ... | ·२ | ... |
| हिमाचल | ४४·४ | ... | ... | ... | ... |
| कच्छ | ५·७ | १ | ... | ... | १ |
| त्रिपुरा | २·३ | ... | २५ | ... | ... |
| विंध्य | ३०·४ | ... | ... | १·२ | ३ |
| एकूण राज्यें | ६५१०·१ | १,२५८ | २,०९० | ७०० | ४०० |
| पुरवणी-योजना | १६००·०§ | | | | |
| एकूण संघयोजना | ८११०·१ | | | | |
| उणें पैशाच्या पिकाकडे उपयोग | –५००·० | | | | |
| निव्वळ वाढ | ७६१०·१ | १,२५८ | २,०९० | ७०० | ४०० |

ज्या पुरवणी-कार्यक्रमामुळें ( ११ लाख टन ) उत्पादन वाढणार आहे तें खालीलप्रमाणें:—

( १ ) समाज-विकास-योजना ( ९० कोटि रुपये )

( २ ) लहान पाटबंधाऱ्यांकरितां अधिक तरतूद ( ३० कोटि रुपये )

§ यामध्यें समाज-विकास-योजना (कम्युनिटी प्रॉजेक्ट्स्) मुळें व जास्त उत्पन्नाच्या विभागांतले ५०,००० टन धरले आहेत.

| | |
|---|---|
| ( ३ ) १९५२–५३ सालीं अधिक धान्य पिकविण्याकरितां केलेली तरतूद | ( १० कोटि रुपये ) |
| ( ४ ) नालिका-कूप ( ट्यूबवेल्स ) कार्यक्रम | ( ६ कोटि रुपये ) |
| ( ५ ) राष्ट्रीय विस्तार-संघटना | ( ३ कोटि रुपये ) |

या पुरवणी-कार्यक्रमाचे तपशील राज्य-सरकारांच्या सल्लयानें लवकरच ठरवावयाचे आहेत. खताचा कार्यक्रम हा नियोजनाच्या उत्तर-काळांत विस्तृत व्हावयाचा आहे. सध्यां वाटलें होतें त्यापेक्षां शेतीला द्रव्य-साहाय्य देण्याची व्यवस्था अधिक मोठ्या प्रमाणावर करण्यांत आली आहे.

६५ लक्ष टन अधिक धान्य जें राज्यांच्या योजनांतून वाढेल असें म्हटलें आहे त्या योजना पुढीलप्रमाणें :— ( त्यांत वर दाखविल्याप्रमाणें ५ लाख टन पैशाच्या पिकाकडे जमीन लावल्यामुळें घटणार आहे. )

| | दशलक्ष टन |
|---|---|
| मोठ्या पाटाच्या योजना ... ... ... | २·०१ |
| लहान पाटाच्या योजना ... ... ... | १·७८ |
| जमीन-सुधारणा व जमीन रिक्लमेशन ... ... | १·५१ |
| खतें ... ... ... ... | ·६५ |
| सुधारलेलीं बीं-बियाणीं ... ... ... | ·५६ |
| | ६·५१ |

निरनिराळ्या कार्यक्रमांपासून होणाऱ्या अधिक उत्पादनांचा अंदाज सावध-गिरीनें केला आहे. सुधारलेल्या बीं-बियाणांचा व खतांचा उपयोग करण्यासंबंधीं ज्या योजना आहेत त्यांपासून होणारें उत्पादन अंदाजल्यापेक्षां जास्त असणें शक्य असलें तरी तो उपयोग शेतीच्या वळणीं पडल्याशिवाय अधिक अंदाजी उत्पादन धरणें हें कांहींसें धोक्याचें आहे.

धंद्यांकरितां लागणाऱ्या पिकांच्या उत्पादनाचें जें लक्ष्य धरलें आहे तें या समजुती-वर कीं, स्थूल मानानें अन्न-धान्याच्या व इतर पिकांच्या सापेक्ष किंमती ह्या त्या लक्ष्यांचा ज्या वेळीं अंदाज केला त्या वेळच्या किंमतीच्या मानाला अनुसरूनच राहतील. धंद्याच्या पिकांवर धान्याच्या पिकांपेक्षां किंमतींतील चढउतार हे अधिक परिणाम करतात. म्हणून या नियोजनांत निरनिराळ्या पिकांच्या निरनिराळ्या किंमतींची लालूच बुद्धिपुरस्सर टाळण्याच्या आवश्यकतेवर भर दिला आहे. कांहीं पिकांना फाजील किंमतीच्या बाबतींत दिलेलें उत्तेजन, मग तें उत्तेजन किंमतींच्या

चढउतारामुळें असो किंवा नियंत्रणें सैल केल्यामुळें असो, शेती-उत्पादनाचें लक्ष्य गांठण्याच्या मार्गांत वारंवार धोके आणील. त्याकरितां किंमतीचें धोरण हें शेती-योजना यशस्वी करण्याचें प्रमुख घटक आहे.

ह्या नियोजनांत ठोकळ मानानें अन्न-धान्यें, भाजीपाला, मासे, दूधदुभतें वगैरे उत्पादनाचें लक्ष्य सुचविलें आहे व कांहीं सूचनाहि केल्या आहेत.

आधिक उत्पादनाच्या लक्ष्यामुळें या नियोजनांत किती प्रचंड उद्योग करावयाचा आहे हें स्थूलपणें समजून येतें. शेतीच्या उत्पादनांत असलेले धोके व आनिश्चितता ही नेहमीं गृहीत धरलीच पाहिजे. प्रत्येक राज्यांतील लक्ष्यें हीं जिल्हावार व उप-जिल्हावार वांटून दिलीं पाहिजेत. नियोजनाच्या शेतीच्या तपशीलवार योजना ह्या ज्या विभागांत परिश्रमपूर्वक विकास होणार असेल तेथेंच शक्य होतील. उदाहरणार्थ, समाज-विकास-योजना जेथें चालू असतील तेथें जास्त भर जो द्यावयाचा तो विकासाकरितां खेड्यांत एका मध्यस्थ-संस्थेची उभारणी करण्यावर, आणि सहकारी संस्था बलिष्ठ करण्यावर द्यावा. विशिष्ट पिकाकरितां, वैयक्तिक जमिनीच्या प्रमाणावर किंवा क्षेत्र निश्चित करण्यावर भर देऊन सामान्यतः फारसें साधणार नाहीं. सर्वसामान्यपणें प्रत्येक शेतीनें व प्रत्येक खेड्यानें पिकांची योजना अशी आंखावी कीं, जीमुळें उपलब्ध असणाऱ्या भौतिक साधनांचा जास्तींत जास्त उपयोग करून घेतला जाईल. वैयक्तिक शेती ही ज्या प्रमाणांत सहकारी शेतींत समाविष्ट होईल त्या प्रमाणांत पिकांची आंखणी करतां येईल. या आंखणीचा उपयोग उत्पादनाला वळण लावण्याचे कामीं व त्याची वाढ करण्याच्या कामीं होईल. शेतीच्या नियोजनाकरितां पुरेशी रचना करण्यासाठीं प्राथमिक अवस्थेंत जेथें परिश्रमपूर्वक काम चाललें असेल त्या ठिकाणीं तीं लक्ष्यें नेऊन पोहोंचविणें जरूर आहे. कांहीं वर्षें परिश्रमपूर्वक विकास व प्रयोग केल्यावर असें निश्चितपणें सांगतां यावें कीं, प्रत्येक राज्यांतील व देशांतील शेतीविषयक लक्ष्यांचा संबंध एकीकडे जी जबाबदारी वैयक्तिक शेतें व खेडीं स्वीकारतील त्यांच्यांशीं व दुसरीकडे राष्ट्राच्या शेतीविषयक धोरणाच्या ध्येयाशीं आहे.

## समाज-विकास व ग्राम-विस्तार.

### मूलभूत तत्त्वें.

खेड्यांच्या सामाजिक व आर्थिक जीवनामध्यें जो बदल घडवून आणावयाचा त्याची जी रीत पंचवार्षिक योजनेला घालून द्यावयाची आहे तीकरितां सामाजिक विकास ही पद्धत व खेड्यापर्यंत विस्तार हें साधन आहे.

सुमारें गेलीं ३० वर्षें ग्राम-सुधारणेचें काम सरकारच्या निरनिराळ्या खात्यांतर्फें चालू आहे. ज्या प्रकारच्या सरकारी चळवळी असतात, तशा प्रकारें शेतकऱ्याच्या जीवनांत तुकडे पडलेले नसतात. म्हणून खेड्यांतल्या माणसांचा प्रश्न सोडवितांना समग्र दृष्टीनें सोडविला पाहिजे, व त्याचें जीवन हें समग्र जीवन आहे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. त्या जीवनाशीं संबंध जो आणावयाचा तो अशा एका मध्यस्थामार्फत आणला पाहिजे कीं, जो खेड्यांत असलेल्या मुख्य मुख्य खात्यांमध्यें तरी समान आहे आणि असा मध्यस्थ म्हणजे खेड्याच्या दर्जाचा कार्यकर्ता एकटा संबंधित खेड्यांतील जनतेंत उत्साह निर्माण करण्यास व टिकवण्यास कांहीं तरी प्रभावी कार्य असलें पाहिजे. त्या कामाकरितां लोकांमध्यें प्रबळ इच्छा निर्माण झाली पाहिजे, व त्याची निकड वाटली पाहिजे. सरकारतर्फें मदत करणाऱ्यांमध्येंहि हें वारें संचारलें पाहिजे.

## समाज-विकास-कार्यक्रम.

१९५२ सालीं सुरू केलेल्या समाज-विकास-योजनांमध्यें, पूर्वीच्या 'ग्राम-सुधारणे'च्या अनुभवापासून मिळालेले धडे कार्यक्रमाच्या कल्पनेमध्यें व प्रत्यक्ष आंखणी-मध्यें एकत्र केले आहेत. आतां आंखलेल्या एकेका समाज-विकास-योजनेमध्यें सुमारें ३०० खेड्यांचा गट अंतर्भूत केला आहे. त्याचें क्षेत्रफळ ४५० ते ५०० चौ. मैल, लागवडीचें क्षेत्र १॥ लाख एकर, आणि लोकवस्ती २ लाख धरली आहे. या योजनेच्या क्षेत्राचे तीन विभाग पाडण्यांत आले आहेत. एकेका विभागांत १०० खेडीं व ६०,००० ते ७०,००० लोकसंख्या धरली आहे. या तीन विभागांचे पुनः पांच पांच खेड्यांचा एक गट असे पोट-विभाग केले आहेत. या एकेका पोट-विभागांत ग्राम-कार्यकर्ता काम करणार आहे. १९५२ मध्यें सुरू केलेल्या कार्यक्रमांत १॥ कोटि जनता समाविष्ट झाली आहे. या समाज-विकास-योजनांमध्यें मुख्य मुख्य कामें जीं योजिलीं आहेत तीं शेती व शेती-विषयक बाबी, दळणवळण व शिक्षण, पुरवणी, रोजगार, घरें बांधणें, सामाजिक स्वास्थ्य, व अध्यापन.

या कार्यक्रमांचा जनतेची भागीदारी हा प्राण आहे. प्रकल्पाच्या कार्य-क्षेत्रामध्यें जे सर्व बिनसरकारी घटक असतील त्यांच्या प्रतिनिधींची एक सल्लागार-समिति बनविली जाईल, व ती समिति प्रकल्पांचा कार्यकारी अधिकारी (प्रोजेक्ट एक्झिक्युटिव्ह ऑफिसर) असेल त्याला योजना तयार करणें व त्यांची अंमलबजावणी करणें या कामीं मदत करील. या योजना-क्षेत्रामध्यें भारत-सेवक-समाजहि स्थापला जाणें संभवनीय आहे; व तो समाजहि हा कार्यक्रम अंमलांत

आणण्याकरितां खेड्यांतील जनतेचें साहाय्य मिळवून देईल. योजनांचा जो आराखडा तयार केला आहे त्यांत बरींचशीं मोठीं कामें अशीं आहेत कीं जीं सरकारच्यामार्फत केलीं जातात. मोठ्या प्रमाणावरील व्यवस्थापक-मंडळामार्फत खर्च केला जात असल्यामुळें तो अधिक होतो; त्यांत मध्यस्थांचा मोबदला वगैरेहि असतो. जर जनतेला भविष्यकाळाचे निर्माते म्हणून शिक्षण देऊन तरबेज करावयाचें असेल, तर त्यांच्यावर त्यांच्या प्रातिनिधिक संस्थांच्यामार्फत कामें सोंपविलींच पाहिजेत; फक्त सरकारी संस्थांनीं त्यांना तान्त्रिक मदत केली म्हणजे झालें. जे विभाग मागासलेले आहेत, आणि ज्या विभागांत मुख्य वस्ती हरिजन किंवा आदिवासींची आहे, त्या खेड्यांतील लोकांना निरानिराळीं कामें करण्याकरितां श्रम करण्यास सांगितलें जाईल.

अगदीं साध्या प्रकारच्या समाज-योजनेकरितां तीन वर्षांचा अंदाजी खर्च ६५ लाख रुपये येईल. त्यांत शहर-वस्तीचा समावेश नाहीं. या ६५ लाखांत ५८ लक्ष ४७ हजार इतके रुपये रुपयांच्या स्वरूपांत, व ६ लक्ष ५३ हजार इतर स्वरूपांत खर्च होतील. संमिश्र योजनेला, जींत गांवांचा अंतर्भाव केला आहे, तिला १११ लाख रुपये लागतील. अशा गांवाचा अंतर्भाव केलेल्या योजना संकल्पित आहेत.

समाज-विकास-योजनेच्या कार्यक्रमाचा खर्च मध्यवर्ती व राज्य-सरकार या दोघांवर पडणार आहे. जे भांडवली खर्च आहेत त्यांपैकीं, ७५ टक्के मध्यवर्तीनें व २५ टक्के राज्यांनीं आणि नित्याच्या खर्चामध्यें निम्मी निम्मी वांटणी असावी असें सामान्यपणें प्रमाण ठरविलें आहे.

स्वतःच खर्च भागविणाऱ्या ज्या योजना असतील त्याकरितां लागणारें कर्ज मध्यवर्ती देईल. तिसऱ्या वर्षानंतर राज्य-सरकार हे सर्व खर्च स्वतः करील अशी अपेक्षा आहे.

## राष्ट्रीय विस्तार-सेवा.

' अधिक धान्य पिकवा ' चौकशी-कमिटीनें अशी एक सूचना केली आहे कीं, देशांत एक राष्ट्रीय विस्तार-संघटना स्थापन करावी. या संघटनेमार्फत खेड्यांत जास्तींत जास्त काम केलें जावें. ती संघटना प्रत्येक शेतकऱ्यापर्यंत जाऊन पोहोंचावी, आणि तिनें खेड्यांतील समग्र जीवनाचीससूत्र वाढ व्हावी म्हणून मदत करावी. त्या कमिटीनें असा कार्यक्रम सुचविला आहे कीं, मध्यवर्ती सरकारनें राज्य-सरकारला या विस्तार-संघटना स्थापण्यास मदत करावी, व त्यामुळें त्या राज्यांतील

सर्व विभाग ह्या विस्तृत विकासांत दहा वर्षांमध्यें यावा. या पांच वर्षांत १,२०,००० खेडीं या विस्तार-सेवेच्या कक्षेंत आणावयाचीं आहेत. याचा अर्थ एकूण लोकसंख्येच्या ¼ लोकसंख्या त्यांत येईल. या सूचनांचा अंमल केला गेला तर खेड्यांतील सर्व कामांना विशेषतः अधिक धान्य उत्पादनाला प्रचंड चालना मिळेल.

या विस्तारांत जे काम करणारे असतील त्यांच्या अध्यापनाकडे काळजीपूर्वक लक्ष दिलें पाहिजे, व तें अध्यापन त्यांना करावयाच्या सेवेशीं संबंधित असलें पाहिजे. त्यांना खेड्यांचे प्रश्न समजले पाहिजेत, शेतकऱ्यांची मनोवृत्ति समजली पाहिजे, व त्यांच्या निरनिराळया अडचणी सोडविण्यास त्यांनीं उपाय सुचविले पाहिजेत. शेतकऱ्यांच्याबरोबर काम करून त्यांनीं त्या उपायांची यशस्विता सिद्ध केली पाहिजे. खेड्यांतील नेतृत्व त्यांनीं शोधून काढलें पाहिजे, व त्याला कार्यान्वित केलें पाहिजे. शेतकऱ्यांचा विश्वास त्यांना जितका संपादन करतां येईल तितकें त्यांना यश मिळेल.

या विस्तार-संघटनेची पहिली धडक जी बसेल तिच प्रत्यंतर म्हणून शेतकरी कर्ज-पुरवठा आणि हत्यारें यांची मागणी करील. या मागण्या पुरविणें हा विस्तार-कार्याचा अपरिहार्य परिणाम आहे. तें कार्य यशस्वी होण्यास ही जबाबदारी मोठ्या कुशलतेनें पार पाडली पाहिजे.

या विस्तार-संघटनेच्या कार्यकर्त्यांना संशोधन-कार्यकर्त्यांनीं चांगला पाठिंबा दिला पाहिजे. संशोधकांकडे हे प्रसारक आपले प्रश्न नेतील, व त्यांचीं उत्तरें लोकांकडे नेऊन पोहोंचवतील. या दोन कार्यकर्त्यांत निकट सहकार्य असावें म्हणून खास व्यवस्था करण्यांत आली पाहिजे.

## शेतीकरितां द्रव्य.

बीं-बियाणें, खतें, लहान पाटबंधारे, जमिनीचा कस राखणें वगैरे कामें पैशाच्या अभावीं थांबतात, व उत्पादन वाढत नाहीं. शेतकऱ्याला तात्पुरतीं, कांहीं मुदतीचीं व लांब मुदतीचीं अशीं कर्जें लागतात. रिझर्व्ह बँकेच्या सांगण्यावरून अखिल भारतीय स्वरूपाची खेड्यांतील कर्जाची पाहणी सुरू आहे. त्या पाहणींतून खेड्यांतील पत व पैसा यावर प्रकाश पडेल, आणि गेल्या २० वर्षांत सावकाराविरुद्ध केलेल्या उपायांचा काय परिणाम झाला हें समजून येईल.

या नियोजनांत सहकारी पतपेढ्या काढण्याच्या आवश्यकतेवर जोर दिला आहे; आणि तगाईसारखी जी मदत द्यावयाची ती सहकारी संस्थांमार्फत द्यावी असें सुच-

विलें आहे. सहकारी संस्थांमुळें स्थानिक बचत होण्यास मदत होते; आणि सरकार-मार्फत उपलब्ध होणाऱ्या मदतीचा उपयोग करतां येतो. १९५५–५६ पर्यंत ⅓ लोकसंख्या प्राथमिक पतपेढ्यांच्या कक्षेंत येतील असे कार्यक्रम तयार करण्याचें सर्व-साधारण ध्येय असावें. त्याकरितां नियोजनांत सूचना दिल्या आहेत.

'अधिक धान्य पिकवा'-समितीनें सुचविल्याप्रमाणें पांच वर्षांअखेर शेत-कऱ्यांच्या तात्कालिक गरजांकरितां सहकारी संस्थांमार्फत व सरकारी कर्जांतून दर वर्षीं १०० कोटि रुपये त्याला मिळाले पाहिजेत. याचा अर्थ सध्यांची जी रक्कम आहे ती तिप्पट केली पाहिजे.

दरसाल २५ कोटि रुपये कांहीं मुदतीच्या कर्जाकरितां लागतील असें धरलें आहे. बँकेला हें कर्ज ५ कोटि रुपयांपर्यंत देतां यावें म्हणून रिझर्व्ह बँकेचा कायदा दुरुस्त केला जात आहे. मध्यवर्ती सरकारच्या योजनेंतूनहि मध्यमकालीन कर्जांकरितां ५ कोटि रुपये मिळूं शकतील. शेतकऱ्याला दीर्घकालीन कर्जांकरितां ५ कोटि रुपयांची तजवीज केली आहे.

## शेतीच्या वस्तूंकरितां बाजार.

मुंबई, मद्रास, मध्यप्रदेश व हैद्राबाद या चार राज्यांत पद्धतशीर मार्केट्स् स्थापन झालीं आहेत. राज्य-सरकारांनीं हेंच तत्त्व सर्व महत्त्वाच्या मार्केट्सना लावावें, व अशा नियंत्रित मार्केट्सच्या व्यवस्थेमध्यें शेती-माल तयार करणाऱ्यांना प्रभावी स्थान द्यावें. नियोजनांत सहकारी विक्रीकरितां उपाय सुचविले आहेत. सहकारी विक्रीचें यशापयश हें ती संस्था उत्पादकांना किती मदत करूं शकते यावर अवलंबून असतें. सहकारी संस्था गोडाउनकरितां जागा देऊं शकते किंवा नाहीं, तिच्या हातीं आर्थिक साधनें आहेत किंवा नाहींत, प्रामाणिकपणें व हुशारीनें तिला व्यवस्था ठेवतां येते किंवा नाहीं, आणि जेथें शक्य असेल तेथें तिला शेती पदार्थांवर संस्कार करतां येतात कीं नाहींत यांवर ही मदत देणें न देणें पुनः अवलंबून असतें. शेती-पदार्थांवर संस्कार करण्याची ( भाताचे तांदूळ, पोहे, मुरमुरे वगैरे ) व्यवस्था सहकारी संस्थांमार्फत खाजगी मालकीच्या संस्थांऐवजीं सरकारच्या मदतीनें करणें हें सर्वसामान्य धोरण असावें. सहकारी संस्थांना ही मदत करण्यास समर्थ होण्याकरितां लांब मुदतीचें कर्ज लागेल. तें कर्ज राज्यानें व राज्यांच्या फिनॅन्शिअल कॉर्पोरेशननें द्यावयास हवें.

विक्रीसंबंधींचे जे तान्त्रिक, आर्थिक व अनुशासनविषयक प्रश्न असतील त्यांचा सतत अभ्यास केला पाहिजे. मध्यवर्ती सरकारनें एक तज्ज्ञांची स्टँडिंग कमिटी

स्थापावी, व तिनें राज्य-सरकारला आणि सहकारी संस्थांना विक्री-विषयक योजना तयार करण्यास आणि वेळोवेळीं सहकारी विक्रीची प्रगति कसकशी होते याची पाहणी करण्यास साहाय्य करावें.

आपल्या देशांतून जो माल परदेशीं पाठविला जातो त्याची प्रत व दर्जा ठराविक राखला जाणें अत्यंत महत्त्वाचें आहे. लोकर, ब्रशाचे केस, लाख, शेळी-मेंढ्यांचीं कातडीं, काजू, तेल-बिंया यांची सक्तीनें प्रतवारी केली पाहिजे. देशांत खपणारें तूप व वनस्पति-तेल यांचाहि भेदाभेद केला पाहिजे. विशिष्ट दर्जाची अमुक वस्तु असली पाहिजे, ती एकसारखी असली पाहिजे, आणि खाद्य-पदार्थ शुद्ध असले पाहिजेत, अशासंबंधींच्या कायद्याची जरूरी आहे. १९३९ च्या स्टँडर्ड वेट ॲक्टच्या पद्धतीवर जेथें अवश्य असेल तेथें वजन-मापाचे कायदे झाले पाहिजेत.

## पशु-कृषिकर्म.

येथील जनावरांपैकीं शेंकडा १० टक्के जनावरें निरुपयोगी व अनुत्पादक असतात. येथील चाऱ्यावरील ओझें कमी व्हावें म्हणून नियोजनांत १६० गो-सदनें १ कोटि रुपये खर्चून स्थापावीं असें सुचविलें आहे. म्हातारीं व पंगु जनावरें या सदनांत पोहोंचवलीं जातील. जेथें गुरचराईकरितां कुरण विपुल असेल तेथेंच हीं गो-सदनें स्थापन केलीं जातील. ज्या योजनेला ' ग्राम-योजनेची किल्ली ' असें म्हटलें आहे ती ३ कोटींची योजना पशु-वंश सुधारण्याकरितां व त्यांची उत्पादन-शक्ति वाढविण्याकरितां नियोजनांत समाविष्ट केली आहे.

तीन किंवा चार खेड्यांचा एकेक गट व त्या गटांत ५०० दुभतीं जनावरें ठेवण्याचें एकेक अशीं ६०० केंद्रें देशांतील निरनिराळ्या विभागांत निवडलीं जातील. कमी प्रतीच्या बैलांना खची केलें जाईल. निवडक जातिवंत वळूंकडून सृजन-कार्य केलें जाईल. जनावरांच्या अवलादीचे व दुधाचे आंकडे ठेवण्यांत येतील. या क्षेत्रांत कृत्रिम पद्धतीच्या गर्भोत्पत्तीचें तंत्रहि अवलंबिलें जाईल. स्थानिक चारा-पुरवठा वाढविण्या-करितां जरूर ते विविध उपाय योजले जातील. समाज-विकास-योजना-क्षेत्रांत बेरसीम लुसर्न, कौबीन्स, फील्डबीन्स वगैरे जातींच्या वैरणी काढाव्यात. आळीपाळीनें गुरें चारून गुरचरणें सुधारण्याची जरूरी आहे. त्याचप्रमाणें जेथें जें सोईस्कर पडेल असें गवतहि लावणें जरूर आहे.

पुढील पांच वर्षांत गुरांचीं इस्पितळें व दवाखाने २,००० वरून २,६००

वर जातील. मध्यवर्ती सरकारची जी बुळकंडी रोग नष्ट करण्याची योजना आहे तीहि या नियोजनांत आहे.

लोकरीची पैदास वाढविण्याकरितां व सुधारण्याकरितां तीन प्रादेशिक केंद्रें उत्तर प्रदेश, राजस्थान व दख्खन पठार येथें काढावयाचीं आहेत.

कोंबड्यांच्या वाढीकरितां राज्याराज्यांतील योजनांत लहान रकमा घातल्या आहेत. इंडियन व्हेटरनरी इन्स्टिटयूटमध्यें कोंबड्यांच्या रोगाचें नियमन करण्याकरतां व चांगल्या कोंबड्यांच्या पैदाशीकरितां जें महत्त्वपूर्ण कार्य चाललें आहे त्याचा खेड्यांतील घराघरांतून प्रवेश झाला पाहिजे.

## दूधदुभतें व बागाईत.

येथील प्रत्येक गाय सरासरी दर वर्षी ४१३ पौंड म्हणजे २०६॥ शेर दूध देते. जगांत ८,००० पौंड दूध देणाऱ्या गायी आहेत. आपल्या गाईचें दूध कमी असल्यामुळें त्यांचें खाद्य-मानहि ( ५॥ औंस ) फार कमी आहे.

या नियोजनामध्यें शहर-विभागांत दुग्ध-मंडळें स्थापन करण्याची शिफारस केली आहे. हें मंडळ शहराच्या उपनगर-विभागांतून मुख्यतः सहकारी संस्थांमार्फत दुग्ध-उत्पादनाची संघटना करील; त्याचप्रमाणें दूध व दुधाचे पदार्थ यांच्या संबंधींचे प्रश्न हाताळलि; तसेंच परवाने, प्रतवारी व दुधाची तपासणी वगैरेंबद्दल असलेली व्यवस्था सुदृढ करील. दुभतीं जनावरें म्युनिसिपल विभागांतून शेजारच्या खेडेगांवच्या विभागांत हालविणें जरूर आहे. फळांचें व भाज्यांचें उत्पादन वाढविण्याकरितां जे मुख्यतः फळें होणाऱ्या विभागांत राहणारे बागाईतदार असतील त्यांना फळांचें संवर्धन व विक्रीकरितां सहकारी संस्था काढण्याला संघटित करावें. ज्या ठिकाणीं जरूरीपेक्षां अधिक फळें होतात तेथें फळांचे व भाज्यांचे बंद केलेले डबे भरण्यास उत्तेजन द्यावें.

मोठाल्या शहराभोंवतीं जे उपनगराचे विळखे असतात ते सुधारण्याचे प्रयत्न करावेत, व तेथें दारापुढें भाजीपाला लावण्याकरितां बिया, वेल व तान्त्रिक सल्ला देऊन उत्तेजन द्यावें. फळें व भाज्या यांच्याकरितां एक सुधारणा-मंडळ स्थापन करावें.

## जंगलें.

सध्यां जंगलाखालीं असलेल्या विभागांचें एकूण क्षेत्रफळ २,३०,७८९ चौ. मैल आहे. याचा अर्थ एकूण जमिनीपैकीं १८ टक्के जंगल-विभाग आहे. इतर

देशांच्या मानानें हें क्षेत्रफळ फार कमी आहे. या विभागांत वाढ करण्याची योजना दीर्घकालीन योजनेच्या स्वरूपाची आहे. आपल्याला तावडतोब लक्ष दिलें पाहिजे तें—जीं जंगलें तुटलीं आहेत किंवा ज्यांची नीट निगा राखली नाहीं त्यांच्याकडे. यामध्यें जमीनदारी विभागांतील पण राज्य-सरकारकडे अलीकडे आलेलीं ४० लक्ष एकर जंगलें समाविष्ट होतात. पूर्वीचीं संस्थानें आतां विलीन झाल्यामुळें सरकारी देखरेखीखालीं आलेलीं जंगलें वाढलीं आहेत, व त्यांची नीट व्यवस्था करणें जरूर झालें आहे. जमिनीची धूप थांबविण्याकरितां झाडी वाढविणें; कालव्याच्या कांठीं, रेल्वेच्या बाजूला, रस्त्याच्या कडेला झाडें लावणें; आणि जळण व इमारती वगैरे-करितां लागणारें लांकूड मिळावें म्हणून खेड्यांत वृक्षारोपण करणें हें सर्व अवश्य आहे.

गोवऱ्यांऐवजीं सॉफ्ट कोक घरांतल्या जळणाकरितां वापरल्यास तो स्वस्त पडतो; एवढेंच नव्हे तर शेणाचा खताकरितां उपयोग होतो.

१८ लाख टनांवरून २० लाख टनांपर्यंत इमारती लांकूड या पांच वर्षांत उपलब्ध होण्याची आशा आहे. म्हणजे ११ टक्क्यांनीं त्यांत वाढ होईल. शहर-विभाग वाढल्यानें, निरनिराळ्या विकास-योजना सुरू केल्यानें, व पोलाद मिळणें सध्यां कठीण झाल्यानें लांकडाची मागणी वाढत आहे. म्हणून चांगलें मुरलेलें लांकूड इमारतीकरितां व तारायंत्राच्या खांबाकरितां अधिकाधिक वापरावें.

जंगलामध्यें जळणाकरितां व इमारतीकरितांच लांकूड होत नाहीं. काड्यांच्या पेट्या, प्लायवुड, कागदाचे धंदे वगैरेंनाहि जंगल लांकूड पुरवितें. जंगलांत लाख, कातडीं कमविण्याकरितां लागणारें द्रव्य, डिंक, राळ, औषधी वनस्पति वगैरे होतात. त्यांतील कांहीं पदार्थ निर्यातहि केले जातात. आगगाड्यांच्या धंद्याकरितां लागणारें लांकूड अंदमानांतून येईल, व त्यांचा पुरवठा ४५,००० टनांनीं वाढेल. प्लायवुडकरितां अंदमान ३०,००० टन लांकूड पुरवील असें वाटतें. बाकी लागणारें २०,००० टन आंब्यांच्या लांकडाचा दुसऱ्या लाकडाऐवजीं उपयोग करून किंवा आयातीची व्यवस्था करून पुरवतां येईल. अगदीं दूरवर असणारे जे जंगल-विभाग आहेत त्यांचे कागद-गिरण्यांशीं लांब मुदतीचे भाडे-पट्टे केले तर त्यांची कागदाकरितां लागणारे बांबू लावून वाढ करतां येईल.

जंगलांतील लाख किंवा हिरड्यासारख्या दुय्यम वस्तु जर योग्य रीतीनें गोळा केल्या, व त्यांची प्रत लावली तर त्यांची निर्यात वाढवितां येईल.

## जमिनीचें रक्षण.

जमीन धुपून गेल्यामुळें देशाच्या निरनिराळ्या भागांतील मोठ्या प्रमाणावरील जमिनीची धूळधाण झाली आहे. त्याहिपेक्षां अधिक जमिनी धुपीमुळें ग्रासल्या आहेत. ती धूप थांबविण्याकरितां अनेक सूचना केल्या आहेत.

प्रत्येक राज्यामध्यें जमिनीच्या उपयोगाकरितां व जमिनीच्या संरक्षणाकरितां बोर्ड असावें. त्या बोर्डानें जमीन-रक्षणाच्या योजना अंमलांत आणाव्यात. जमिनीच्या रक्षणाकरितां जरूर ते कायदेहि करावेत. प्रत्येक राज्यानें धुपलेल्या जमिनीमुळें जे विभाग ग्रासले असतील त्यांच्या हद्दी आंखण्याकरितां एक तपशीलवार व सर्वांगीण पाहणी करावी, आणि ज्या विभागांत पुढील पांच वर्षें जमिनीच्या रक्षणाकरितां जोराचे प्रयत्न करावयास पाहिजेत ते विभाग निवडावेत. या नियोजनांत मध्यवर्ती सरकारनें जमिनीच्या रक्षणाकरितां मदत म्हणून २ कोटि रुपयांची तरतूद केली आहे.

मध्यवर्ती सरकारांत एक संघटना जमिनीचा उपयोग कसा करावा याकरितां व जमिनीच्या रक्षणाकरितां स्थापन करावी. त्या संघटनेचें एक बोर्ड अन्न व शेती-मंत्र्याच्या खात्याखालीं असावें, आणि सर्व राज्यांच्या जमीन-रक्षक-बोर्डांच्या प्रतिनिधींचें एक कौन्सिल असावें. मध्यवर्ती संघटनेनें जमीन-रक्षणाच्या कामाचें एकसूत्रीकरण करावें. त्यांत जमिनीची जी धूप होते तिच्या परिणामाचें मापन करावें, राज्याच्या कार्यक्रमाची तपासणी करावी, संशोधनात्मक पाहणी, योजनांचीं प्रात्यक्षिकें यांची व्यवस्था करावी, आणि राज्याराज्यांत जमीन-रक्षणाच्या कार्यक्रमाकरतां सहकार्य घडवून आणावें.

डेहराडून फॉरेस्ट रिसर्च इन्स्टिटयूटमध्यें जमीन-रक्षणाचें एक संशोधन-केंद्र स्थापन करावें. मध्यवर्ती सरकारनें निरनिराळ्या जातींच्या माती व जमिनींचा उपयोग यांची पाहणी करावी. ही पाहणी इंडियन ॲग्रिकल्चर रिसर्च इन्स्टिटयूटतर्फें जमिनीची सुपीकता व खताची जरूरी याविषयीं चाललेल्या संशोधनाबरोबर जोडून द्यावी.

जे समाज-विकास-प्रकल्प डोंगराळ व कोरड्या प्रदेशांत चालले असतील तेथील विभाग, व ज्या नद्यांच्या धरण-योजना असतील तेथील पाणी अडविलेला विभाग यांमध्यें विशेषेंकरून जमिनीची धूप थांबविण्याचे व जमिनीच्या रक्षणाचे उपाय जास्त लक्षपूर्वक योजावेत.

राजस्थानमधील वाढत चाललेल्या वाळवंटाचा प्रश्न सोडविण्याकरितां पहिली उपाय-योजना या दृष्टीनें जोधपूरला एक संशोधन-केंद्र स्थापिलें जात आहे. तशीच जमीन

उपयोगांत आणण्याकरितां व झाडांझुडुपांचे पट्टे निर्माण करण्याकरितां एक योजना आंखली जात आहे. या प्रश्नाचा निरनिराळ्या राज्यांशीं सहकार्याचा संबंध असल्या-मुळें त्या राज्यांनीं मध्यवर्ती संघटनेच्या सल्ल्यानें एक सलग कार्यक्रम हातीं घ्यावा.

## मत्स्य-व्यवसाय.

गोड्या पाण्यांत व समुद्राच्या पाण्यांत मत्स्य-वृद्धि करण्याला अमूप वाव आहे. सध्यां या संपत्तीचा अगदींच तुटपुंजा उपयोग केला जात आहे. दर साल दर माणशीं ३·४ औंस मासेच फक्त उपलब्ध होत आहेत.

गोड्या पाण्यांतील मत्स्य-वृद्धीकरितां मुख्यतः पाण्याची पाहणी केली पाहिजे, माशांचीं अंडीं पुरविलीं पाहिजेत, किंवा ज्या पाण्यांत मासे वाढतील त्याचा सांठा केला पाहिजे, आणि कृत्रिम रीतीनें मासे तयार करण्याचीं जल-क्षेत्रें निर्माण केलीं पाहि-जेत. कृषि-वृद्धि-संघटनेचा उपयोग माशांच्या उत्पत्तीमध्यें वाढ व्हावी याकरितां करावा, आणि मत्स्य-व्यवसायाचें शिक्षण शेतकी-शाळा व कॉलेजांतून द्यावें.

समुद्रांतील मत्स्य-व्यवसायांत वृद्धि व्हावी म्हणून पुढील उपायांना अग्रतम क्रम द्यावा असें सुचविलें आहे—

( १ ) कोळ्यांना लागणारीं साधनें देणें.

( २ ) हातांनीं वल्हविल्या जाणाऱ्या होड्यांचें यान्त्रिकीकरण करणें, किंवा नव्या यान्त्रिक बोटी सुरू करणें.

( ३ ) विक्री-केंद्रांत सुधारणा.

( ४ ) बर्फ, कोल्ड स्टोअरेज, व वाहतुकीची व्यवस्था.

( ५ ) मोठाल्या जहाजाच्या केंद्रावरून छोट्या नावांमार्फत मासे मारण्याचा धंदा सुरू करणें.

( ६ ) अफाट दर्यात मासेमारी करतां यावी म्हणून वाफेवर चालणारीं ट्रॉलर्स व पर्ससीनर्ससारखीं जहाजें पुरविणें.

( ७ ) बंदराच्या आवश्यक सोयी करणें.

या अग्रक्रमाकरितां नियोजनांत पुढील गोष्टी करण्यांत येणार आहेत. १४० होड्यांचें यान्त्रिकीकरण, १४ वाफेचीं जहाजें, २ मध्यवर्ती जहाजें, २ पर्ससीनर्स, व बंगालच्या उपसागरांत आणि अरबी समुद्रांत ३ ट्रॉलर्स, बंदरांतील गाळ काढण्याकरितां ड्रेजरची व्यवस्था केली आहे. बर्फाचे ९ कारखाने, कोल्ड स्टोअरेजची व्यवस्था, व

ताज्या माशांच्या वाहतुकीकरितां व सांठ्याकरितां रस्त्यांवरील ९ शास्त्रशुद्ध गाड्यांची तरतूद केली आहे.

मासेमारीचा धंदा नियोजनपूर्वक व व्यवस्थित वाढविण्याकरितां कार्यक्षम संघटनेची जरूरी आहे. त्या धंद्याकरितां अनेक तज्ज्ञांची जरूरी आहे. कोळ्यांना यान्त्रिक बोटी व मोठालीं जहाजें चालवितां यावींत म्हणून त्यांना शिक्षण देण्याची व्यवस्था केली पाहिजे.

या धंद्यांतील दलाल काढून टाकावेत, व मासे मारण्याची सामग्री सहकारी संस्थेमार्फत मिळावी, याकरितां शिफारशी केल्या आहेत. ह्या सामग्रीचें वांटप सुलभतेनें करतां यावें म्हणून खास रकमा राखून ठेविल्या आहेत. मोठ्या प्रमाणावर मासे मारण्याचा धंदा वाढत गेला म्हणजे मुंबई, कोचीन व कलकत्ता या बंदरांवर महिन्याच्या कांहीं दिवसांत मालाची गर्दी होईल, त्यामुळें किंमतींत चढउतार होतील. त्यामुळें लहान कोळ्यांचे हाल होतील. त्यांच्या हितरक्षणाकरितां मासे विकण्याचें काम सहकारी संस्थेमार्फत करावें, व अशा ठिकाणीं फिश मार्केटिंग बोर्ड्स् स्थापावींत अशी शिफारस केली आहे.

वर दर्शविलेल्या योजनांचा परिणाम म्हणून माशांचें उत्पादन ५० टक्क्यांनीं वाढेल. तें १० लाख टनांवरून १९५५–५६ सालीं १५ लाख टनांवर जाईल.

---

# ७ : पाट-पाण्याची व विजेची वाढ

## उपलब्ध पाणवठे.

पाटाकरितां लागणारें पाणी तीन मार्गांनीं मिळतें. ( १ ) नद्यांच्या नित्य प्रवाहांतून कालवे काढून. ( २ ) नद्यांवाटे वाहणारें पुराचें पाणी सांठवून, किंवा लहान लहान जल-संचयांतील प्रत्यक्ष पडणाऱ्या पावसाच्या पाण्यापासून; व (३) भू-पृष्ठाखालील जल-संचयापासून विहिरी किंवा कूप-नलिकांपासून. या तीन मार्गांपासून किती पाण्याचा पुरवठा होतो हें निरनिराळ्या भागांवर अवलंबून असतें. साधारणतः हिशेबावरून असें म्हणतां येईल कीं, नद्यांवाटे जें पाणी दरसाल वाहून जातें.

त्यांतील फक्त ६ टक्क्यांचा उपयोग आपण करतों. नद्यांतील सर्व पाणी उपयोगांत आणतां येत नाहीं ही उघड गोष्ट सर्वांना ठाऊक आहेच. तथापि आतां उंच उंच धरणें बांधण्याच्या कामीं जीं नवीं तंत्रें निघालीं आहेत त्यामुळें आपल्या देशांतील जलसंचयाचा उपयोग करण्याची अधिकाधिक शक्यता निर्माण झाली आहे. ह्या जल-संचयामुळें नुसते पाटच निघतात असें नाहीं तर विद्युतहि निर्माण होते, व कोठें कोठें पुरांचें नियंत्रण आणि गलबतांची वाहतूक करितां येते.

## फाळणीचे परिणाम.

हिंदुस्थानांतील एकूण लागवडीच्या २९ कोटि ८० लक्ष एकरांपैकीं फाळणी-पूर्वी ७ कोटि २० लक्ष एकर म्हणजे २४ टक्के जमीन पाण्याखालीं होती. फाळणी-नंतर २५ कोटि १० लक्ष एकरांपैकीं ४ कोटि ८० लक्ष एकर म्हणजे १९ टक्के जमीन पाण्याखालीं राहिली. ही जी पाण्याच्या जमिनींत कपात झाली तीमुळें आपल्या अन्नधान्याची परिस्थिति खंगली. हिंदुस्थानांत शेंकडों वर्षें पाटबंधारे होते, आणि आतां त्यांची वाढ करावी म्हणून सारखी मागणी येत आहे.

हिंदुस्थानच्या वाढत्या लोकसंख्येच्या पोषणाचें प्रमाण सुधारेल इतकें धान्य हिंदुस्थान निर्माण करूं शकेल. त्याकरितां पुढील उपाय योजले पाहिजेत.

( १ ) हिंदुस्थानची जी जल-शक्ति आहे तिचा जास्तींत जास्त उपयोग केला पाहिजे. आपल्या अन्नधान्याचा प्रश्न जर समाधानकारक रीतीनें सोडवावयाचा असेल तर येत्या १५–२० वर्षांत आपलें पाट-पाण्याचें क्षेत्र दुप्पट झालें पाहिजे.

( २ ) जें शास्त्रीय संशोधन होतें त्याचा उपयोग शेतीकडे करून शेतीच्या दर्जांत सुधारणा केली पाहिजे.

## नियोजनाचा मूलाधार.

गेल्या कांहीं वर्षांत आपल्या देशांत नव्या पाट-पाण्याच्या व विद्युत्-शक्तीच्या योजनांविषयीं फार चळवळी झाल्या. आपण पुष्कळ नव्या लहान-मोठ्या योजनांना सुरुवातहि केली. त्यांतल्या कांहीं निव्वळ पाट-पाण्याच्या, कांहीं जल-विद्युत्-शक्तीच्या, व कांहीं उभयविध स्वरूपाच्या आहेत. ज्या योजना सुरू झाल्या व चालू आहेत त्यांतील कांहींना लागणारा सारा पैसा मध्यवर्ती सरकारनें कर्ज म्हणून दिला, व कांहीं योजनांचा पैसा राज्य-सरकारनें मध्यवर्तीचें कर्ज मदतीदाखल घेऊन पुरवला. या नियोजनाचा हेतु या पांच वर्षांत वरील योजना पुऱ्या करण्याच्या बाबतींत जास्तींत जास्त प्रगति करावी असा आहे. वरील सर्वच धरणांचीं कामें सुरू करण्यापूर्वी तपशील-

वार तान्त्रिक तपासणी केली, व काळजीपूर्वक त्याच्या आर्थिक बाजूचा अंदाज केला असें नाहीं. एखादी योजना नियोजनांत समाविष्ट केल्यामुळें कांहीं ठराविक वेळीं तिची पाहणी केली जाण्याची जरूरी नाहीं असें नाहीं. एखादी मोठी योजना असली म्हणजे तींत पुष्कळ जोड-कामाचे स्वतंत्र गट असतात. आणि जसजसें एका गटाच्या तान्त्रिक व इतर तपासणीचें काम पुरें होतें तसतसें साऱ्या योजनेच्या आर्थिक व द्रव्य-विषयक बाबींची फेर-पाहणी करावी लागते; आणि जेथें अवश्य वाटेल तेथें साऱ्या योजनेचा किंवा त्यांतील कांहीं भागाचा व्याप मर्यादित करावा लागतो. भाकरा, दामोदर व हिराकुड योजनांची तपासणी करूनच त्यांच्या बांधकामाचा व त्यांचा पंचवार्षिक योजनेंत समावेश करण्याचा कार्यक्रम दुरुस्त केला.

## नियोजन.

ज्या योजनांचें बांधकाम चालू आहे, त्यांच्याकरितां मंजूर केलेल्या अंदाजी हिशेबावरून सर्व योजनांचा खर्च काम पुरें झाल्यावर ७६५ कोटि रुपये येईल. मार्च १९५१ पर्यंत ह्या योजनांकरितां १५३ कोटि रुपये खर्ची पडले आहेत. पांच वर्षांच्या नियोजन-कालांत या योजनांवर ५१८ कोटि रुपये खर्च करण्याचें योजिलें आहे. या योजनांमुळें नियोजनाच्या शेवटच्या वर्षांत अधिक जमीन जी भिजवली जाईल ती ८५ लाख एकर असेल, व अधिक वीज जी निर्माण केली जाईल ती १० लाख ८० हजार किलोवॅट्स असेल. ह्या योजना पुऱ्या झाल्यावर व त्यांची संपूर्ण वाढ झाल्यावर पाण्यानें अधिक जमीन भिजण्याचें क्षेत्र १ कोटि ६९ लक्ष एकर, आणि अधिक वीज-उत्पादन १४ लक्ष ६० हजार किलोवॅट्स होईल.

सालोसालचा खर्च व सालोसालचे संभाव्य फायदे पुढीलप्रमाणें होतील.

| वर्ष | खर्च कोटि रु. | आधिक भीज जमीन (एकर) (हजार) | आधिक वीज (किलोवॅट्स्) (हजार) |
|---|---|---|---|
| १९५१–५२ | ८५ | ६४६ | ५८ |
| १९५२–५३ | १२१ | १८९० | २३९ |
| १९५३–५४ | १२७ | ३५५५ | ७२४ |
| १९५४–५५ | १०७ | ५७४९ | ८७५ |
| १९५५–५६ | ७८ | ८५३३ | १०८२ |
| अखेरीस नव्या योजना | ४० | १६९४२ | १४६५ |
| पांच वर्षांची बेरीज | ५५८ | | |

वर दिलेल्या रकमेंत जे ४० कोटि रुपये नव्या योजनांकरितां दाखविले आहेत, त्यांचा तपशील पुढीलप्रमाणें:—

| योजना | विभाग | एकूण अंदाजी खर्च (लाख) | अखेरीस भीज जमीन वाढ (००० एकर) | अखेरीस वीज वाढ (०००कि.) |
|---|---|---|---|---|
| कोसी (प्रथमावस्था) | बिहार व नेपाळ | ६६०० | २६२० | ४०(व पुरांचें नियंत्रण) |
| कोयना (प्रथमावस्था) | मुंबई | ३३०० | ... | २४० |
| कृष्णा (अनिर्दिष्ट व्याप) | मद्रास व हैद्राबाद | ... | ... | ... |
| चंबळ (प्रथमावस्था) | मध्यभारत व राजस्थान | ३३७५ | १२०० | ८० |
| रिहांड | उत्तर प्रदेश | ३५०० | ... | २४० |

या पांच योजनांना एकूण २०० कोटींवर खर्च येईल. त्यापैकीं नियोजन-कालांत त्यांवर ४० कोटि खर्च करतां येतील असें वाटतें. या योजनांच्या बाबतींत मध्य-सरकारच्या व राज्य-सरकारच्या (कोसीच्या बाबतींत नेपाळच्या) आर्थिक व तान्त्रिक जबाबदाऱ्या कोणत्या व बांधकामाचा कार्यक्रम काय, याचा निर्णय या योजनांचें काम सुरू करण्यापूर्वी घेतला जाईल.

## धोरण व व्यवस्था.

नियोजनांत ज्या योजनांपासून लवकर अधिक धान्य मिळण्याची शक्यता आहे त्या प्रथम पसंत करण्यांत आल्या आहेत. आणि ज्या उभयविध योजना आहेत त्यांतील पाट-पाण्याचा विभाग लवकर पुरा करावा अशी आंखणी केली आहे. वीज निर्माण करण्याची व्यवस्था काळजीपूर्वक केली आहे, आणि जसजशी मागणी वाढेल तसतशा टप्प्यानें ती निर्मिति हातीं घेतली जाईल.

प्रत्येक मोठ्या विद्युत्-उत्पादन-केंद्रांत वीज कोणत्या प्रमाणांत निर्माण करावी यासंबंधीं योग्य आंखणी करण्यावर जास्तींत जास्त भर दिला आहे. पंचवार्षिक योजनेंत अंतर्भूत केलेल्या बहुतेक विद्युत्-योजनांत तपशीलवार किंवा प्रारंभींची विद्युत्-निर्माण-प्रमाणाची पाहणी केलेली आहे. जी वीज निर्माण होईल ती औद्योगिक विभागांत जो सध्यां विजेचा तुटवडा पडतो तो भरून काढण्याकरितां उपयोगांत आणली जाईल. जीं यंत्रें बदलणें कालावधीवर टाकलें होतें अशीं जुनीं व

अकार्यक्षम यंत्रें बदललीं जातील, आणि त्या शक्तीचा उपयोग कूप-नलिकांतून, नद्या वगैरेंतून पाणी खेचण्याकडे करण्यांत येईल. ज्या ठिकाणीं मोठाले नवे उद्योग-धंदे सुरू करावयाचे तेथें नव्या विद्युत्-योजनांपासून त्यांना वीज मिळेल कीं नाहीं हें लक्षांत ठेवलेलें आहे.

ग्रामीण विभागांत शेतकी, लिफ्ट इरिगेशन, घरगुती व लहान प्रमाणावरील उद्योगधंदे यांच्याकरितां विजेच्या उपयोगाचा प्रसार करण्याच्या प्रयत्नांना फार महत्त्व दिलेलें आहे. अमेरिकेप्रमाणें येथेंहि हा प्रसार करतां यावा म्हणून प्रत्येक राज्यानें एक खास मंडळ नेमावें. नियोजनांत समाविष्ट केलेल्या योजनांशिवाय इतर पाट-पाण्याच्या व विद्युत्-शक्तीच्या योजनाहि दृष्टीसमोर आहेत. त्या चौकशीकरितां घेतल्या आहेत अगर घेतल्या जात आहेत. या सर्व योजनांना २,००० कोटि रुपये खर्च येईल. राष्ट्रीय विकासाचें जें दीर्घकालीन नियोजनाचें ध्येय आहे तें साधण्याकरितां याहि योजना हातीं घ्यावयास हव्यात. १५ ते २० वर्षांत त्या पुऱ्या झाल्यावर भीज-पाण्याची जमीन सध्यांच्या दुप्पट होईल, व विद्युत्-उत्पादन ७० लाख किलोवॅटस् होईल. वरील सर्व गोष्टी पुऱ्या झाल्यावरच लोकांच्या राहणीच्या दर्जांत म्हणण्यासारखी वाढ होईल. हिंदुस्थानच्या दृष्टीनें पाटबंधाऱ्यांच्या व विद्युत्-शक्तीच्या वाढीकरितां राष्ट्रीय धोरण आंखणें अत्यंत जरूरीचें आहे. त्याचीं कारणें थोडक्यांत पुढीलप्रमाणें:—

प्रथम, हिंदुस्थानच्या सर्व भागांत पाण्याच्या व विजेच्या सोई आहेत असें नाहीं, पण त्या जेथें आहेत तेथें त्यांची अन्नाकरितां संपूर्ण वाढ केली पाहिजे. दुसरें, जेथें कामें चालू आहेत, व जीं कामें विचाराखालीं आहेत, तीं कामें स्थापत्याचे व इतर प्रश्न निर्माण करीत आहेत. त्याकरितां आधुनिक तान्त्रिक पद्धतींचा उपयोग व तो जरूर पडल्यास पाश्चात्य तज्ज्ञांच्या मदतीनें केला पाहिजे. याचा अर्थ जें ज्ञान व जी सामग्री येथें व बाहेर असेल ती एकत्र खेंचून आणली पाहिजे. तिसरें, नद्यांच्या दऱ्या ह्या एकाच राज्याच्या सीमेंत सामावलेल्या नसतात, त्यामुळें निरनिराळ्या राज्यांच्या विकास-योजनांचें ससूत्रीकरण करावें लागतें. त्याच्या पारस्परिक संबंधांमुळेंच जास्तींत जास्त फायदे होऊं शकतील. चवथें, मोठाल्या योजनांना भांडवल लागतें, व तें भांडवल एकेका राज्याला संपादन करणें त्याच्या शक्तीबाहेर असतें. अशा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीला काळजीपूर्वक द्रव्याचें नियोजन व मध्यवर्ती मदत लागते.

दुसरा एक महत्त्वाचा मुद्दा आवर्जून सांगावयाचा राहिला. पाटबंधारे व विद्युत्-योजनांकरितां पांच वर्षांपेक्षां अधिक मुदतीचें नियोजन पाहिजे. मोठ्या योजनेच्या तपासणीलाच दोन-तीन वर्षे लागतात, आणि पांच ते दहा वर्षे ती योजना पार पाडण्याला लागतात. राज्यांनीं उभारलेलीं यान्त्रिक साधनें व संघटना यांचा सतत उपयोग करितां यावा याकरितां १५ वर्षांचें नियोजन केलें पाहिजे. त्यामुळें तपासणी व बजावणीचें कार्य काळजीपूर्वक तयार केलेल्या मार्गानें होईल, आणि तान्त्रिक तज्ज्ञ व सामग्रीचा चांगला उपयोग करतां येईल.

पंचवार्षिक नियोजन सुरू होऊन दोन वर्षे झाल्यावर झालेल्या प्रगतीची पाहणी करणें सबंध नियोजन पुरें करण्याच्या दृष्टीनें जरूर होईल. त्या पाहणीवरून सहाव्या वर्षानंतर अंमलांत आणावयाच्या पुढील नियोजनाची तयारी करतां येईल. यापुढील नियोजनांत कोणत्या योजना घ्यावयाच्या हें ठरविण्याकरितां कांहींएक पद्धत घालून दिली पाहिजे. त्याचप्रमाणें सामान्यतः कोणत्या योजनांना अग्रक्रम दिला पाहिजे हेंहि ठरविलें पाहिजे. नियोजनांत कोणत्या योजना असाव्यात हें ठरविण्याकरितां कांहीं स्थूल तत्त्वें येथें दिलीं आहेत.

( १ ) नियोजनांत घ्यावयाची योजना ही तान्त्रिक, आर्थिक व द्रव्य-दृष्टीनें तपशीलवार तपासली गेली पाहिजे.

( २ ) ज्या योजनेमुळें अन्नाचें उत्पादन वाढेल तिला नद्यांच्या पाण्याच्या इतर उपयोगापेक्षां अग्रक्रम दिला पाहिजे.

( ३ ) ज्या योजना अत्यंत लाभदायक असतील (एक एकर पाण्याच्या जमिनीला लागणाऱ्या खर्चाच्या दृष्टीनें) आणि ज्या थोडक्या काळांत परिणाम दाखवतील त्यांना पसंती द्यावी.

( ४ ) अन्न व विद्युत्-शक्तीचा प्रदेशवार जरूरीचा योग्य तो विचार करावा; तसाच विचार मागासलेल्या विभागाचा करावा.

निरनिराळ्या योजनांच्या सापेक्ष अग्रक्रमाविषयीं सल्ला देण्याकरितां अखिल भारतीय स्वरूपाची एक कमिटी नेमण्याचें योजिलें आहे. ही कमिटी प्रत्येक योजनेची तपासणी करून सल्ला देईल. ती कमिटी खालीलप्रमाणें असेल:—

( १ ) अध्यक्ष हिंदुस्थान सरकारनें नेमलेला;

( २ ) नॅचरल रिसोर्सेस व सायंटिफिक मंत्रिमंडळाचा ॲडिशनल सेक्रेटरी;

( ३ ) अर्थ-खात्याचा प्रतिनिधि;

( ४ ) सेंट्रल बोर्ड इरिगेशनचा अध्यक्ष; व

( ५ ) हिंदुस्थानच्या सरकारी नोकरींत नसलेला प्रख्यात एंजिनीअर.

ज्या वेळीं राज्याच्या चीफ एंजिनीअरनें तयार केलेली योजना तपासणीकरितां घेतली जाईल त्या वेळीं त्याला तेवढ्यापुरता सभासद म्हणून स्वीकृत करून घ्यावें. या कमिटीनें तिच्यापुढें आलेल्या सर्व संशोधित व खर्चाचा अंदाज केलेल्या योजनांची तपासणी केल्यावर, मिनिस्ट्री ऑफ नॅचरल रिसोर्सेस व सायंटिफिक रिसर्च, मिनिस्ट्री ऑफ फिनॅन्स, आणि संबंधित राज्य-सरकार यांचा सल्ला घेऊन एक नियोजन तयार करावें.

या स्वरूपाचें संकल्पित नियोजन कृतींत आणण्याकरितां मध्यवर्ती व राज्य-सरकार यांनीं पुढील बाबतींत नवा मार्ग शोधला पाहिजे:—

( १ ) योजनांना पैसा पुरविण्याची पद्धति, व

( २ ) जनतेचें राष्ट्रीय प्रमाणावर सहकार्य संपादन करणें, व देशांत नवचैतन्य निर्माण करणें.

## योजनांना द्रव्य.

योजनांना लागणाऱ्या पैशाकरितां पुढील शिफारशी केल्या आहेत:—

( १ ) १९५० च्या ऑक्टोबरमध्यें नियोजन-मंडळानें राज्य-सरकारांना अशी सूचना केली होती कीं, त्यांनीं 'बेटरमेंट कॉन्ट्रिब्यूशन' वसूल करावी. बेटरमेंट कॉन्ट्रिब्यूशन म्हणजे पाट-बंधाऱ्यांच्या सोयीमुळें जमिनीची जी किंमत वाढते ती वाढ कांहींहि न कमावतां झालेली असते. त्या कमाईपैकीं कांहीं हिस्सा राज्याला मिळवून द्यावा, हा त्या सूचनेंत उद्देश होता. पुष्कळ राज्यांनीं याकरितां एक कायदा करण्याचें ठरविलें आहे, अगर ठरवीत आहेत.

( २ ) नियोजन-समितीनें दुसरीहि एक शिफारस केली होती. नव्यानें सुरू होणाऱ्या कामांची जादा किंमत, तीं कामें सुस्थितींत ठेवण्याकरितां लागणाऱ्या किंमतींत झालेली वाढ, व शेती-उत्पादनाचे वाढलेले दर या सर्वांचा विचार करून पाण्याचे जे दर असतात त्यांत अधिक वाढ करण्याच्या दृष्टीनें पाहणी करावी.

( ३ ) शेतकीवर प्राप्ति-कर बसवावा अशी एक तिसरी शिफारस केली होती. कांहीं राज्यांत ह्या कराचा प्रवेश झाला आहे. ह्या करामुळें ज्या मोठाल्या जमिनी असतील त्यांना हा ओझ्याचा न्याय्य वांटा उचलावा लागेल.

## जनतेचें सहकार्य.

अशा प्रकारच्या प्रचंड प्रमाणावरील व प्रचंड पैशाच्या योजना जर यशस्वी व्हावयाच्या असतील तर सरकारनीं आम जनतेचा उत्साह जागृत केला पाहिजे, व त्यांचा पाठिंबा मिळविला पाहिजे. सर्वांत मुद्द्याची गोष्ट अशी आहे कीं, लोकांना ह्या योजना आपल्या आहेत असें वाटलें पाहिजे, व त्या पुऱ्या करण्याकरितां त्यांनीं त्यागाला तयार झालें पाहिजे. नियोजन-समितीचें असें मत आहे कीं, सरकारनीं मोठाल्या जमीनदारापासून जमिनीच्या स्वरूपांत 'बेटरमेंट कॉन्ट्रिब्यूशन' घेतली तर तिचा अनेक प्रकारें उपयोग होईल. ज्यांच्या जमिनी धरणामुळें पाण्याखालीं बुडल्या आहेत त्यांना ह्या जमिनीमुळें पुनः जमिनीवर स्थानापन्न करतां येईल. त्या जमिनी सार्वजनिक कार्याकरितां म्हणजे गुर-चरण, खेड्यांतलीं जंगलें, बाजार, रस्ते यांच्या उपयोगाकरितां लावतां येतील. तसेंच जमिनींचें एकत्रीकरण, बिन किफायतशीर शेतीची किफायतशीर शेती, बिगर जमिनीच्या मजुराला शेती देणें वगैरे कामीं ही जमीन लावतां येईल. अशा प्रकारच्या योजना आंखतांना व त्यांची अंमलबजावणी करतांना त्या त्या भागांतील लोकांना अगत्यपूर्वक सहभागी करावें.

नव्या योजनांपासून ज्यांचा फायदा होणार आहे त्यांच्याकडून कर्जें काढावींत. तीं कर्जें त्याच योजनांकरितां राखून ठेवावींत. लोकांचा पाठिंबा मिळविण्याचा हा उपयुक्त मार्ग आहे.

ह्या योजना अंमलांत आणण्याच्या ज्या पुरातन पद्धति आहेत त्या सुधारण्याचा आणखी एक मार्ग आहे. ज्या कामाकरितां साधे मजूर लागतात त्या कामांचा अंदाज करतांना मजुरी जी धरावयाची ती—ज्या खेड्यांतून पाट खणावयाचे असतात त्या खेड्यांतील मजुरांकडून हें काम करून घ्यावयाचें आहे त्यांना मिळणाऱ्या मजुरीच्या हिशेबानें धरावी. कंत्राटदारांना सारें किंवा तोडून काम द्यावयाचें आहे या हिशेबानें मजुरी धरूं नये. मोठाल्या योजनांत कालवे व पाट खणण्याकरतां फार खर्च होत असतो, व तो कमी करण्याचा मार्ग वर दिला आहे. एकेका खेड्यांत किंवा खेड्याच्या गटांत खेडुतांची सहकारी-संघटना बनवावी, व त्यांच्याकडे त्यांच्या विभागांतील काम सोंपवावें. त्यामुळें खर्चांत कपात होईलच, पण ज्या खेड्यांतील लोकांचा फायदा होणार आहे त्यांना आपला हिस्सा त्याकरितां देतां येईल. कांहीं योजनांत ही पद्धत सुरू केली आहे, व ती सर्वत्र चालू होईल अशी आशा आहे.

## लहान-मोठ्या पाटाच्या योजना.

नेहमीं असे प्रश्न विचारले जातात कीं, नियोजनांत मोठाल्या व लहान पाण्याच्या योजनांना सापेक्षतेनें कोणतें स्थान दिलें आहे ? व त्या योजनांना खर्च किती होणार आहे ? वास्तविकपणें मोठ्या व लहान योजनांत भांडण नाहीं. देशांत असे कांहीं भाग आहेत कीं जेथें मोठीं धरणें होऊं शकतील, व इतरत्र लहान होऊं शकतील. मोठालीं धरणें व लहान धरणें हीं एकमेकांना पूरक आहेत, चढाओढ करणारीं नाहींत. पंचवार्षिक नियोजनांत ८ मोठाल्या धरणांच्या (उभयविध धरून) योजना आहेत. त्यांपैकीं प्रत्येक योजनेला ५ कोटि रुपयांपेक्षां अधिक खर्च लागेल; १६ योजनांना १ कोटि ते ५ कोटि खर्च लागेल; २१ योजनांना १ कोटि ते ५० लाख, आणि २७ योजनांना ५० लाख ते १० लाख खर्च लागेल. या योजना पुऱ्या झाल्या म्हणजे सुमारें ८० लाख एकर जमीन त्यामुळें भिजेल, आणि लहान योजना व कूप-नलिकांकडून १ कोटि १० लाख एकर जमीन भिजेल. लहान व मोठ्या योजनांचे नफे-तोटे पुढीलप्रमाणें आहेत.—

## लहान योजनांचे फायदे.

( १ ) सुरुवातीचें भांडवल कमी असतें.
( २ ) त्या योजना लवकर पुऱ्या करितां येतात, व त्यांचे परिणाम लवकर दिसतात.
( ३ ) त्यांना परदेशीय तज्ज्ञांची किंवा साधनांची विशेष मदत लागत नाहीं.
( ४ ) स्थानिक साधनसामग्री सहज उपलब्ध होऊं शकते.

त्यांचे तोटे पुढीलप्रमाणें आहेत:—

( १ ) त्यांची जोपासना करावयास खर्च फार येता.
( २ ) त्यांची जीवन-मर्यादा सापेक्षतेनें कमी असते.
( ३ ) त्यांच्यामुळें मर्यादित संरक्षण मिळतें.

ही परिस्थिति सर्व देशभर असल्यामुळें या लहान धरणांतील बरींचशीं धरणें मोडकळीस आलीं आहेत. अनुभवानें असें सिद्ध झालें आहे कीं, जर त्या धरणांचा फायदा घेणारे लोक त्यांची जोपासना वगैरे करतील तरच हीं धरणें सुस्थितींत राहतील. ज्या ज्या ठिकाणीं ह्या जोपासनेची जबाबदारी लोकांवर टाकण्याचे कायदे आहेत तेथें त्या कायद्यांची बजावणी करणें शक्य झालें नाहीं.

## मोठाल्या योजनांचे फायदे.

( १ ) या योजना बहुतेक विविध स्वरूपाच्या असतात. पाट-बंधारे होऊन शिवाय तेथें वीज उत्पन्न होते, पुरांचें नियंत्रण करितां येतें, व गलबतांची वाहतूक वगैरे होऊं शकते.

( २ ) सध्यां नद्यांचें पाणी वायां जातें. त्या वायां जाणाऱ्या पाण्याचा उपयोग मोठाल्या योजनांमुळें केला जातो.

( ३ ) ज्या वर्षी दुर्भिक्ष्य असतें त्या वर्षी ह्या धरणांकडून चांगलें संरक्षण मिळतें. कारण त्या धरणांना अडवणारें पाण्याच्या सांठ्याचें क्षेत्रफळ फार मोठें असतें. त्याचे तोटे : सुरुवातीला लागणारें मोठें भांडवल; पुऱ्या होण्यास लागणारा दीर्घकाळ. त्यांच्या पैशाचा प्रश्न हा निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळा असतो. ज्या सध्यां विविध कार्यी मोठाल्या योजना आहेत त्या अजून अशा अवस्थेला पोहोंचल्या नाहींत कीं त्यांचे आर्थिक फायदे अजमावतां येतील. तथापि त्यांना जर पुढील अटी सक्तीनें लागू केल्या तरच आर्थिक दृष्ट्या त्यांचें समर्थन करितां येईल—

( १ ) पैशावर सक्त नियंत्रण व कमींत कमी खर्च.

( २ ) भिजणाऱ्या जमिनीवर सुधारणा-कर.

( ३ ) जुन्या धरणावरील पाण्यावर जे दर आकारले आहेत त्यापेक्षां जास्त दर आकारणें, व ते सध्यांच्या किंमतीच्या प्रमाणावर आणणें.

( ४ ) विद्युत्-उत्पादन हें काळजीपूर्वक नियंत्रित करणें, व विजेच्या यंत्रामध्यें जरूरीच्या अगोदर भांडवल न गुंतवणें.

( ५ ) वीज ही किफायतशीर दरानें विकणें.

---

## ८ : घरगुती व लहान प्रमाणावरील उद्योगधंदे

ग्राम-विकास-कार्यक्रमांत खेड्यांतील उद्योगांना मध्यवर्ती स्थान आहे. शेतीच्या उत्पादन-वाढीला जितकें अग्रस्थान आहे तितकेंच यांनाहि आहे. खेड्यांतील धंदे वाढवावयाचे असतील तर ज्या कारणांमुळें त्यांचा ऱ्हास झाला त्यांचा परामर्ष घेतला पाहिजे. हा ऱ्हास होण्याचीं कारणें—(१) संघटना नसणें, (२) राज्य-सरकारचें धोरण, (३) संशोधन व शिकवणीची उणीव, व (४) पैशाची उणीव.

जसजसे मोठ्या प्रमाणावरील धंदे वाढूं लागले आणि आयात वाढली, तसतशी स्थानिक कारागिरांनीं केलेल्या मालाला उतरती कळा लागली. खेड्यांतील धंदे वाढावयास खेड्यांतील मागणी वाढली पाहिजे. बदलत्या परिस्थितीला अनुसरून खेड्यांच्या संघटनेची पुनर्रचना केली पाहिजे. ती संघटना विशेषेंकरून खेड्यांतील कामकऱ्यांना काम देण्यास समर्थ झाली पाहिजे. एक संघटित गट म्हणून काम करणाऱ्या खेड्यांतील जनतेनें ग्रामोद्योगाकडे लक्ष दिलें पाहिजे, आणि या स्थानिक उद्योगांची वाढ करण्याची जबाबदारी घेतली पाहिजे. त्याबरोबरच एक व्यवसाय किंवा विविध व्यवसायाच्या कामगारांच्या सहकारी संस्था काढल्या पाहिजेत; आणि अखिल भारतीय ग्रामोद्योग-संघ व अखिल भारतीय चरखा-संघासारख्या संस्थांना हे ग्रामोद्योग वाढविण्याकरितां मदत केली पाहिजे.

ग्रामोद्योगाच्या कार्यक्रमाला सरकारकडून प्रोत्साहन व मार्गदर्शन मिळालें पाहिजे. याची मुख्य जबाबदारी जरी राज्यावर असली, तरी मध्यवर्ती सरकारनें कोणत्या चौकटींत प्रत्येक खेड्यांतील उद्योग करावे हें ठरविलें पाहिजे. मध्यवर्ती सरकारची अशी एक संघटना असावी कीं जी खेड्यांतील उद्योगाच्या प्रश्नांकडे लक्ष पुरवील; आणि राज्य-सरकारला, विधायक कार्य करणाऱ्या संस्थांना, व खेड्यांतील सहकारी संस्थांना कार्य करण्यास अनुकूल वातावरण निर्माण करून देईल. याकरितां मध्यवता सरकारनें खादी व ग्रामोद्योग वाढविण्यासाठीं एक बोर्ड लवकरच स्थापण्याचें ठरविलें आहे. हें बोड सरकारी यंत्राच्या बाहेर असेल, आणि त्यांत खादी व ग्रामोद्योगामधील अनुभवी कार्यकर्ते असतील. राज्यामध्यें अशाच संघटनांची जरूरी आहे.

कोणत्या क्षेत्रांत घरगुती उद्योगधंद्यांनीं संघटित व्हावें याचें मुख्य मार्गदर्शनपर धोरण स्पष्ट केलें जावें. जेथें मोठ्या प्रमाणावरील धंदा घरगुती धंद्याशीं चढाओढ करीत असेल तेथें उचित मार्ग म्हणजे एकाच वस्तूच्या निर्मितीकरितां कार्यक्रम

आंखण्याचा प्रयत्न करणें. त्या कार्यक्रमामध्यें कार्यक्षमता, वाढीचें प्रमाण व कामधंदा मिळण्याची शक्यता यांचा विचार व्हावा. एकाच वस्तूच्या निर्मितीकरितां जो कार्यक्रम आंखावयाचा त्यांत पुढील मूलभूत गोष्टी असाव्या—

( १ ) उत्पादनाचीं क्षेत्रें राखून ठेवणें.

( २ ) मोठ्या धंद्याची जी शक्ति असेल त्यापलीकडे त्यांची वाढ होऊं न देणें.

( ३ ) मोठ्या धंद्यावर कर बसविणें.

( ४ ) कच्चा माल पुरविण्याची व्यवस्था करणें.

( ५ ) संशोधन, शिक्षण वगैरेंत एकसूत्रता.

या एकाच वस्तु निर्माण करण्याच्या कार्यक्रमामध्यें सरकारी नियंत्रण कांहीं प्रमाणांत गृहीत धरलेंच आहे. हें नियंत्रण मुख्यतः धंद्याची जी संघटित बाजू असेल तीवर असावें. एकाच वस्तूच्या उत्पादनाचा कार्यक्रम ठरवितांना त्यासंबंधीं नीट अभ्यास व चौकशी केली पाहिजे. या समान उत्पादनाच्या कार्यक्रमांत जीं तत्त्वें येतात तीं मान्य करण्यांत आलीं आहेत, किंवा त्यांचा अंमलहि कांहीं प्रमाणांत केला जात आहे. उदाहरणार्थ, कापडाचा धंदा घेऊं. त्या धंद्यांत असलेल्या मोठाल्या गिरण्या व हातमाग यांच्या बाबतींत क्षेत्र राखून ठेवण्याचें मान्य केलेंच आहे. खादी व हातमाग यांच्या वाढीकरितां गिरण्यांत तयार होणाऱ्या कापडावर एक लहानसा कर अलीकडे बसविला आहे. उद्योगधंद्यांना लागणाऱ्या ज्या कच्च्या मालावर नियंत्रणें आहेत तो कच्चा माल लहान प्रमाणावर अनेक धंदे करणाऱ्यांना मिळावा म्हणून व्यवस्था करण्यांत आली आहे. अन्नधान्याच्या संस्काराचे जे धंदे आहेत त्या क्षेत्रांत मोठ्या प्रमाणावरील उद्योगधंद्यांना परवानगी देऊं नये अशी शिफारस करण्यांत आली आहे. याला दोनच अपवाद आहेत. एक सरकारनें हे धंदे काढले तर, किंवा सहकारी संस्थांनीं काढले तर खासगी मालकीचे हे धंदे वाढल्यामुळें खेड्यांतील रोजगार बसले आहेत. खेड्यांतील लोकांना कामधंदा मिळावा म्हणून व चांगल्या प्रकारें पोषण व्हावें म्हणून तांदूळ सडण्याच्या गिरण्यांतील तांदुळाऐवजीं हात-सडीचे तांदूळ मिळावे म्हणून कार्यक्रम आंखण्याची शिफारस केली आहे.

जर घरगुती व लहान प्रमाणावरील उद्योगधंद्यांच्या तंत्रांत झपाट्यानें सुधारणा झाली नाहीं तर राज्यांचा निरनिराळ्या प्रकारचा पाठिंबा हा थोडे दिवस टिकणाऱ्या किंमतीचा ठरेल. संशोधन हें सतत होत राहिलें पाहिजे.

नवे प्रश्न कोणते ते शोधून काढणें, त्यांचीं उत्तरें देणें, व तीं नव्या हत्यारांनीं व तंत्रांनीं देणें हें अत्यंत जरूरीचें आहे. संशोधनाची व चौकशीची जरूरी कशी असते हें पुढील कांहीं वर्षांत बऱ्याच खेडोपाडीं वीज नेली पाहिजे ह्या गोष्टीवरून कळून येईल. मध्यवर्ती सरकारनें खेड्याच्या तंत्र-शास्त्राकरितां एक संस्था काढण्याला अग्रक्रम द्यावा. या संस्थेनें लहान धंद्याच्या—विशेषतः जे खेड्यांच्यासंबंधीं असतील अशा प्रश्नांची चौकशी करावी. ही संस्था स्वतःच नव्या कल्पना, नवी जुळणी, नवे नमुने काढूं शकेल, आणि कोणत्या दिशेनें कारागिरांना शिक्षण द्यावें व मार्गदर्शन करावें हें सांगूं शकेल. ह्या संस्थेला विद्यमान संघटना आणि राष्ट्रीय प्रयोग-शाळा व इतर संशोधन-केंद्रांबरोबर दाट संबंध ठेवला पाहिजे. मध्यवर्ती सरकारनें १५ कोटि व राज्य-सरकारनें १२ कोटि रुपये घरगुती व लहान उद्योगधंद्यांकरतां खर्च करावेत अशी तरतूद नियोजनांत केली आहे. खेड्यांतील कारागिरांना भरपूर द्रव्यसाहाय्य मिळावें म्हणून औद्योगिक सहकारी संस्था राज्यांतून निघण्यावर भर दिला पाहिजे.

या नियोजनांत दहा ग्रामोद्योगांचे कार्यक्रम दिले आहेत. (१) खेड्यांतील तेलाचा धंदा, (२) निंबोण्यापासून साबण, (३) भात सडणें, (४) ताडगुळ, (५) गूळ व खांडसारी साखर, (६) चामड्याचें काम, (७) लोकरीचीं ब्लँकेटें, (८) हात-कागद, (९) मधुमक्षिका-पालन, (१०) घरगुती आगपेट्या.

## लहान उद्योग व हस्त-व्यवसाय.

ग्रामोद्योगांशिवाय जे इतर लहान धंदे आहेत त्यांचे दोन गट पडतात. ( १ ) ज्यांत वंशपरंपरागत कला असते, आणि ( २ ) जे अलीकडचे पण मोठाल्या उद्योगांशीं संलग्न असतात ते.

सध्यां खेड्यांतील धंदे अगदींच प्राथमिक अवस्थेंत आहेत; पण विजेचा प्रसार झाल्यावर त्यांत बदल होईल. त्यांत व लहान धंद्यांत रोजगार हा महत्त्वाचा विचार आहे. तान्त्रिक सुधारणांची पद्धत त्वरित अवलंबणें हें महत्त्वाचें आहे. घरगुती धंद्यांच्या वस्तूंची मागणी निर्माण करणें, व ती टिकविणें याकरितां जे उपाय योजावयाचे त्याचबरोबर उत्पादनाची पद्धत व संघटना यांत बदल करणें यावरहि भर दिला पाहिजे.

जे सुशिक्षित आहेत, व ज्यांनीं विशिष्ट शिक्षण घेतलें आहे त्यांना काम मिळण्याची लहान धंद्यांत शक्यता आहे; म्हणून त्या धंद्यांना खास अर्थ आहे. पुष्कळ लहान धंद्यांत व हस्त-व्यवसायांत स्त्रियांना घरीं बसल्या बसल्या काम मिळेल म्हणूनहि त्यांना महत्त्व आहे.

युद्धाच्या काळांत वाढलेले पुष्कळ लहान धंदे आतां संपले तरी आहेत किंवा त्यांना पुष्कळ नुकसान तरी आलें आहे. कांहीं धंदे कच्चा माल मिळण्याच्या अडचणीमुळें, किंवा मागणीपेक्षां पुरवठा अधिक असल्यामुळें बसले. कांहीं धंद्यांच्या कारखान्याचें प्रमाणच बिन किफायतशीर होतें; किंवा त्यांच्याकडून अपेक्षित दर्जाचें किंवा बिनचूक मोजमापाचें उत्पादनच होत नसे. सरकारी मदत किंवा सल्ल्या-शिवायच पुष्कळ लहान धंदे वाढले. आतांपर्यंत या धंद्यांच्या बाबतींत धोरण असें आंखलेंच गेलें नव्हतें. आणि सरकारी इलाज जे योजले जात ते वीज-पुरवठ्याबद्दल किंवा नियंत्रित वस्तूंच्या वांट्याबद्दल. शेतीच्या, किंवा वाहतुकीच्या, किंवा उद्योगाच्या नियोजनाला जितकें महत्त्व आहे, तितकेंच महत्त्व लहान धंदे वाढविण्याला आहे, हें काम आतां हातीं घेतलें आहे, व पाहिलें पाऊल या दृष्टीनें कांहीं ठराविक उद्योगधंद्यांचे कार्यक्रम हातीं घेतले आहेत. त्यांत लोकरीची वाढ, लोकरीच्या वस्तु तयार करणें, खेळण्याचें सामान (बॅटस्, फूटबॉल, टेनिस वगैरे), शेतीचीं हत्यारें, पितळेचीं भांडीं, बेलमेटल, सायकलीचे भाग वगैरे. लहान धंदे व हस्त-व्यवसाय यांच्या कार्यक्रमांची मोठे उद्योग व संशोधन-संस्था यांच्याबरोबर सांगड घातली पाहिजे. याशिवाय जे कारागीर असतात त्यांना आर्थिक व तान्त्रिक मदत देण्याची खात्री पटविण्याकरितां व्यावहारिक दृष्ट्या त्या धंद्यांना पाठिंबा दिला पाहिजे.

## हस्त-व्यवसाय.

हस्त-व्यवसायाचा धंदा हा मुख्यतः दलालांच्या हातीं असतो; ते लहान प्रमाणावर काम करितात, आणि आलेल्या मागण्या पुऱ्या करितात. ज्या स्थितींत सध्यां हा धंदा आहे त्या स्थितींत त्यांत सुधारणा होणें कठीण आहे; त्यामुळें हा व्यवसाय, कांहीं अपवाद सोडून, कार्यपद्धतीच्या किंवा दृष्टिकोणाच्या दृष्टीनें अचेतन झाला आहे. या धंद्यांतील वस्तूंची निर्यात होत असते, व तो महत्त्वाचा प्रश्न आहे. ही निर्यात वाढविण्याकरितां जे उपाय योजले जातील तेच देशांतील विक्रीहि वाढवतील. जर उपयोगाच्या वस्तु अधिकाधिक तयार केल्या, व त्यांचे आकार गिऱ्हाइकांच्या जरूरीप्रमाणें जुळते केले तर पुष्कळ वस्तूंची मागणी वाढवितां येईल.

हस्त-व्यवसायाच्या वस्तु वाढण्याचे कार्यक्रम परदेशी गिऱ्हाइकीच्या गरजांचा अभ्यास करून त्यावर ठरविले पाहिजेत. हें परदेशी गिऱ्हाईक नुसते जे श्रीमंत आहेत तेवढेच नव्हेत, सामान्य नागरिकहि त्यांत धरले पाहिजेत. जो नमुना असेल

त्याप्रमाणें सर्व माल मिळेल असा विश्वास पटला पाहिजे. आणि अमेरिकेसारख्या बाजारांत मोठ्या प्रमाणावर माल पाठवितां आला पाहिजे.

देशांत हा माल फारसा न खपण्याचें कारण लोकांची मर्यादित क्रय-शक्ति. ही शक्ति राज्याच्या निरनिराळ्या प्रकारच्या आश्रयानें आणि या देशी वस्तु घरांत व इतरत्र वापरल्यानें वाढवितां येईल. हा माल विकण्याचीं जीं भांडारें आहेत तीं नुसतीं हा माल विकत न बसतां, कारागिरांना नव्या मागण्या व नवे नवे प्रकार यासंबंधींची माहिती देतील, व मार्ग दाखवितील तर त्यांचे चांगले परिणाम होतील. या वस्तूंच्या ग्राहकांचे सहकारी संघ व उत्पादकांचे सहकारी संघ यांची सांखळी जोडल्यानें, आणि स्थानिक उत्पादक व घाऊक परदेशी खरेदीदार यांची सरकारनें गांठ घालून दिली तर ह्या धंद्याच्या मागणीला स्थैर्य येईल. मध्यवर्ती सरकारनें नुकतेंच एक हस्तव्यवसायाचें बोर्ड स्थापन केलें आहे. त्याचा उद्देश उत्पादन सुधारणें व वाढविणें, आणि देशांत व परदेशांत विक्री अधिक करण हा आहे.

बहुशः हस्तव्यवसायी किंवा कारागीर लहान प्रमाणावर व कोणाची मदत न घेतां काम करीत असतो. प्रातिनिधिक संस्था कारागिरांच्या साध्या प्रश्नांचा फारसा विचार करीत नाहींत. या धंद्यांत सहकारी संस्थाहि नाहींत. जर ह्या कारागिराला दलालावर कमी अवलंबून ठेवावयाचें असेल, आणि त्याच्यापर्यंत तान्त्रिक ज्ञान पोहोंचवावयाचें असेल, व त्याला मार्गदर्शन करावयाचें असेल तर दोन मार्गांनीं पुढें सरसावलें पाहिजे. ( १ ) सहकारी संस्था काढणें, ( २ ) प्रत्येक प्रस्थापित हस्त-व्यवसायांच्या केंद्रस्थानीं एक मंडळ असणें. त्याचे सदस्य सहकारी संस्था व वैयक्तिक कामगार असावेत. राज्यांत जें औद्योगिक खातें आहे त्यानें अशा सहकारी संस्था व मंडळें स्थापन करावींत. ह्या खात्याला जरूर ती माहिती असावयास पाहिजे, व त्यानें उत्पादक व कारागीर यांच्या धंदेविषयक व तान्त्रिक प्रश्नांशीं सतत संपर्क ठेवला पाहिजे. त्यानें विशेषतः पुढील गोष्टींकडे काळजीपूर्वक लक्ष द्यावें:—

( १ ) विशिष्ट दर्जाचा माल काढण्याबद्दल आग्रह, ( २ ) निरनिराळे नमुने व माल यांचा अभ्यास, ( ३ ) ज्या प्रश्नामुळें कारागिराचें काम अडतें असे तान्त्रिक व अन्य प्रश्न शोधून काढणें व सोडविणें.

देशाच्या निरनिराळ्या भागांत अशा अनेक संस्था काढाव्यात कीं ज्यांत हस्त-व्यवसायाच्या कोणत्या ना कोणत्या अंगाचें संशोधन करतां येईल. मध्यवर्ती सरकारनेंहि निरनिराळ्या प्रकारच्या नमुन्यांचें परिशीलन करण्याकरितां व ते तयार करण्याकरितां मध्यवर्ती संस्था काढावी.

## लहान उद्योग.

'लहान उद्योग' या शब्द-समुच्चयांत नवे विद्युत्-शक्तीनें चालणारे आणि जुने परंपरेनें चालत आलेले हातमाग, कुलुपें, भांडीं वगैरे धंदे अंतर्भूत आहेत. नवीन धर्तीच्या लहान धंद्यांना राज्य-सरकार पुष्कळ मदत करूं शकेल. या लहान धंद्यांचे थोडक्यांत तीन गट करतां येतील. (१) स्वतंत्रपणें चालणारे, (२) मोठ्या प्रमाणावरील धंद्याशीं संबद्ध झालेले, आणि (३) त्याच्याशीं स्पर्धा करणारे. पहिल्या गटांतील धंदे सहकारी तत्त्वावर संघटित झाले पाहिजेत. त्यामुळेंच त्यांच्या भांडवलाचा, विक्रीचा व बाजाराचा प्रश्न सुलभ होईल. दुसऱ्या प्रकारच्या धंद्यांना एकंदर उत्पादन-क्रियेपैकीं विशिष्ट प्रकारची क्रिया लहान प्रमाणावर सोंपवून देण्याला पुष्कळच वाव आहे. मोठ्या धंद्याच्या स्पर्धेमुळें चट्टा बसणाऱ्या लहान धंद्याकरतां त्या विशिष्ट उद्योगांत कांहीं मर्यादित क्षेत्र मध्यवर्ती योजनेप्रमाणें राखून ठेवणें जरूरीचें आहे. त्याचप्रमाणें या लहान धंद्यांना पैशाची, संघटनेची, व शिक्षणाची बरीच मदत मिळणें अवश्य आहे. समान उत्पादनाच्या कार्यक्रमांत कांहीं प्रमाणांतील राखीवपणा हा गृहीतच धरलेला असतो.

घरगुती उद्योग व लहान उद्योग यांना उत्तेजन द्यावयाचें असेल तर राज्याकरितां सरकारनें तो माल घेतला पाहिजे हें तत्त्व आतां मान्य झालें आहे; आणि मध्यवर्ती सरकारनें यासंबंधीं आपलें धोरण नुक्तेंच जाहीर केलें आहे.

औद्योगिक उत्पादनाकरितां नवीं केंद्रें जीं काढलीं जाणार आहेत त्यामुळें लहान धंद्यांच्या नव्या नव्या क्षेत्रांच्या वाढीला पुष्कळच वाव मिळेल. नवीं शहरें वसविणें किंवा सध्यांच्या शहरांना जागा, वीज, वाहतूक वगैरे पुरवून त्यांचा विस्तार करणें ही मध्यवर्ती सरकारच्या कार्यक्रमांतील महत्त्वाची बाब आहे. निर्वासितांची पुनर्वसाहत करण्याकरितां जीं नवीं नगरें व औद्योगिक केंद्रें निघालीं आहेत त्यांतील अनुभवावरून उत्पादन-क्षेत्र कोणतें असावें याचा अभ्यास करण्याचें महत्त्व समजून आलें आहे. हा अभ्यास एकंदर नियोजनांत लहान व मोठ्या प्रमाणावरील धंद्यांत कोणत्या उत्पादनांत समान कार्यक्रम असावा ह्याहि दृष्टीनें महत्त्वाचा आहे.

या नियोजनांत अध्यापन, संशोधन, व पैसा यांच्याहि प्रश्नाशीं संबंध आणला आहे. अध्यापनाच्या बाबतींत असें सुचविलें आहे कीं, ज्या धंद्यांत कायमचा रोजगार मिळेल त्याच धंद्याच्या अध्यापनाकडे लक्ष पुरवावें. दुसरें असें कीं, जें शिक्षण द्यावयाचें तें विद्यमान लहान धंद्यांत जे कारागीर आहेत त्यांनाच द्यावें. नवीं तंत्रें

व नवे नमुने यासंबंधींचें शिक्षण प्रदर्शनांच्या द्वारां द्यावें. ज्या ठिकाणीं मोठ्या धंद्यांचीं संशोधन-केंद्रें आहेत तेथेंच लहान धंद्यांच्याकरितां खास संशोधन-विभाग काढावेत. पैशाच्या बाबतींत कांहीं राज्यांना आपल्यापुरतींच इंडस्ट्रिअल फिनॅन्स कार्पोरेशन्स काढणें शक्य होणार नाहीं. अशा राज्यांचे गट त्याकरितां स्थापन करावेत कीं काय याचा विचार करावा.

शेवटीं हें लक्षांत ठेवावें कीं, ज्या लहान धंद्यांना वाढीकरितां कारागिरी, शिक्षण, व विद्युत्-शक्ति लागते त्या धंद्यांचा निकट संबंध आधारभूत उद्योगाशीं असतो; व त्यांत यंत्रें तयार करणेंहि येतें. लहान धंद्यांच्या प्रगतीकरितां तान्त्रिक शिक्षणांत वाढ हाहि एक महत्त्वाचा घटक आहे.

---

## ९ : उद्योग व दळणवळण.

### औद्योगिक विकास व धोरण.

पंचवार्षिक योजनेंत जरी शेतीच्या वाढीकरितां लागणाऱ्या पाटबंधाऱ्यांना व विजेला अग्रतमक्रम आहे, तरी त्याचा अर्थ औद्योगिक वाढ कमी महत्त्वाची आहे असें नाहीं. शेती-सुधारणासुद्धां एका विशिष्ट मर्यादेपलीकडे जाऊं शकत नाहीं. त्या वेळीं शेतीवर काम करणारा जो जादा वर्ग असतो त्याला उद्योगधंद्याकडे किंवा लोकोपयोगी कामाकडे गुंतवावें लागतें. उद्योगधंद्यांत जें श्रम-उत्पादन असतें तें शेतीपेक्षां जास्त असतें. त्यामुळेंहि औद्योगिक वाढ झपाट्यानें केली पाहिजे हें सिद्ध होतें. अपुऱ्या वाढीच्या देशांत औद्योगिक विभागांत निर्माण केलेली शिल्लक ही शेतकी-विभागांतील शिलकीपेक्षां अधिक सुलभतेनें भांडवलांत खर्चीं घालण्याकरितां बहुशः उपलब्ध होते. उद्योगधंदे, व्यापार व वाहतूक यांच्या वाढींतून व्यावसायिक रचनेला अधिकाधिक विविधता आणणें हें कांहीं काळ अवश्य आहे.

### हिंदी उद्योग-रचना.

आतांपर्यंत उद्योगधंद्यांच्या विकासामध्यें जो जादा भर देण्यांत आला तो वापरण्यांत येणाऱ्या मालांच्या वस्तूवर देण्यांत आला; आणि मूलभूत भांडवली वस्तूंचे उद्योग

मागें पडले. पोलाद व लोखंडाचें उत्पादन हें उदाहरणार्थ मागणीच्या मानानें ५० टक्केसुद्धां नाहीं; आणि आतां जी झपाट्यानें चहूं बाजूंनीं वाढ होत आहे त्याकरितां लागणाऱ्या जरूरीच्या मानानें तर तें उत्पादन अतिशयच अपुरें आहे. निरनिराळ्या उद्योगांकरितां जी यान्त्रिक सामग्री लागते ती तयार करण्याला नुकतीच सुरुवात झाली आहे. कापड-धंद्याच्या यंत्राच्या उद्योगानें ती सुरुवात होत आहे. विद्युत्-शक्ति निर्माण करण्याकरितां लागणारीं यंत्रें परदेशाहूनच आणावीं लागतील; आणि तो कार्यक्रम तर देशानें फार मोठ्या प्रमाणावर हातीं घेतला आहे. मधून मधून उपभोग्य वस्तूंचे उद्योग वाढाविणें जरी जरूरीचें वाटलें, तरी नजीकच्या भविष्यकाळांत व त्यानंतरहि बराच काळपर्यंत आपलें धोरण भांडवली वस्तूंचे उद्योग वाढविणें हेंच असलें पाहिजे. त्यामुळेंच देशाची औद्योगिक इमारत भक्कम होईल.

## औद्योगिक धोरण.

एप्रिल १९४८ मध्यें सरकारनें एका ठरावान्वयें औद्योगिक विकासासंबंधीं आपलें औद्योगिक धोरण जाहीर केलें आहे. मध्यवर्ती सरकारच्या सर्वस्वीं ताब्यांत असलेले धंदे म्हणजे शस्त्रास्त्रें व दारुगोळा, अणुशक्ति व रेल्वे. इतर कांहीं धंद्यांच्या बाबतींत, उदाहरणार्थ—कोळसा, लोखंड व पोलाद, विमानें, जहाजें बांधणें, टेलिफोन, तारायंत्र व बिनतारी यंत्रें, खानिज तेलें वगैरेंच्या यानंतरच्या वाढींची जबाबदारी सरकारवर आहे. अर्थातच त्यांना वाटलें तर त्यांनीं खासगी उद्योगधंद्यांचें सहकार्य घ्यावें. उरलेलें औद्योगिक क्षेत्र खासगी धंद्यांकरितां मोकळें ठेवलें आहे. या खासगी धंद्यांत वैयक्तिक व सहकारितेनें चालवलेले धंदे येतात. तथापि मध्यवर्तीचें नियमन व नियंत्रण हें कांहीं निर्दिष्ट उद्योगाकरितां योजलेलें आहे. हे धंदे भांडवलाच्या व तान्त्रिक कौशल्याच्या दृष्टीनें महत्त्वाचे आहेत.

औद्योगिक विकासाला इतकी जागा आहे, व त्याची इतकी आवश्यकता आहे कीं, सरकारी विभागानें आजच्या परिस्थितींत ज्या धंद्यांत खासगी प्रयत्न करण्यास नाराजी किंवा असमर्थता आहे, तेथें अवश्य ते धोके पत्करणें जरूर आहे. सध्यांच्या धंद्यांचें राष्ट्रीयीकरण करणें फारसें फायद्याचें नाहीं, कारण आपल्यासमोर असलेले पुष्कळसे उद्देश विचारपूर्वक केलेल्या नियमनानें सिद्ध होतील.

१९५१ च्या औद्योगिक-विकास-कायद्याचा उद्देश वर दिलेल्या पद्धतीनुसार उद्योगधंद्यांची वाढ व नियमन करण्याचें सरकारचें धोरण त्यांना कृतींत आणण्यास समर्थ करण्याचा आहे. हा कायदा ३७ धंद्यांना लागू केला आहे. या धंद्यांतील

कारखान्यांना ठराविक मुदतींत नोंद करावी लागेल, आणि नवे कारखाने किंवा जुन्या कारखान्यांची वाढ करावयाची असेल तर त्यांना मध्यवर्तीकडून परवाना काढावा लागेल. विशिष्ट परिस्थितींत सरकारला कोणत्याहि धंद्याची चौकशी करण्याचा अधिकार आहे, व त्यांनीं जर दिलेल्या सूचनांप्रमाणें वर्तन केलें नाहीं तर सरकार त्याची व्यवस्था आपल्याकडे घेऊं शकतें.

## अग्रक्रम.

खालील अग्रक्रमाचा सामान्य अनुक्रम सुचविला आहे.

(१) उत्पादक वस्तु निर्माण करण्याचे जे ताग व प्लायवुडसारखे धंदे आहेत त्यांची, आणि वापरण्यांत येणाऱ्या वस्तूंच्या म्हणजे कापड, साखर, साबण, वनस्पति या धंद्यांची संपूर्ण शक्ति उपयोगांत आणणें.

(२) भांडवली व उत्पादक वस्तूंच्या लोखंड, पोलाद, अल्युमिनम, सिमेंट, खतें, भारी रासायनिक द्रव्यें, यंत्राचीं हत्यारें वगैरे उद्योगधंद्यांचा विस्तार करणें.

(३) ज्या औद्योगिक कारखान्यावर बरेंचसें भांडवल आतांपर्यंत खर्च केलें आहे ते कारखाने पुरे करणें.

(४) जिप्समपासून सल्फरकरितां, लगद्यापासून वृत्तपत्रीय कागदाकरतां, खनिज द्रव्यें, व जुन्या मोडीपासून लोहव्यतिरिक्त धातु शुद्ध करण्याकरितां कारखाने काढणें जरूर आहे. त्यामुळें कांहीं धंद्यांना जिव्हाळ्याच्या म्हणून लागणाऱ्या वस्तूंचा पुरवठा वाढवितां येईल.

ही जी अग्रक्रमाची योजना दिली आहे तीवरून पांच वर्षांत आपल्याजवळ असलेल्या साधनांचा कसा उपयोग करतां येईल हें दिसून येतें. विशिष्ट बाबतींत निर्णय घेण्यापूर्वी आणखी कांहीं घटकांचा विचार करावा लागेल. १९५१ च्या कायद्यांत दिलेली परवान्याची पद्धत ही नवे उद्योग काढण्याच्या दृष्टीनें व असलेले वाढविण्याच्या दृष्टीनें काळजीपूर्वक व निःपक्षपातीपणानें सर्व प्रश्नांचा विचार करील.

## सरकारी विभागांत वाढ.

मध्यवर्ती व राज्य-सरकारच्या औद्योगिक योजनांकरितां नियोजनांत ९४ कोटींचा खर्च धरला आहे. सरकारी विभागांत ज्या योजना चालू आहेत त्या पुऱ्या केल्या जातील; आणि एक नवी लोखंड व पोलादाची योजना-जिला १९५५–५६ पर्यंत ३० कोटि रुपये लागतील, व एकंदर सहा वर्षांत ८० कोटि रुपये लागतील, तिची तरतूद करण्यांत आली आहे. या योजनेकरतां सरकार १५ कोटि देईल, व

बाकीचे पैसे देशांतल्या व परदेशांतल्या भांडवलांतून उभे केले जातील. या ९४ कोटींशिवाय नियोजनांत मूलभूत उद्योगाच्या वाढीकरितां ५० कोटि रुपये धरले आहेत. त्यांत अनुषंगिक वाहतुकीच्या सोईकरितां रक्कम धरलेली आहे.

## सरकारी धंद्यांची व्यवस्था.

खासगी धंद्यांपेक्षां सरकारी धंद्यांच्या उत्पादनाचा दर्जा हा अधिक चांगला असला पाहिजे, व त्याकरितां जास्त कडकपणा पाहिजे. जे अधिकारी प्रत्यक्ष काम करणारे असतील, त्यांनीं पुष्कळच उपक्रमशील असलें पाहिजे. त्यांना तात्काळ निर्णय घेण्याचे अधिकार असावेत. ह्या धंद्यांनीं आपल्या कारभाराबद्दल जनतेला जबाबदार असलें पाहिजे हें खरें, पण त्यांच्यावर दैनंदिन कारभारांत सरकारी नियंत्रण असतां कामा नये. मध्यवर्ती सरकारच्या अखत्यारींतील बरेचसे औद्योगिक धंदे हे स्वतःचें नियामक-मंडळ व स्वतःची व्यवस्था असलेल्या जॉइंट स्टॉक कंपनींत संघटित झाले आहेत. राज्य-सरकारच्या अखत्यारींतील असे धंदे त्याच पद्धतीनें चालावेत.

## खासगी विभाग-वाढ.

औद्योगिक क्षेत्रांतील बहुतेक बराच भाग व्यापण्याची जबाबदारी व सुरुवात ही खासगी धंदेवाइकांकडेच आहे. खासगी धंदे वाढविण्याचा कार्यक्रम उद्योगधंद्यांच्या प्रतिनिधींच्या सल्ल्यानें आंखण्यांत आला आहे. वर अग्रक्रमाची जी आंखणी केली आहे तिला अनुसरूनच निरानिराळ्या क्षेत्रांत वाढीला किती जागा आहे व जरूरी किती आहे याचा काळजीपूर्वक अंदाज केला आहे. चांगल्या प्रकारें संघटित झालेल्या अशा ४२ उद्योगांच्या तपशीलवार अभ्यासाचे परिणाम एका स्वतंत्र खंडांत दाखविणारें प्रकाशन केलें जाईल.

खासगी विभागांत उद्योगधंद्यांच्या वाढीकरितां लागणारें एकूण भांडवल २३३ कोटि रु. अंदाजीं लागेल. यांतील ८० टक्के भांडवली माल व उत्पादक मालांच्या धंद्याकरितां लागतील. त्यांतील मुख्य मुख्य धंदे व खर्च पुढीलप्रमाणें:—लोखंड व पोलाद ४३ कोटि, पेट्रोल शुद्ध करण्याचा कारखाना ६४ कोटि, सिमेंट १३१ कोटि, अल्युमिनम ९ कोटि, कृत्रिम खतें, भारी रासायनिक द्रव्यें, पॉवर अल्कोहोल यांकारितां १२ कोटि रुपये लागतील. वापर-वस्तूंच्या उद्योगाकारितां सध्यां जे कारखाने आहेत त्यांतूनच जास्तींत जास्त उत्पादन करण्याचा प्रयत्न केला जाईल. रेयॉन, कागद, औषधें व औषधें तयार करण्याचे कारखाने यांच्या नव्या धंद्यांवर बरीच रक्कम खर्च

करण्याचा विचार आहे. कापूस व लोकर यांच्या सुतामध्यें थोडीशी वाढ व्हावी हेंहि ध्यानांत ठेवलें आहे. खासगी विभागांत अधिक वीज उत्पादनाकरितां १६ कोटि रुपये पांच वर्षांत धरले आहेत.

## १९५१–५६ औद्योगिक वाढ–सारांश.

खासगी सरकारी विभागांत उद्योगधंद्यांच्या वाढीकरितां ३२७ कोटि रुपये अंदाजीं भांडवल धरलें आहे. त्यांतील ९४ कोटि सरकारी विभागाकरितां व २३३ कोटि खासगी विभागाकरितां आहे. याशिवाय जुन्यांच्या जागीं नव्यांची स्थापना व आधुनिकीकरण याला १५० कोटि रुपये अधिक लागतील. चालू भांडवल व इतर खर्च याचा अंदाज करितां एकंदर ७०७ कोटि रुपयांची आपल्याला जरूरी लागेल. हे पैसे कोठल्या साधनांनीं मिळतील याचें दिग्दर्शन केलें आहेच.

नियोजन-समितीनें काढलेलें औद्योगिक कार्यक्रमाचें लक्ष्य.

| | १९५०–५१ उत्पादन | १९५५–५६ मधील उत्पादनाचें लक्ष्य |
|---|---|---|
| अशुद्ध लोखंड | १५·७ लाख टन | १९·५ लाख टन |
| शुद्ध पोलाद | ९·८ ,, ,, | १२·८ ,, ,, |
| सिमेंट | २६·९ ,, ,, | ४५·० ,, ,, |
| अल्युमिनम | ३·७ ,, ,, | १२·० ,, ,, |
| ॲमोनियम सल्फेट | ४६,५०० ,, | ४,५०,००० ,, |
| सुपर फॉस्फेट | ५८,१०० ,, | १,८०,००० ,, |
| रेल्वे-एंजिनें | ५८,१०० | १७०· |
| यंत्राचीं हत्यारें | १,१०० | ४,६०० |
| प्रवाही पेट्रोल | माहिती उपलब्ध नाहीं | ४० को. ३० ल. गॅलन्स |
| बिटयुमेन | ,, | ३७,५०० टन |
| सूत | ११,७६० लक्ष पौंड | १६,४०० लक्ष पौंड |
| गिरणी-कापड | ३७,०८० लक्ष वार | ४७,००० लक्ष वार |
| हातमाग-कापड | ८,१०० लक्ष वार | १७,००० ,, ,, |
| ताग-कापड | ८,९२,००० टन | १२,००,००० टन |
| यान्त्रिक पंप्स | ३४,३०० | ८५,००० |
| डिझेल एंजिन्स | ५,५०० | ५०,००० |
| सायकली | ९९,९०० | ५,३०,००० |
| पॉवर अल्कोहोल | ५० लाख गॅलन | १ को. ८० लक्ष गॅलन्स |

वर जें अपेक्षित उत्पादन धरलें आहे तें पुष्कळांशीं खासगी धंद्यांनीं आंखलेला कार्यक्रम पार पाडण्यावर अवलंबून आहे. त्यांना पैसे किती मिळतील यावर त्यांचेंहि कार्य-कर्तृत्व अवलंबून राहील.

## परदेशी भांडवल.

सरकारचें या भांडवलासंबंधींचें धोरण देशी व परदेशी भांडवलांत भेदाभेद न करण्याचें, नफा पाठविण्यास योग्य सवलती, भांडवल-फेड, आणि राष्ट्रीयीकरण झाल्यास योग्य व न्याय्य मोबदला अशा स्वरूपाचें आहे. परदेशाहून आलेलें भांडवल ज्या धंद्यांना जास्तींत जास्त अग्रस्थान आहे त्या धंद्याकडे लावणें इष्ट आहे.

त्यासंबंधींचें स्थूल तत्त्व पुढीलप्रमाणें आहे. जेथें नवे धंदे काढावयाचे आहेत तेथें तें भांडवल घालणें; किंवा जेथें खास प्रकारचा अनुभव किंवा कौशल्य लागत असेल, किंवा जेथें देशांत पुरवठ्यापेक्षां मागणी जास्त असेल तेथें घालणें, किंवा जेथें अपेक्षेच्या प्रमाणांत देशी धंदे वाढण्याची शक्यता नाहीं अशा धंद्यांत घालणें असें तें तत्त्व असेल. देशी व परदेशी धंदेवाले जर भागीदारीनें एखादा धंदा काढूं इच्छित असतील तर त्याला सरकारची संमति लागेल.

## औद्योगिक उत्पादन.

उत्पादन हें पुष्कळ अस्थिर घटकांवर अवलंबून असतें. यंत्राचा आकार, कच्च्या मालाचे गुणधर्म, तान्त्रिक कामगारांची कार्यक्षमता, कामगार-वर्गाची लायकी, आणि ह्या निरनिराळ्या घटकांचें जास्तींत जास्त लाभदायक असें एकसूत्रीकरण करण्याची व्यवस्थापकांची पात्रता. १९३९ सालापासून वरील गोष्टींपैकीं प्रत्येक गोष्ट प्रतिकूल असल्यामुळें आपल्या उत्पादनांत घट झाली. उत्पादनांत सुधारणा करणें हें पुढील काळांत आपलें मुख्य उद्दिष्ट असलें पाहिजे. सरकारनें शास्त्रीय व औद्योगिक संशोधनाच्या बाबतींत महत्त्वाचें कर्तव्य बजावलें पाहिजे. पण खासगी उद्योगधंदे जितकी कळकळ व जितकी उपक्रमशीलता दाखवतील तितकें यश आपल्याला मिळेल.

मॅनेजिंग एजन्सीच्या पद्धतीवर बरेंचसे धंदे सध्यां चालू आहेत. त्या पद्धतीवर कडक टीका झाली आहे. कारण त्यांतील बरेंचसे घोटाळे उजेडांत आले. कंपनी लॉ कमिटीनें या प्रश्नाची तपशीलवार तपासणी केली, व त्यांनीं केलेल्या शिफारशींची पाहणी सरकार करीत आहे. तो प्रश्न गुंतागुंतीचा आहे, व लांबवर पसरलेला आहे. औद्योगिक व्यवस्थेच्या बाबतींत करावयाच्या बदलांचा प्रश्न दूर ठेविला तरी तत्त्व स्पष्ट आहे. नियोजित अर्थ-व्यवस्थेंत औद्योगिक व्यवस्थापकांना कठोर कसोट्यांना उतरावें

लागतें; आणि त्यांच्यावर फक्त भागीदारांना जबाबदार राहण्याची जबाबदारी नसते, ते जनतेलाहि जबाबदार असतात.

## शास्त्रीय व औद्योगिक संशोधन.

राष्ट्राच्या नियोजित अर्थ-व्यवस्थेंत शास्त्राकडे महत्त्वाचें काम असतें. शास्त्रीय संशोधनामुळें तान्त्रिक सुधारणा झाल्या तर उत्पादनांत वाढ होते. स्वस्त व विपुल माल वापरण्यांत आल्यास दुर्मिळ मालाची उणीव दूर होते, व राष्ट्रीय साधन-सामग्रींत भर पडते. ज्या वस्तु उपयोगांत आणल्या जात नसतात त्याहि संशो-धनामुळें उपयोगीं पडूं लागतात.

स्वातंत्र्यानंतर शास्त्रीय संशोधन व पाहणीचे कार्यक्रम पुष्कळच वाढले आहेत. त्याकरितां पुढील संशोधनालयें काढण्यांत आलीं आहेत—

१. नॅशनल फिजिकल लॅबोरेटरी, नवी दिल्ली.
२. नॅशनल केमिकल लॅबोरेटरी, पुणें.
३. नॅशनल मेटॅलर्जिकल लॅबोरेटरी, जमशेदपूर.
४. फ्युएल रिसर्च इन्स्टिटयूट, जीलगोरा.
५. सेंट्रल फूड टेक्नॉलॉजिकल रिसर्च इन्स्टिटयूट, म्हैसूर.
६. सेंट्रल ड्रग रिसर्च इन्स्टिटयूट, लखनौ.
७. सेंट्रल ग्लास अँड सिरॅमिक रिसर्च इन्स्टिटयूट, कलकत्ता.
८. सेंट्रल रोड रिसर्च इन्स्टिटयूट, दिल्ली.
९. सेंट्रल बिल्डिंग रिसर्च इन्स्टिटयूट, रुडकी.
१०. सेंट्रल लेदर रिसर्च, मद्रास.
११. सेंट्रल इलेक्ट्रो केमिकल रिसर्च इन्स्टिटयट, कराईकुड.

यांतील ११ वी संस्था अद्याप सुरू झाली नाहीं. लेदर व बिल्डिंग्ज् या संस्थांचे नुसते बीजभूत भाग काम करीत आहेत. बाकीच्या संस्थांचें स्थापनाकार्य पुरें झालें आहे. वरील संस्थांशिवाय नियोजन-कालांत पुढील संस्था स्थापण्याचें योजिलें आहे.—

१. रेडिओ व इलेक्ट्रॉनिक्स रिसच इन्स्टिटयूट.
२. मेकॅनिकल एंजिनीअरिंग रिसर्च इन्स्टिटयूट.
(घरगुती व लहान धंद्यांच्या अभ्यासावर भर)
३. सेंट्रल सॉल्ट रिसर्च इन्स्टिटयूट.

सरकारनें पुढील ३ संशोधन-संस्थांच्या स्थापनेला भरपूर मदत दिली आहे--

१. अहमदाबाद टेक्स्टाइल इंडस्ट्री, रिसर्च अॅसोसिएशन.

२. सिल्क अँड आर्ट सिल्क रिसर्च अॅसोसिएशन.

३. साउथ इंडिया टेक्स्टाइल इंडस्ट्री रिसर्च अॅसोसिएशन.

## खनिज साधन-सामग्री.

औद्योगिक वाढीकरितां लागणारी मूलभूत साधन-सामग्री--कोळसा व अशुद्ध लोह—हिंदुस्थानांत आहे; पण आपल्याजवळ अशुद्ध तांबें, टिन, शिसें, जस्त, गंधक व पेट्रोल नाहीं. अल्युमिनमचें खनिज द्रव्य, रिफ्रॅक्टरीज, अॅब्रेझिव्इज्, चुनखडी आपल्याकडे बरीचशी आहे; टिटॅनियम व थोरियम खनिज द्रव्यें व अभ्रक पुष्कळ आहे.

आतांपर्यंत आपण खनिज द्रव्यें फक्त निर्यातीकरितां काढीत होतों. राष्ट्रीय संपत्तीचीं तीं साधनें आहेत असें आपण मानीत नव्हतों. पण आतां त्यांचा उपयोग विकासाकरितां भक्कम व आर्थिक तत्त्वावर केला पाहिजे. खनिज संपत्तीचा उपयोग पुढील धोरणानें केला जावा.--

(१) साधनांची मोजदाद, निरनिराळ्या खाणींमध्यें किती व केवढ्या किंमतीचीं द्रव्यें आहेत हें पद्धतशीरपणें शोधलें पाहिजे.

(२) योग्य रीतीनें खनिज कामें करणें, त्यांत ह्या कामाकरितां लागणारा लायक नोकरवर्ग; फक्त वरच्या प्रतीच्या खनिजांचें वेंचक काम करण्याचें थांबविणें; रद्दी पदार्थांच्या ढिगांतून मौल्यवान् खनिज द्रव्यें शोधून काढणें; निरनिराळ्या जातींच्या खनिजांकरितां किफायतशीर जमिनीचा भाग किती असावा याच्या मर्यादा ठरविणें; लोखंड, मॅंगॅनिज यांच्या अशुद्ध धातु आणि क्रोमाइट व बॉक्साइट या खनिजांच्या भाडेपट्ट्यांना सरकारी संमति घेणें ह्या बाबी येतात.

(३) सल्फर, टंगस्टेन ओअर, टिन ओअर या महत्त्वाच्या खनिजांचे शोध लावणें.

(४) हलक्या प्रतीच्या अशुद्ध खनिजांच्या सांठयांची मोजदाद करणें व त्यांच्या शुद्धीकरणाच्या प्रश्नांचें संशोधन करणें.

(५) निर्यातीकरितां खनिज पदार्थांचें शुद्ध किंवा अर्ध-शुद्ध स्वरूपांत रूपान्तर करणें.

( ६ ) इंडियन ब्युरो ऑफ माइन्स या संस्थेला खनिज धंद्याचे व व्यापाराचे या देशांतील आणि परदेशांतील अर्थविषयक आंकडे गोळा करण्याचे अधिकार देणें.

पुढील परिच्छेदांत मुख्य मुख्य खनिजांची माहिती व त्याकरितां नियोजनांत योजिलेला कार्यक्रम दिला आहे.—

**कोळसा:**—शेंकडा ८२ टक्के कोळसा बिहार व पश्चिम बंगालमध्यें होतो. मध्य प्रदेश, ओरिसा, हैद्राबाद व आसाममध्यें बाकीचा कोळसा होतो.

१९३२ सालीं चालू शकणाऱ्या कोळशाचा सांठा २,००० कोटि टन होता. त्यांतील चांगल्या जातीचा फक्त ५०० कोटि टन कोळसा होता.

**कोक:**—कोकिंग कोल ( ज्या कोळशांतून वायु काढून घेतला आहे )चा सांठा अलीकडील पाहणीप्रमाणें २०० कोटि टनांचा आहे. आधुनिक खनिज पद्धतीप्रमाणें आणखी १६० कोटि टन कोक काढतां येईल.

इतर प्रतीच्या कोळशांचा सांठा किती आहे याची विश्वसनीय माहिती नाहीं. नियोजनांत कोळशांच्या खाणींचें संशोधन करण्याची शिफारस केली आहे.

गेल्या तीस वर्षांत कोळशाचें उत्पादन जवळजवळ दुप्पट झालें आहे. १९५१ मध्यें त्यानें ३ कोटि ४० लाखांचा उच्चांक गांठला.

**वापर:**—कोळशाचा वापर हा मुख्यतः रेल्वे ३१%, धातूच्या व एंजिनीअरिंगच्या कारखान्यांत १३·६%, कापडाच्या व लोकरीच्या गिरण्यांत ५½% होतो. रेल्वेमध्यें ४० टक्के व पोलादामध्यें २१ टक्के धातूचा कोळसा खपतो. बाकीचा कोळसा किरकोळ धंद्यांना लागतो. पोलाद व लोखंडाच्या धंद्याकरितांच फक्त हा धातु-कोळसा वापरावा; व बाकीच्या धंद्यांना दुसरा कोळसा द्यावा. लोखंड—पोलादाचा धंदा हा वाढता धंदा आहे, व त्याकरितां हा कोळसा राखून ठेवणें अवश्य आहे. धातूच्या कोळशाऐवजीं दुसऱ्या प्रकारचा कोळसा वापरतांना चालू धंद्याची घडी विस्कटणार नाहीं हें पाहावें. त्याकरितां पुढील शिफारशी केल्या आहेत.

( १ ) जिऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडियानें ब्युरो ऑफ माइन्सच्या समवेत सर्व कोळशाच्या खाणींच्या भू-गर्भाचे नकाशे काढावेत, व त्यांच्या सांठ्यांचा अंदाज करावा.

( २ ) बिहार व बंगालच्या कोळशाच्या खाणींमध्यें व खाणीसभोंवर वाळू व खड्डे भरून टाकणारें इतर सामान काय आहे याची माहिती गोळा करावी.

( ३ ) कोळशाच्या सांठ्याची भौतिक व रासायनिक पाहणी करावी. तशीच कोळशाच्या ज्वलन-शक्तीच्या, राखेच्या, व कोकच्या गुणधर्माच्या दृष्टीनें पुन्हा शास्त्रीय वर्गीकरण करावें. त्याचा हेतु कोणत्या कामाला कोणता कोळसा येईल याची प्रत व प्रकार ठरविण्याचा असावा.

( ४ ) कोळशाची वाहतूक सुबुद्ध रीतीनें करणें. त्याचा उद्देश उत्पादन व वांटणी विचारपूर्वक करण्याचा असावा. त्यामुळें जास्त प्रतीच्या कोळशाच्या-ऐवजीं कमी प्रतीचा कोळसा वापरतां यावा. आस्तित्वांत असलेल्या खाणींतून उच्च प्रतीच्या कोळशाचें उत्पादन वाढवावें, व सभोंवारच्या जागेंतूनहि हें असेंच उत्पादन वाढवावें.

( ५ ) फयुएल रिसर्च संस्थेनें कार्बनायझेशनचें, धुण्याचें, मिसळण्याचें, व कोळशांतून सल्फर काढून टाकण्याचें संशोधन करावें.

## कोळशाच्या उद्योगाची वाढ व नियंत्रण.

नियोजन-समितीनें पुढील कायदे करावेत अशी शिफारस केली आहे.

( १ ) खड्डे भरण्याची सक्ति.

( २ ) आतां निरनिराळे कर ( सेस ) घेतात त्याऐवजीं एकच एकत्रित कर घ्यावा.

( ३ ) कोल बोर्ड स्थापावें. त्यानें व्यापक दृष्टीनें कोळशाविषयीं सर्व प्रश्नांचा विचार करावा. ह्याबद्दल जी उपाययोजना करावयाची ती एकदम न करतां टप्प्याटप्प्यानें करावी असेंहि सुचविलें आहे.

या शिफारशींना अनुसरून १९५२ चा कोल-माइन्स-कायदा मध्यवर्ती सरकारनें केला.

## अशुद्ध लोह.

बिहार, ओरिसा, मध्य प्रदेश, मद्रास, मुंबई, गोवा व म्हैसूरमध्यें चांगल्या जातीचें अशुद्ध लोखंड आहे. त्यांत चांगल्या जातीच्या लोखंडाचे ठोकळ अंदाजानें १,००० कोटि टनाचे सांठे आहेत. तथापि याबद्दल विश्वसनीय माहिती उपलब्ध नाहीं. जे मुख्य लोखंड व पोलादाचे उत्पादक आहेत त्यांच्याजवळ थोडीफार माहिती आहे तेवढीच. पुढील महत्त्वाच्या ठिकाणच्या खाणींचे अंदाज घ्यावेत. ओरिसा ( बोनाई व केओंजहार ), मध्यप्रदेश ( द्रुग, चांदा व बस्तर ), मुंबई ( रत्नागिरी व गोवा ), आणि मद्रास ( सांडूर ).

गेल्या कांहीं वर्षांत अशुद्ध लोखंडाचें सरासरीनें वार्षिक उत्पादन २० ते ३० लाख टन होतें. बिडाचें व पोलादाचें उत्पादन नियोजनाप्रमाणें होण्यास अधिक अशुद्ध लोखंड १३ लाख टन, अधिक कोळसा १५ लाख टन, अधिक ३०,००० टन मँगेनीज ओअर, व ३ लाख टन अधिक चुनखडी पाहिजे.

अलीकडे अशुद्ध लोखंडाची निर्यात वाढली आहे; पण दीर्घकालीन योजना बिडाचें उत्पादन वाढवून तें देशांत वापरावें, व शक्य तर परदेशीं पाठवावें अशी आहे.

## मँगेनीज ओअर.

हिंदुस्थान हा मँगेनीज ओअर निर्माण करणारा एक मुख्य देश आहे. त्याच्या खाणी मध्य प्रदेशांत आहेत. त्याच्या सांठ्याचे विश्वसनीय आंकडे नाहींत; पण सामान्य अंदाजाप्रमाणें उच्च प्रतीचा मँगेनीज ओअर १॥ ते २ कोट टन, व हलक्या प्रतीचा त्याच्या तिप्पट आहे.

गेल्या ४० वर्षांतील उत्पादनाची सरासरी ६ लाख टन आहे. तें सर्व आपण तेव्हां निर्यात करीत होतों, व आजहि बहुतेक सर्व निर्यातच केलें जातें. आपल्या देशांत त्याचा वापर अगदींच तुटपुंजा आहे. तो पोलादाच्या धंद्याला लागतो. कांहीं काळपर्यंत उच्च प्रतीचें ओअर दरसाल १० लाख टनपर्यंत निर्यात करण्याचें संमत झालें आहे. पण या धोरणाची फेरपाहणी होत आहे.

नियोजनामध्यें मध्यप्रदेश, ओरिसा, मुंबई, म्हैसूर व मद्रासमधील मुख्य खाणींची पाहणी करावी अशी योजना अंतर्भूत केली आहे. फेरो-मँगेनीज यंत्रें बसविण्याचा विचार सुरू आहे. त्यांत हेतु असा आहे कीं, अशुद्ध मँगेनीजचे फेरो मँगेनीज व दुसऱ्या तयार जिनसा कराव्या व त्या निर्यात कराव्या. कारण त्याचा पैसा पुष्कळ येतो.

## क्रोमाइट.

बिहार, म्हैसूर, मुंबई, मद्रास व ओरिसामध्यें थोडेंबहुत क्रोमाइट सांपडतें. पूर्वी या उत्पादनांतील बहुतांश व तोहि उच्च प्रतीचा निर्यात करीत. १९४८ सालीं उच्च प्रतीला १०,००० टनांच नियंत्रण घातलें, व १९५१ च्या जूनपासून त्याला पूर्ण बंदी घातली. नियोजनांत त्याची पाहणी व संशोधन करावें अशी योजना सुचविली आहे.

## बिनलोहाच्या धातु.

हिंदुस्थानांत तांबें, शिसें व जस्त अपुरें आहे. टिन तर जवळजवळ नाहींच. या धातूंच्या आयातीची किंमत १९५० मध्यें १६ कोटि होती. तांब्याची महत्त्वाची खाण सिंगभूम ( बिहार ) मध्यें आहे, व तिचें काम चालू आहे. तांब्याच्या धातूचें उत्पादन ६,००० तें ६,६०० टन आहे, व तें अगदींच अपुरें आहे. शिसें व जस्ताच्या खाणी झावर ( राजस्थान ) मध्यें आहेत. शिशाकरितां ती खाण चालते. जस्त आटवण्याची भट्टी आपल्याकडे नाहीं; पण एक कमिटी तिच्या शक्यतेची तपासणी करीत आहे. नियोजनांत ह्या सर्व धातूंच्या खाणींची पाहणी करावी असें सुचविलें आहे.

## बॉक्साइट.

मुंबई, मध्यप्रदेश व बिहारमध्यें बॉक्साइट सांपडतें. २५ कोटि टनाचा सांठा असावा असा अंदाज आहे. त्यांतील उच्च प्रतीचें ३॥ कोटीच आहे. बॉक्साइटचें उत्पादन १९४०-४४ सालीं १५,००० टन सरासरीनें होतें. १९५१ मध्यें तें ६७,००० टन झालें. त्यापैकीं निम्याहून कमी ॲल्युमिनमकरितां वापरतात. ॲल्युमिनमच्या उत्पादनाची वाढ करावी. १९५५-५६ सालीं त्या वाढीकरितां ४५,००० टनांपर्यंत त्याला मागणी येईल असें धरण्यांत आलें आहे.

## मॅग्नेसाइट.

मॅग्नेसाइटचे मोठाले सांठे सालेम ( मद्रास ) व म्हैसूरमध्यें आहेत. सालेममधील हे सांठे ९ कोटि टन आहेत. मॅग्नेसाइटचे व क्रॉमाइटचे खडकाचा उपयोग रिफ्रॅक्टरीकारितां करावा अशी शिफारस करण्यांत आली आहे.

## अभ्रक.

हिंदुस्थानांत उत्तम प्रकारचें अभ्रक होतें, व जगांतील अभ्रकापैकीं ८० टक्के अभ्रक आपला देश पुरवतो. त्याच्या मुख्य मुख्य खाणी बिहार, राजस्थान व मद्रासमध्यें आहेत. बिहारमध्यें ६० टक्के अभ्रक सांपडतें.

अभ्रकाच्या सांठ्याची पुरी माहिती उपलब्ध नाहीं. आतांच्या प्रमाणांत जर उत्पादन झालें तर त्याकरितां पुष्कळ वर्षें पुरेल इतकें अभ्रक आपल्याजवळ आहे. गेल्या दहा वर्षांत त्याचें उत्पादन दुपटीपेक्षां अधिक झालें आहे, व निर्यातीची किंमत १॥ कोटि जी १९४० ते ४७ च्या दरम्यान होती ती १९५०-५१ मध्यें ९॥ कोटि झाली आहे.

अभ्रक हें मुख्यत: निर्यातीकरितांच तयार केलें जातें. त्याच्या उत्खननाच्या पद्धतींत खपांत वाढ झाली तरी सुधारणा झाली नाहीं. लहान लहान खाणींतून तें काढतात. त्यांतील बरेंचसें वायां जातें. तें टाळण्याकरितां अभ्रकाची प्रत व वर्गीकरण करणें निर्यातीच्या दृष्टीनें अवश्य आहे. त्याचा चांगुलपणा अगर वाईटपणा हा मतावर अवलंबून आहे. विकणारे व विकत घेणारे यांच्यांतील मतभेद कमी करावे, म्हणून इंडियन स्टॅंडर्ड इन्स्टिटयूटनें कांहीं ठराविक प्रमाणें आन्तरराष्ट्रीय मान्यतेकरितां तयार करण्याचें काम सुरू केलें आहे. नियोजनानें पुढील शिफारशी केल्या आहेत— (१) बिहार व मद्रासमधील खाणींची फेर-आंखणी करावी व राजस्थानमध्यें तपशीलवार भूस्तराची पाहणी करावी. (२) ब्युरो ऑफ माइन्स, व नॅशनल फिजिकल लॅबोरेटरीजनें अभ्रकाच्या गुणधर्मानुसार वर्गीकरणाकरितां आणि मिकानाइट व अभ्रक दळण्याकरितां संशोधन करावें. (३) लहान लहान उत्पादन करणारांचे सहकारी संघ स्थापावेत. (४) मध्यवर्ती मार्केटिंग बोर्ड स्थापन करितां येईल का याची शक्यता पहावी.

## जिप्सम.

सिंद्रीला खताचा कारखाना काढल्यामुळें जिप्समची अत्यंत जरूरी वाटूं लागली आहे. राजस्थान व दक्षिण हिंदुस्थानांत त्याचे सांठे आहेत; पण उत्तर व पश्चिमेकडे लहान लहान संचय असावेत, त्याचा शोध व्हावा. एकंदर अंदाजी सांठे ६ कोटि ७० लक्ष टन आहेत. त्यापैकीं ५ कोटि राजस्थानमध्यें आहेत. १९४४–४८ मध्यें सरासरीनें दर वर्षी ६५,००० टन जिप्सम होत असे, तें १९५० मध्यें २,०६,००० टन झालें. खताच्या व सिमेंटच्या कारखान्यांमुळें जिप्समचा खप ८,७०,००० टनांवर जाईल असें वाटतें.

मिठागरांतून जिप्सम मिळतें का याचें नीट संशोधन करण्याची सूचना नियोजनांत केली आहे.

## गंधक.

हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणावर मोठ्या पायराइटच्या स्वरूपांत गंधक हें काश्मीर, सिमला, अजमोर (बिहार), मुंबई, व मद्रासमध्यें सांपडतें; आसाम व विंध्य-प्रदेशांत कोळशाच्या खाणींत तें कोळशाबरोबर सांपडतें.

अजमोर व कारवारमधील पायराइटच्या संचयाचा अंदाज केला जात आहे.

सल्फरची सध्यांची जरूरी ६५,००० टन आहे, व खप ५०,००० टन आहे. खप कमी असण्याचें कारण पुरवठ्याची कमतरता. १९४८ सालीं आपण ३८,३०० टन आयात केली; १९५० सालीं ५५,००० टन केली. १९४८ सालीं ६१ लक्ष ६५ हजार रुपये व १९५० सालीं १ कोटि १० लक्ष रुपये त्याकरितां दिले. १९५५-५६ सालीं सल्फ्युरिक ॲसिडकरतां आपल्याला ८५,००० टन गंधक लागेल.

नियोजनांत गंधक सांपडण्याची जेथें शक्यता आहे त्याची पाहणी करावी; आणि तांबें व शिसें यांच्या आटविण्याच्या क्रियेंत तें सांपडतें का हें पहावें. तसेंच ज्या कोळशांत जास्त गंधक असेल त्याचीहि तपासणी करावी. जेथें शक्य असेल तेथें गंधकाऐवजीं दुसरा कच्चा माल वापरावा अशीहि शिफारस केली आहे.

## खनिजांचा विकास-कार्यक्रम.

जिऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया, इंडियन ब्युरो ऑफ माइन्स, मेटॅलर्जिकल लॅबोरेटरी, सेंट्रल ग्लास व सिरॅमिक रिसर्च इन्स्टिटयूट, व फ्युएल रिसर्च इन्स्टिटयूट या संस्थांनीं पद्धतशीर व तपशीलवार पाहणी व तपासणीचें काम करावें याबद्दल नियोजनांत तरतूद केली आहे. त्याचा कार्यक्रमहि दिला आहे. त्यांत पुढील सूचना आहेत.

( १ ) जिऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया यांनीं ब्युरो ऑफ माइन्सच्या मदतीनें सर्व खानिजांची पाहणी व आंखणी करावी.

( २ ) ब्युरो ऑफ माइन्सनें खानिज धंद्याच्या आर्थिक प्रश्नासंबंधीं तपशीलवार माहिती एकत्र करावी.

( ३ ) सर्व कोळशांच्या खाणींची भौतिक व रासायनिक पाहणी करावी, व इतर अनुषंगिक गोष्टी कराव्या.

( ४ ) हलक्या प्रतीच्या खानिज द्रव्यांचा उपयोग काय होईल यांची त्या त्या संबंधित खात्यांनीं चौकशी करावी.

( ५ ) चष्म्याची कांच, चिनी मातीचीं भांडीं, रिफ्रॅक्टरीज व इन्सुलेटर्स यांच्या निर्मितीची सेंट्रल ग्लास व सिरॅमिक रिसर्च संस्थेनें तपासणी करावी.

ह्या कामाची सांगड घालण्याकरितां व कार्यक्रमाच्या प्रगतीचें अवलोकन करण्याकरितां नॅचरल रिसोर्सेस मिनिस्ट्रीनें एक तान्त्रिक कमिटी नेमली आहे, व तींत सर्व संबंधी संस्थांचे प्रतिनिधि घेतले आहेत.

## वाहतूक व दळणवळण.

या दोन्ही कार्यक्रमांत जास्त भांडवल रेल्वेमध्येंच आहे. आपल्या रेल्वेपुढें जर कोणता महत्त्वाचा प्रश्न असला तर जुनें सामान काढून टाकून नवें घालण्याचा, आणि पुरेशा साहित्याची व्यवस्था करण्याचा. १९३७ सालीं रेल्वे खातें १९३० च्या मंदींतून बाहेर पडतें न पडतें तोंच दुसरें युद्ध उद्भवलें. त्यामुळें तुंबलेलीं कामें बाजूला पडलीं. युद्धकाळांत तर मागच्या तुंबलेल्या कामांत भर पडली. त्यानंतर फाळणी झाली, आणि नवे प्रश्न उत्पन्न झाले. रेल्वेचे रस्तेहि गेल्या वीस वर्षांत खराब झाले आहेत. या सर्वांची सुधारणा केली पाहिजे.

बाहेर देशांवरील सामग्रीवर अवलंबून राहायला नको म्हणून चित्तरंजनला सरकारनें १५ कोटि रुपये खर्चून एक एंजिनांचा कारखाना काढला. या कारखान्यांत दरसाल १२० एंजिनें व ५० सुटे बॉयलर्स तयार व्हावयास पाहिजेत. सरकारनें टाटा लोकोमोटिव्ह एंजिनीअरिंग कंपनीच्या भांडवलांत आपले सुमारें २ कोटि रुपये घालून त्यांना मदत केली. तुंबलेलीं कामें पुरीं करण्याकरितां व अवश्य तो कमींत कमी वाढीचा कार्यक्रम हातीं घेण्याकरितां दरसाल सरासरीनें ८० कोटि या हिशेबानें पांच वर्षांत एकूण ४०० कोटि रुपये खर्च करणें अवश्य झालें आहे. याशिवाय मौलिक उद्योग व वाहतूक याकरतां जे ५० कोटि रुपये हिशेबांत धरले आहेत त्यांपैकीं कांहीं नवी रेल्वेची सुधारणा हातीं घेतां येईल.

या ४०० कोटींपैकीं मध्यवर्ती महसुलांतून ८० कोटि मिळतील, व उरलेले ३२० कोटि रेल्वेला आपल्याच साधनांतून उभे केले पाहिजेत.

## जहाजें.

जहाजांचा जो कार्यक्रम विकासाकरितां घेतला आहे त्यामुळें जहाजांचें एकूण राजिस्टर्ड टनेज १९५५–५६ सालीं ६०,००० होईल. हीं जहाजें किनाऱ्यावर व अफाट दर्यांतहि फिरतील. नियोजनांत १५ कोटि रुपये जहाजें बांधण्याच्या कंपन्या आहेत त्यांच्या मदतीकरितां धरले आहेत.

## बंदरांची वाढ.

कलकत्ता, मुंबई, मद्रास, कोचीन व विशाखापट्टम् या पांच मोठ्या बंदरांची सध्यांची शक्ति २ कोटि टनांचा माल हाताळण्याची आहे. त्यांत पेट्रोल धरलें नाहीं, आणि देशी जहाजें व गलबतांचा माल धरला नाहीं. ही शक्ति फार अपुरी आहे. बंदरांची वाढ पुढील कारणांकरितांहि अवश्य आहे.

( १ ) फाळणी झाल्यानंतर कराची बंदर गेलें. त्या बंदरामार्फत जीं कामें होत असत त्यांची सोय आतां करावयास हवी.

( २ ) बंदरांवरील पुष्कळशी सामग्री पुरातन व निरुपयोगी झाली आहे.

( ३ ) मुंबईला जो पेट्रोल शुद्ध करण्याचा कारखाना निघणार आहे त्या कारखान्याच्या मालाकरितां बंदराची सोय करणें सरकारनें आपल्यावर घेतलें आहे.

एक नवें मोठें बंदर कांडला येथें या पांच वर्षांत सुरू होईल; तें बंदर कराचीची उणीव भरून काढील. नियोजन-कालांत कांडला बंदराचा खर्च १२ कोटि ५ लाख रुपये अंदाजी होईल. तेल शुद्ध करण्याच्या कारखान्यांची बंदरावर सोय करण्याकरितां आणि बुचर बेटावर पर्यायी सोयी करण्याकरितां ८ कोटि रुपये खर्चावे लागतील. वर दिलेल्या पांच मोठ्या बंदरांना आधुनिक स्वरूप देण्याकरितां च त्यांची वाढ करण्याकरितां नियोजन-कालांत १२ कोटि रुपये खर्च होतील असा अंदाज आहे. ह्या १२ कोटि रकमेंत बंदर-खातें जो १५॥ कोटि रुपये स्वतःचा खर्च करणार आहे त्याची पुरवणी-मदत होईल.

## रस्ते.

रस्त्यांकरितां पुढील पांच वर्षांत तरतूद केली आहे. सध्यां काम सुरू असलेले रस्ते पुरे करणें, ४५० मल नवे रस्ते बांधणें; ४३ फार मोठे पूल व अनेक लहान पूल बांधणें हीं कामें व्हावयाचीं आहेत. यांशिवाय २,२०० मैलांचे रस्ते दुरुस्त करावयाचे आहेत. मध्यवर्ती सरकारच्या पांच वर्षांच्या कार्यक्रमांत राष्ट्रीय रस्त्यां-करितां २७ कोटि रुपये घातलेले आहेत. याशिवाय ४ कोटि रुपये कांहीं निवडक रस्त्यांवर मध्यवर्ती सरकार खर्च करणार आहे. याशिवाय २१ लक्ष १५ हजार रुपये सेंट्रल रोड रिसर्च संस्थेवर खर्च होणार आहेत. राज्यांतर्फे रस्त्यांवर एकूण ७३ कोटि ५४ लक्ष रुपये खर्च होईल. त्यांतील ‘अ’ वर्गीय राज्यें ५० कोटि ५९ लक्ष, ‘ब’ वर्गीय राज्यें १६ कोटि ६८ लक्ष रुपये, व उरलेला खर्च ‘क’ वर्गीय राज्यें करतील.

## बिनलष्करी विमान-वाहतूक.

ही वाहतुकीची बाब अगदीं नवी आहे. सध्यांचा वाहतुकीवरील भार व वाहतुकीची गर्दी लक्षांत घेतां, आतां ज्या विमान-कंपन्या आहेत, त्या सर्व एक केल्या तर त्या आर्थिक दृष्ट्या काटकसरीनें चालूं शकतील.

या त्यांच्या एकत्रीकरणाकरितां विमान-कंपन्यांना जो मोबदला द्यावा लागेल, व नवीं विमानें खरेदी करण्याकरितां जो खर्च येईल त्याला ९॥ कोटि रुपये धरले आहेत.

## पोस्ट, तार व टेलिफोन.

या तीन्हींच्या वाढीकरितां ५० कोटि रुपये खर्च येईल. त्यांतील बराच खर्च २,००० वस्तीच्या खेड्यांत टपाल-कचेऱ्या काढण्याकरितां, व मोठाल्या शहरांत टेलिफोनची सोय करण्याकरितां खर्च होईल.

## परदेशी व्यापार व व्यापारी धोरण.

गेल्या आठदहा वर्षांत हिंदुस्थानचा परदेशी व्यापार आकार-प्रकारानें बराच वाढला.

निर्यातीच्या परिमाणांत झालेला संकोच व युद्ध-पूर्वकालांतील प्रकारांशीं तुलना करतां आतां विविधतेंतली वाढती घट, अन्न व कच्चा माल यांच्या आयातीवरील अवलंबन, डॉलर विभागाशीं होणाऱ्या व्यवहारांत समतोलपणाची उणीव, व यंत्रसामग्री जुनी बदलण्याकरितां व वाढीकरितां झालेली जबर मागणी हें आजच्या परदेशी व्यापाराचें वैशिष्ट्य आहे. नियोजनाच्या प्राथमिक अवस्थेंत जुन्या धोरणांत कांहीं बदल होणार नाहीं. पण ह्या नियोजनाचा हेतु अलीकडे निर्माण झालेले कांहीं प्रश्न सोडवावेत असा आहे. उदाहरणार्थ, अलीकडे जीं अन्नधान्यें, कापशी व ताग यांच्या आयातींत वाढ झाली ती त्या मालाच्या अधिक उत्पादनामुळें कमी होईल. आपल्याकडे जास्त कापूस व ताग होऊं लागला म्हणजे त्यांचा तयार माल अधिक उरेल, व तो निर्यातीला उपयोगीं पडेल. अशीहि आशा आहे कीं, सायकली, शिवण्याचीं यंत्रें, बॅटरी, कापडाचीं यंत्रें, विजेचे पंखे, औषधें, यांच्यासारख्या नव्या नव्या वस्तु आपल्याला निर्यात करतां येतील. सध्यां आपण या वस्तु अल्प प्रमाणावर आशियाच्या आग्नेय विभागांत पाठवीत आहोंच; आणि जेव्हां आपल्या नियोजनाप्रमाणें या वस्तूंचें उत्पादन अधिकाधिक होईल तसतशी ही निर्यात ठळकपणें होत जाईल. जर्मनी व जपान आतां संकटमुक्त होत आहेत, व झेकोस्लोव्हेकिया आणि स्वेडन यांसारख्या भांडवली माल निर्यात करणाऱ्या देशांशीं आपले व्यापारी संबंध स्थापन होत आहेत; त्यामुळें व्यापारांत विविधता येईल, आणि डॉलर-विभागाशीं होणाऱ्या व्यापारांत जो समतोलपणा सुटला आहे तो दुरुस्त होईल.

दुसऱ्या पक्षीं, विकासाचा अफाट कार्यक्रम असला म्हणजे त्यामुळें आयात मालाची मागणी वाढते, व परदेशी हुंडणावळ घटते. या पांच वर्षांतल्या विकास-कार्यक्रमामुळें आपल्याला भांडवली वस्तूंची बरीच आयात करावी लागेल, त्यामुळें जुनीं मागें पडलेलीं बदलाबदलीचीं कामें पुरीं करतां येतील, व नव्या योजनांकरितां लागणारी सामग्री आणतां येईल. याशिवाय नियोजनामुळें जें राष्ट्रीय उत्पन्न वाढेल त्याचा परिणाम परदेशीं वापरण्याच्या वस्तूंच्या वाढत्या मागणींत व देशांतील निर्यातीकरितां उपलब्ध होणाऱ्या वापरण्याच्या वस्तूंच्या शिलकींत घट पडण्यांत होईल. या नियोजनाचा परिणाम म्हणून निर्यातीचें परिमाण चांगलेंच वाढण्याची अपेक्षा असली, तथापि आयात वस्तूंची आवश्यकता लक्षांत घेतां, परदेशी हुंडणा-वळीच्या कमतरतेमुळें तेथील मालांत पडणारी वाण ही पंचवार्षिक योजनेचा योजलेला कार्यक्रम बाहेरची मदत न घेतां पार पाडावयाचा असेल तर अडथळाच आणील. नियोजन अंमलांत येण्याच्या प्रत्येक अवस्थेंत व पांच वर्षाअखेर आयातीचें परिमाण काय राहील हें आयातीवर ज्या मर्यादेपर्यंत आपण नियंत्रण घालूं त्यावर अवलंबून राहील. ही आयात स्वाभाविकपणेंच आपल्याजवळ परदेशी हुंडणावळ किती आहे यावर अवलंबून राहील. नियोजन-कालांत आयात-निर्यातीचें नियमन काटेकोरपणें केलें पाहिजे, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

नियोजन-कालांत मुख्यतः पुढील वस्तूंची निर्यात वाढेल अशी अपेक्षा आहे. कापड, तागाचें सूत व तयार माल; मँगेनीज ओअर, तेलें, कोळसा, कोक; काळीं मिरीं, तंबाखू व लोकरीच्या वस्तु, इतर नव्या नव्या वस्तूहि या पांच वर्षांत निर्यातीच्या बाबतींत चांगल्याच प्रगति दाखवतील. जर उत्पादक वस्तूंचा अर्थ बिन-संस्कारी व अंशतः संस्कार केलेल्या कच्च्या वस्तु असा केला, व त्यांत उत्पादनाकरितां तयार व अर्ध-तयार माल धरला तर त्यांची बेरीज एकंदर आयातीच्या दोन तृतीयांश होते. नियोजनाचा परिणाम म्हणून शेतकीच्या कच्च्या मालाकरितां आयातीवर अव-लंबून राहणें कमी कमी होईल; पण संस्कार केलेल्या कच्च्या मालाची आयात ही पुष्कळच वाढविल्याशिवाय आपण आपलें संकल्पित उत्पादनाचें उद्दिष्ट साध्य करूं शकणार नाहीं. आपण जरी पेट्रोल शुद्ध करण्याचा कारखाना काढीत असलों, व पॉवर अल्कोहोलचा धंदा वाढवीत असलों, तरी १९५५-५६ पर्यंत आपल्याला या वस्तूंच्या आयातीचें प्रमाण चढतें ठेवावेंच लागेल. आपल्या नियोजनाचा, उत्पादना-करितां उपयोगांत आणलेल्या पूर्ण तयार व अर्ध-तयार वस्तूंच्या (मधल्या उत्पादित वस्तु धरून) आयातीवर जो परिणाम होईल तोच परिणाम सर्वसामान्यपणें संस्कारित

कच्च्या वस्तूंच्या आयातीवर होईल. रेल्वेचीं एंजिनें जीं जुन्या एंजिनांचे जागीं आयात करावीं लागतात तीं आणणें बहुधा बंद पडेल. कांहीं बाबतींत जेथें देशांतील उत्पादनाची संकल्पित वाढ ही देशांतील गरजांपेक्षां जास्त होईल तेथें आयात कमी होत जाईल.

उदाहरणार्थ, खतें, ॲल्युमिनम, सिमेंट, कृत्रिम रेशमाचें सूत. पण बाकीच्या बाबतींत आणि विशेषतः भांडवली साहित्याच्या म्हणजे अवजड टिकाऊ वस्तु व धातूच्या बाबतींत आयातींची पातळी बरीच वर चढेल. स्वभावतःच व्यापार-विषयक धोरणांत कांहीं प्रमाणांत लवचिकपणा असला पाहिजे; तथापि कांहीं व्यापक तत्त्वें सोडतां कामा नयेत. व्यापारविषयक धोरणाचा नियोजनाच्या दृष्टीनें पुढील परिणाम झाला पाहिजे--

( १ ) त्या धोरणामुळें उत्पादन व वापर यांची जी कमाल मर्यादा ठरविली असेल ती पुरी झाली पाहिजे.

( २ ) सबंध धोरणाचा भर निर्यातीची उच्च पातळी राखण्यावर असावा.

( ३ ) आयात-निर्यातींतील देण्यांत जी शिलकी तूट असेल ती परदेशी हुंडणावळीचीं त्या त्या कालखंडांत राष्ट्राच्या आंवाक्यांत जीं साधनें असतील त्या साधनांच्या मर्यादेंत असावीं.

( ४ ) निर्यात व आयातीचें जें स्वरूप असेल तें शक्य तोंवर नियोजन कार्यान्वित करण्याकरितां जें कर-वसुलीसंबंधीं व किंमतीविषयीं धोरण अवलंबलें जाईल त्या धोरणांत नीट बसणारें असावें.

( ५ ) शक्य तोंवर धोरणामध्यें सातत्य असलें पाहिजे. त्यामुळेंच दुसऱ्या देशाशीं स्थापन केलेले आयात-निर्यातीचे व्यापारविषयक संबंध वारंवार बिघडणार नाहींत; आणि आपल्या देशांतील उद्योगधंद्यांच्या योजना विस्कटणार नाहींत.

परदेशी व्यापाराची परिस्थिति ही वारंवार बदलणें शक्य असतें; आणि कधीं कधीं तर ती भयंकर बदलते. त्यामुळें नियोजन-कालांत सालोसाल नेमकी किती आयात व किती निर्यात करावी ह्याची मर्यादा ठरविणें निरुपयोगी आहे. त्याचबरोबर आणखी एक अडचण अशी आहे कीं बाहेरील मदत ही केव्हां व कोणत्या प्रमाणांत उपलब्ध होईल याचेंहि नक्की अंदाज करतां येत नाहींत. वर जीं पांच तत्त्वें सांगितलीं आहेत तीं विशिष्ट परिस्थितींत कोणतें धोरण अनुसरावें ह्याचें स्थूल दिग्दर्शन करतील.

# १० : सामाजिक सेवा व रोजगार

## आरोग्य.

कोणत्याहि परिस्थितींत राष्ट्राच्या प्रगतीचें मूळ आरोग्य हेंच आहे. सामुदायिक जीवनाच्या सर्वांगीण विकासाच्या एकाच वेळीं होणाऱ्या सूत्रबद्ध कार्यक्रमाकरितां आरोग्य हा जिव्हाळ्याचा भाग आहे. घरें, पाणी व स्वच्छता यांसारख्या आरोग्य-दायक जीवनाला आवश्यक असणाऱ्या गोष्टी नसणें; निःसत्त्व आहारामुळें प्रतिबंधक शक्ति कमी होणें; औषधपाण्याच्या सोयीचा, सर्वसामान्य व आरोग्यविषयक शिक्षणाचा अभाव; निकृष्ट आर्थिक परिस्थिति हीं सध्यांच्या कमी प्रतीच्या आरोग्याचीं मुख्य कारणें आहेत. सर्वांत मोठी अडचण असेल तर तज्ज्ञांची वाण. वैद्यकीय शिक्षणाच्या वाढत्या सोयी करणें हें अत्यंत महत्त्वाचें आहे. आपल्याकडे असणाऱ्या वैद्यकीय संस्था इतक्या थोड्या आहेत कीं, त्यांच्या द्वारां लोकांना एका समंजस दर्जाची सेवा उपलब्ध करून देणें कठीण आहे. १९४९ सालीं २४,००० शहर-वस्तीला एक संस्था व ५०,००० ग्राम-वस्तीला एक संस्था असें सरासरी प्रमाण होतें.

आरोग्य-योजनांसंबंधीं पुढील अग्रक्रम आहे—

( १ ) पाणी-पुरवठा व स्वच्छतेची सोय;

( २ ) हिंवताप-नियंत्रण;

( ३ ) आरोग्य व फिरतीं केंद्रें यांच्या द्वारां खेड्यांतील रोग-प्रतिबंध;

( ४ ) मुलांना व आयांना आरोग्य-साधनें देणें;

( ५ ) आरोग्य-शिक्षण.

( ६ ) औषधांच्या व उपकरणांच्या बाबतींत स्वयंपूर्णता;

( ७ ) कुटुंब-नियोजन व लोकसंख्येच्या वाढीचें नियंत्रण.

औषधीय व आरोग्य-विषयक योजनांकरितां मध्यवर्ती व राज्यांनीं ९९ कोटि ५० लाखांची नियोजनांत तरतूद केली आहे. त्यांतील १७ कोटि ८७ लाख मध्य-वर्तीचे आहेत. मध्यवर्ती सरकार राज्यांना उच्च शिक्षणाकरितां, संशोधनाकरितां, व कांहीं विशिष्ट योजनांकरितां मदत देईल.

औषधी कार्यक्रमावर खर्च होणाऱ्या ४८ कोटि रुपयांपैकीं ५० टक्क्यांहून अधिक इस्पितळें व दवाखान्यांवर खर्च होतील, आणि ४० टक्के वैद्यकीय शिक्षण व अध्यापनावर खर्च होतील. वैद्यकीय शिक्षण व अध्यापन यांच्या योजनांत ऑल इंडिया मेडिकल इन्स्टिटयूटशिवाय आसाम, मुंबई, मद्रास, मध्य प्रदेश, प. बंगाल, व त्रावणकोर-कोचीन येथील नवीं मेडिकल कॉलेजें पुरीं करणें, मेडिकल स्कूल्स जेथें असतील त्यांना वरच्या प्रतीवर नेणें, आणि नर्सेस, मिडवाइव्ह्ज् व कांपौंडर्स यांच्या शिक्षणाची सोय करणें या बाबी येतात. हा कार्यक्रम पुरा झाल्यावर पुढीलप्रमाणें शिक्षित-वर्ग तयार होईल.

| | शिक्षित संस्था | | वाढीचें शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|
| | १९५०-५१ मध्यें | १९५५-५६ अखेर | |
| डॉक्टर्स | २,५०४ | २,७८२ | ११·१ |
| कांपौंडर्स | ८९४ | १,६२१ | ८१·३ |
| नर्सेस | २,२१२ | ३,००० | ३५·६ |
| मिडवाइव्ह्ज् | १,४०७ | १,९३२ | ३७·३ |
| वैद्य व हकीम | ९१४ | १,११७ | २२·२ |

इस्पितळें व दवाखाने किती वाढतील व त्यांत खाटा किती असतील याची अपेक्षित संख्या पुढीलप्रमाणें:—

| | १९५०–५१ मध्यें | १९५५–५६ अखेर | वाढीची शेंकडेवारी |
|---|---|---|---|
| इस्पितळें ( संख्या ) | २०१ | २,०६२ | २·४ |
| दवाखाने ( शहरांतील ) | १,३५८ | १,६९५ | २४·८ |
| दवाखाने ( खेड्यांतील ) | ५,२२९ | ५,८४० | ११·६ |
| खाटा ( इस्पितळांतील ) | १,०६,४७८ | १,१७,४२२ | १०·१ |
| खाटा ( दवाखान्यांतील ) | | | |
| ( शहरांतील ) | २,०१३ | २,२२३ | ११·४ |
| ( खेड्यांतील ) | ५,०६६ | ५,५८२ | १०·२ |

सार्वजनिक आरोग्याच्या कार्यक्रमाकरितां मध्यवर्ती व राज्य-सरकार ५१·४५ कोटि रुपये खर्च करणार आहे. पाणी-पुरवठा, ड्रेनेज व मलेरिया-प्रतिबंधक योजनां-

वर यांतील बराचसा पैसा खर्च होईल. त्यांतील पाणी व ड्रेनेज-कामाकरितां २३·४९ कोटि खर्ची पडतील. शहरांतील पाणी-पुरवठ्याला या रकमेंतील १२·१२ कोटि रुपये, व खेड्याच्या पाण्याकरितां ११·३७ कोटि रुपये खर्च होतील. मलेरिया हा सार्वजनिक आरोग्याचा महत्त्वाचा प्रश्नच आहे, व त्याच्या प्रतिबंधाला सर्वांत जास्त अग्रस्थान दिलें आहे. राज्यांनीं ७·०४ कोटि व मध्यवर्तीनें १० कोटि रुपये त्याकरितां राखून ठेविले आहेत.

मलेरियाच्या खालोखाल महत्त्वाचा प्रश्न म्हणजे क्षय-रोगाचा. मध्यवर्ती व राज्यांनीं त्याकरितां भरपूर योजना केली आहे, व त्यांनीं पुष्कळशी प्रगतीहि केली आहे. तो रोग हटविण्याकरितां आरोग्यालयें, इस्पितळें, क्लिनिक्स, खाटांची वाढ, व बी. सी. जी. लस टोंचण्याची सोय हे उपाय आहेत. १९५५–५६ सालीं काय परिस्थिति होईल याचें कोष्टक खालीं दिलें आहे.

| | १९५०–५१ | | १९५५–५६ | |
|---|---|---|---|---|
| | संस्था संख्या | खाटा संख्या | संस्था संख्या | खाटा संख्या |
| आरोग्यालयें | ३७ | ४,१६१ | ४६ | ५,६४६ |
| इस्पितळें | ४८ | ३,०७७ | ५० | ४,८१४ |
| क्लिनिक्स ( शुश्रूषागृहें ) | १२७ | २,३२३ | १८० | २,५६२ |
| बी. सी. जी. तुकड्या | ७३ | ... | १३७ | ... |

याशिवाय महारोग व उपदंश विकार निवारण्याचीहि व्यवस्था केलेली आहे.

बाळंतपण व बाल-आरोग्याकरितां जो कार्यक्रम आहे त्यांत कलकत्त्याला जी ऑल इंडिया इन्स्टिट्यूट ऑफ हायाजिन व पब्लिक हेल्थ संस्था आहे ती डॉक्टर व नर्सेसच्या पदवी-परीक्षेनंतरच्या शिक्षणाकरितां केंद्र म्हणून वाढविली जाणार आहे. ग्राम-विकास-प्रकल्पामध्यें बाळंतपण व बाल-आरोग्य यांवर जास्त भर दिला जाणार आहे.

## कुटुंब-नियोजन.

लोकसंख्येंत होणारी झपाट्यानें वाढ व आपल्या मर्यादित साधनांवर पडणारें दडपण यांचा विचार करतां कुटुंब-नियोजनाचा प्रश्न तांतडीचा वाटत आहे. या नियोजनांत मुख्य गोष्ट जर कोणती विचारार्ह असेल तर ती कुटुंबाच्या आरोग्याचा व स्वास्थ्याचा विचार करणें ही होय. कुटुंबें मर्यादित करणें किंवा मुलांमधील अंतर

ठराविक असणें हें मातेचें आरोग्य व मुलांची अधिक चांगली काळजी आणि त्यांचें संगोपन या दृष्टीनें जरूर व इष्ट आहे. त्याकरितां उपाय योजणें हा सार्वजनिक आरोग्य-कार्यक्रमाचा एक भाग आहे. या बाबतींत जी प्रगति व्हावयाची ती एक तर लोकांच्या मनांत कुटुंब-नियोजनाची तीव्र इच्छा निर्माण झाल्यानें होईल; व दुसरें, त्यांना जरूर तो सल्ला, व सुग्राह्य, कार्यक्षम, निरुपद्रवी व कमी खर्चाच्या पद्धतीबाबत मदत केल्यानें होईल. पण या पद्धतींत पुढील गोष्टी गृहीत धरल्या आहेत. ( १ ) कुटुंबांचें मान केवढें असावें यासंबंधीं प्रवृत्ति व प्रेरणा यांचा सखोल अभ्यास, आणि कुटुंब-नियोजनाकरितां कोणतीं तंत्रें व कार्य-पद्धति अवलंबावी यांचें लोकांना शिक्षण; ( २ ) कुटुंब-नियोजनाच्या निरानिराळ्या पद्धतींचे वैद्यकीय व तान्त्रिक संशोधनाचे प्रयोग.

कुटुंबाच्या मर्यादेकरितां व लोकसंख्येच्या नियंत्रणाकरितां पुढील कार्यक्रम असावा:—

( अ ) हिंदुस्थानांत इतकी झपाट्यानें लोकसंख्या कां वाढते याची बिनचूक माहिती मिळविणें.

( ब ) कुटुंब-नियोजनाचीं सोईस्कर तंत्रें शोधून काढणें, व त्या तंत्रांचा सर्वत्र प्रचार कसा होईल याचे उपाय योजणें.

( क ) सरकारी रुग्णालयें व सार्वजनिक आरोग्य-केंद्रें यांनीं कौटुंबिक नियो-जनाचा सल्ला देणें हें त्यांच्या कामांपैकीं एक काम आहे असें ठरविणें.

मध्यवर्ती सरकारनें या कार्यक्रमाकरितां ६५ लाख रुपये हेल्थ मिनिस्ट्रीच्या वांट्याला दिले आहेत. त्या कार्यक्रमांत पुढील गोष्टी येतात:—

( १ ) विवाहितांना कुटुंब-नियोजन-पद्धतीसंबंधीं सल्ला देण्याची सरकारी इस्पितळांत व आरोग्य-केंद्रांत व्यवस्था.

( २ ) कुटुंब-नियोजनाच्या निरानिराळ्या पद्धतींचे प्राथमिक प्रयोग करून त्यावरून कोणती पद्धति कोणत्या वर्गाला उपयोगी पडेल हें ठरविणें.

( ३ ) कुटुंब-नियोजन-पद्धतीचें जनतेस झपाट्यानें शिक्षण मिळावें म्हणून तंत्र व पद्धतीची वाढ करणें.

( ४ ) जनतेंतील प्रातिनिधिक विभागाकडून प्रजोत्पादनासंबंधींची माहिती गोळा करणें, आणि कुटुंबाच्या विस्तारासंबंधीं जनतेच्या प्रवृत्ति व इच्छा यांची माहिती घेणें.

( ५ ) आर्थिक व सामाजिक आणि लोकसंख्या यांच्या परस्पर संबंधांचा अभ्यास करणें.

( ६ ) निरनिराळ्या कुटुंब-नियोजन-पद्धतीची माहिती व अभ्यास करणें ( हा अभ्यास शास्त्रीय दृष्ट्या सिद्ध झालेल्या येथील व परदेशांतील अनुभवावर आधारलेला असावा. ) आणि ती व्यावसायिक कार्यकर्त्यांना पुरवणें.

( ७ ) प्रजा-जननासंबंधींचीं वैद्यकीय व तान्त्रिक स्वरूपें कोणतीं याचें संशोधन करणें.

हा कुटुंब-नियोजनाचा कार्यक्रम पुढें नेण्याकरितां मध्यवर्ती सरकारनें दोन कमिट्या नेमल्या आहेत. एक कमिटी लोकसंख्येच्या धोरणासंबंधींची व दुसरी कुटुंबाची मर्यादा किती असावी यासंबंधीं संशोधन व कार्यक्रम ठरविण्याची.

## शिक्षण.

लोकशाहींतील नियोजन यशस्वी होण्यास सहकार्याची व शिस्तबद्ध नागरिकत्वाची वृत्ति वाढली पाहिजे. त्याचप्रमाणें जनतेमध्यें उत्साह निर्माण करणें किती शक्य आहे, व स्थानिक नेतृत्व आपण किती निर्माण करूं शकतों यावरहि हें यश अवलंबून आहे. नियोजनाच्या यशाकरितां शिक्षणाच्या कार्यक्रमांत प्रत्येक व्यक्तीला हक्कापेक्षां जबाबदाऱ्या महत्त्वाच्या आहेत हें शिकविलें पाहिजे, व त्यांच्यांत सृजनशील शक्ति व योग्य परीक्षणाची प्रवृत्ति वाढली पाहिजे.

या नियोजनांत शिक्षण हा सर्व-राष्ट्रीय प्रयत्नांतील एक प्रमुख भाग मानला आहे. राष्ट्रीय जीवनाच्या इतर अंगांशीं त्याचे संबंध कोणते हें दाखवलें आहे, आणि पार पाडावयाच्या निरनिराळ्या शैक्षणिक कार्यक्रमांत अग्रक्रम कशाला द्यावा हें सूचित केलें आहे.

जरूरीच्या मानानें आपलीं साधनें अपुरीं आहेत, त्यामुळें कार्यक्रमाची निवड काळजीपूर्वक करणें आवश्यक आहे. त्यामुळेंच अत्यंत जरूरीच्या गोष्टींना प्राधान्य मिळेल. जरूरी व साधनें यांची देशांत निरनिराळ्या ठिकाणीं भिन्न भिन्न परिस्थिति असल्यामुळें एकच अग्रक्रम सर्वत्र अनुसरला पाहिजे असें कांटेकोरपणें सांगतां येत नाहीं.

सध्यां शिक्षणविषयक परिस्थितीला पुढील मुख्य गोष्टींची आवश्यकता आहे. शिक्षणपद्धतीचें नवसंस्करण व तिच्या निरनिराळ्या अवस्था व शाखा यांची सांगड घालणें; बेसिक व सामाजिक शिक्षण-क्षेत्रांत वाढ करणें; दुय्यम व विद्यापीठाच्या

शिक्षणांत सुधारणा करणें; दुय्यम शिक्षणांचा अभ्यासक्रम ग्रामीण जीवनांतील गरजांशीं जुळता करणें; स्त्री-शिक्षणाच्या शिक्षणाकरितां सवलतींत वाढ; अध्यापन—विशेषतः स्त्रियांकरितां व बेसिक शाळांतील शिक्षकांकरितां—शिक्षकांच्या पगार-प्रमाणांत व नोकरीच्या परिस्थितींत सुधारणा; ज्यांच्या शिक्षणाची पीछेहाट झाली अशा मागासलेल्या वर्गांतील व मागासलेल्या राज्यांतील लोकांच्या शिक्षणाला मदत. हीं कामें अंगावर घेतांना, या नियोजन-कालांत उच्च शिक्षणाच्या क्षेत्रांतील खास जबाबदाऱ्या संभाळून, शिवाय मध्यवर्ती सरकार राष्ट्रीय महत्त्वाच्या निवडक कार्यक्रमांना मदत करील; आणि जेव्हां अधिक साधनें उपलब्ध होतील तेव्हां शैक्षणिक प्रगति करतां यावी म्हणून आतांच भक्कम पाया घालण्यास साहाय्य करील. स्थानिक स्वराज्य-संस्था व ऐच्छिक संघटना ( व्हॉलंटरी ) यांच्यामार्फत होणाऱ्या कामावर विशेष भर दिला पाहिजे. शिक्षण-प्रसार करण्याकरतां व कार्यक्रम अंमलांत आणण्याकरितां त्यांना झेपेल इतकी जास्तींत जास्त जबाबदारी घेण्यास त्यांना मदत करणें अवश्य आहे. पांच वर्षांच्या कार्यक्रमांत १५१ कोटि रुपये शिक्षणाकरितां ठेवले आहेत. त्यांतील ३४ कोटि मध्यवर्तीनें व ११७ कोटि राज्यांनीं खर्च करावयाचे आहेत. मध्यवर्तींचा बहुतेक खर्च राज्यांतच होणार आहे. त्यामुळें त्यांच्या साधनांत वाढ केली पाहिजे. ४ कोटि रुपयांची एक रक्कम ऐच्छिक सामाजिक कल्याण-संस्थांकरितां ठेवली आहे. त्या संस्थांच्या कारभाराकरतां एक स्वतंत्र व्यवस्था करावी असें सुचविलें आहे; व ती रक्कम मध्यवर्ती शिक्षण-मंत्र्याच्या खातीं घातली आहे.

आपल्या गरजा व आपलीं साधनें यांत फार मोठी खिंड असल्यामुळें सामाजिक सेवेच्या व्यवस्थेंतील जास्तींत जास्त जबाबदारीचा वांटा जनतेनेंच उचलला पाहिजे. खास शिक्षणाच्या बाबतींत नव्या संस्थांकरितां जनता पैसा, श्रम, जमीन व इमारती देण्यास तयार असते असा लौकिक आहे. त्याचा उपयोग सरकार व इतर स्वयंसेवक-संस्थांनीं करून घ्यावा.

राष्ट्र-व्यापी प्रमाणावर नियोजित वाढ करण्याकरितां जर शिक्षण खात्यानें लायक शिक्षक-वर्ग पुरवावयाचा असेल तर सध्यांच्या संस्थांची योग्य मार्गानें पुनर्घटना व सुधारणा केली पाहिजे, व आपल्या साधनांच्या मर्यादेपर्यंत शैक्षणिक सवलतींची वाढ केली पाहिजे.

आपल्याला शिक्षणाचा दर्जा वाढवावयाचा असेल तर सुधारलेल्या शिक्षण-पद्धतीचे प्रयोग व संशोधन, शिक्षकांना शिक्षण व नवें वाङ्मय निर्माण करणें यांना अग्रस्थान दिलें पाहिजे. नियोजनाकरितां आवश्यक गरजा आणि सध्यांच्या सोईंचा

अपुरेपणा यावरून बेसिक व सामाजिक शिक्षण, तान्त्रिक व धंदे-शिक्षण यांना अग्रस्थान दिलें पाहिजे; व कांहीं निवडक क्षेत्रांत श्रेष्ठ दर्जाचे तंत्र-विशारद निर्माण करण्याकरितां त्यांच्या शिक्षणाची सोय केली पाहिजे असें निष्पन्न होतें. विद्यापीठाच्या शिक्षणांत दर्जाची सुधारणा, आणि पदवीनंतरचें संशोधन व काम वाढविण्यावर भर दिला पाहिजे.

## शाळेंत घालण्यापूर्वींचें शिक्षण.

या शिक्षणाच्या बाबतींत मध्यवर्ती सरकारनें येथील परिस्थितींत उपयुक्त ठरतील अशा पद्धतीचें संशोधन करावें. शिक्षकांना शिकवावें, व खासगी संस्थांना खेड्यांत काम करितां यावें व आदर्श संस्था काढाव्या म्हणून मदत करावी.

## बेसिक व प्राथमिक शिक्षण.

नियोजनांत प्राथमिक शिक्षण व बेसिक पद्धतीचें शिक्षण वाढविण्याकरितां शिफारशी आहेत. बेसिक शिक्षणांतील तंत्रें सुधारण्याकरितां व ज्या शिक्षकांचा शिक्षणाचा दर्जा कमी आहे त्यांना शिक्षण देण्याकरितां व्यवस्था करणें जरूरीचें आहे. राज्यांच्या 'अ' विभाग, 'ब' विभाग, व 'क' विभागांमध्यें आदर्श बेसिक संस्था काढाव्यात असें सुचविलें आहे. 'क' विभागाची संस्था दिल्लीस असावी. या संस्थांत बेसिकच्या पूर्वीची, बेसिकची, व बेसिकनंतरची शिक्षकांच्या शिक्षणाची व शिक्षकांच्या ट्रेनिंग कॉलेजची व्यवस्था करावी. या संस्थांचें एक मुख्य काम शालेय समाजामध्यें स्वावलंबन व सहकार्याची वृत्ति वाढवावी, आणि स्थानिक वर्गाच्या पुनर्घटनेकरितां या शाळांचा आधार म्हणून उपयोग करावा. प्राथमिक शाळांच्या सध्यांच्या पद्धतींतील मर्यादा सुप्रसिद्ध आहेत. त्यामुळें नव्या साधनांचा उपयोग बेसिक शिक्षणाच्या पद्धतीकरितां करणें अधिक चांगलें. तसेंच हल्लींच्या प्राथमिक शाळांत हस्त-व्यवसाय सुरू करण्याचें पहिलें पाऊल टाकून त्यांचें पुढें बेसिक शाळांत रूपान्तर करणें हितावह होईल. हें काम प्रचंड आहे; व त्यांत हस्त-व्यवसायाचें शिक्षण शिक्षकांना देण्याकरितां मोठ्या प्रमाणांवरील कार्यक्रम हातीं घेतले पाहिजेत.

## दुय्यम शिक्षण.

मध्यवर्ती सरकारनें दुय्यम शिक्षण-पद्धतीचा विचार करण्याकरितां नुकतेंच एक कमिशन नेमलें होतें. त्यामुळें नियोजनांत त्या विषयाच्या तपशिलाचा फारसा विचार केला नाहीं. तथापि निरनिराळ्या प्रवृत्तींना साजेसे निरनिराळे अभ्यास-क्रम

आंखावे, व बहुसंख्य लोकांनीं शालेय अभ्यास संपल्यावर कोठल्या तरी धंद्यांत शिरावें या गोष्टीवर नियोजनांत भर दिला आहे. त्यामुळें विविध प्रकारचें शिक्षण देणाऱ्या हायस्कूलसची जरूरी आहे. या शाळांत शेतकी व संलग्न-शिक्षण, घरगुती व लहान प्रमाणावरील धंदे यांच्या शिक्षणांना उत्तेजन द्यावें.

## विद्यापीठ-शिक्षण.

विद्यापीठाच्या संस्थांत फार गर्दी झाली आहे. त्या गर्दीमुळें शिक्षणाच्या भवितव्याचीच चिंता वाटूं लागली आहे. हा प्रश्न कसा सोडवावा यासंबंधीं नियोजनांत कांहीं सूचना केल्या आहेत. ज्यांना विद्यापीठांतील शिक्षण मिळावें, अशांच्याकरितां कांहीं उपयुक्त कसोट्या लावण्याच्या सूचना केल्या आहेत. त्याचप्रमाणें उपयुक्त व्यवसायांत शक्य तितके विद्यार्थी विद्यापीठांत जाण्यापूर्वींच्या अवस्थेंत ओढले जावेत याहि गोष्टीवर नियोजनांत भर दिला आहे. खासगी अभ्यासाला सध्यांच्यापेक्षां खूपच अधिक प्रमाणावर सवलती द्याव्यात असेंहि सुचविलें आहे. परीक्षा पास झाल्याशिवाय नोकरी नाहीं, यामुळें कॉलेजांत गर्दी होते, व शिक्षणाचा दर्जा कमी होतो. सरकारी नोकरीकरितां चढाओढीच्या परीक्षा घ्याव्यात, व पदवी नसणारांना या परीक्षांना पूर्ण बंदी असूं नये. खेड्याकरितां एक तरी जानपद-विद्यापीठ स्थापन करावें. त्याचा प्रयोग म्हणून व खेड्याच्या उच्च शिक्षणाच्या गरजा भागविण्याकरितांहि उपयोग होईल.

## सामाजिक शिक्षण.

ज्या देशांत बहुसंख्य जनता निरक्षर असते, तेथें सामाजिक शिक्षणाला राष्ट्रीय विकासाकरितां फार महत्त्व असतें. या प्रौढ शिक्षणाकरितां ७॥ कोटि रुपये मध्यवर्तीनें ठेवले आहेत. पुष्कळ राज्यांत प्रौढ शिक्षणाचे कार्यक्रम चालले आहेत, व कांहीं ठिकाणीं चांगलें काम झालें आहे. प्रत्येक शाळा किंवा कॉलेजतर्फें आसपास ह्या शिक्षणप्रसाराचें कार्य करण्यांत यावें.

## व्यवसाय-शिक्षण.

गेल्या कांहीं वर्षांत एंजिनीअरिंग व टेक्नॉलॉजिकल शिक्षणाच्या प्रसाराचें काम पदव्या व डिप्लोमा परीक्षांच्या बाबतींत झालें आहे. नियोजनामध्यें ज्या अंगांसंबंधीं शिफारशी केल्या आहेत तीं पुढीलप्रमाणें—

( १ ) संशोधनाकरितां पदवी घेतल्यानंतरच्या शिक्षणाकरितां सोईची वाढ करणें.

( २ ) छपाई-तंत्र, लोकरीच्या कापडाचें व रेशमी कापडाचें तंत्र शिकविण्याची सोय. व्यापार-व्यवस्था व औद्योगिक संबंध यांच्याहि शिक्षणाची सोय करावी.

( ३ ) सध्यांच्या कांहीं संस्थांची पुनर्घटना करावी; म्हणजे ऑल इंडिया कौन्सिल ऑफ टेक्निकल एज्युकेशनच्या नॅशनल सर्टिफिकेट अभ्यास-क्रमाकरितां विद्यार्थ्यांची सोय करतां येईल.

( ४ ) कारागीर व हस्त-व्यवसायी यांच्या शिक्षणाच्या असलेल्या सोयी विस्तृत कराव्यात, आणि शिकाऊंकरितां योजना आंखावी.

( ५ ) रिफ्रेशर कोर्सेस काढावे.

( ६ ) खेड्यांतील कारागिरांची कलावृद्धि व्हावी म्हणून ग्रामीण अध्यापन-केंद्रें काढावीं.

## स्त्री-शिक्षण.

शिक्षणांच्या निरनिराळ्या क्षेत्रांत स्त्रियांना पुरुषांइतकीच संधि मिळावी. पण ज्यांना एखाद्या विशिष्ट विषयाची जास्त आवड असेल त्यांना ते विषय शिकविण्याची जास्त दक्षता घ्यावी. स्त्री-शिक्षण-वाढीकरितां खाजगी अभ्यास करून परीक्षेला बसण्यास परवानगी द्यावी. स्त्रियांच्याकरितां अल्प मुदतीचें सर्वसामान्य शिक्षण व हस्तव्यव-सायाचे अभ्यास-क्रम काढावेत.

## विद्यार्थ्यांचे शरीर-श्रम व समाज-सेवा.

विद्यार्थ्यांचीं शिबिरें व श्रम-सेवेकरितां १ कोटि रुपये नियोजनांत ठेवले आहेत. १८ ते २२ वर्षांच्या दरम्यान वयें असलेल्या विद्यार्थ्यांनीं ते वैयक्तिक दृष्ट्या अपात्र नसल्यास, आपला नियमित वेळ शिस्तशीर राष्ट्रीय सेवेकरितां खर्च करावा, याच पद्धतीनें ते कार्यकर्ते व नागरिक म्हणून वाढतील.

सध्यांच्या शिक्षण-पद्धतींत शरीर-श्रमाला अगदीं स्थान नाहीं. म्हणून असें सुचविण्यांत आलें आहे कीं, जरी दररोजचा कांहीं वेळ शरीर-श्रमांत गेला तरी शिक्षण-क्रमाच्या कोणत्या तरी काळांत सहा महिने ते एक वर्षाचा अवधि शारीरिक श्रमाच्या चळवळींत घालवावा. ते शरीर-श्रम सामाजिक विकास-योजना, पाटबंधारे, रस्ते, घाणेरडी वस्ती सुधारणा, स्वच्छतेच्या योजना वगैरेसंबंधीं कोणतेहि असावेत. जनतेच्या खऱ्या अडचणींची जसजशी माहिती होईल तसतसें श्रम-प्रतिष्ठेचें महत्त्व

त्यांना पटेल, आणि राष्ट्रीय पुनर्घटनेच्या कामाविषयीं विद्यार्थ्यांना भावनात्मक साक्षात्कार होईल. लहान लहान गट घेऊन या कामाला सुरुवात करावी. उदाहरणार्थ, एम्. ए.चे विद्यार्थ्यांना तीन ते सहा महिने हें काम द्यावें. अनुभवानुरूप योजना वाढवावी. सर्व विद्यार्थ्यांना हें शिक्षण सक्तीचें करण्यापूर्वी तयारी व प्रयोग याकरितां कांहीं काळ दिला पाहिजे.

## कामगार.

कामगारांच्या प्रश्नाकडे दोन दृष्टींनीं पाहिलें पाहिजे. कामगार-वर्गाचें सुखस्वास्थ्य, आणि राष्ट्राची आर्थिक स्थिरता व प्रगति, कामगाराच्या अन्न-वस्त्र व घरासंबंधीं मूलभूत गरजा पुऱ्या केल्या पाहिजेत. त्याला सुधारलेल्या आरोग्य-सेवेचा, वाढत्या सामाजिक सुरक्षिततेचा, अधिक चांगल्या शिक्षण-संधीचा आणि वाढत्या करमणुकी व सांस्कृतिक सवलतींचा फायदा मिळाला पाहिजे. त्याच्या कामाची परिस्थिति अशी असली पाहिजे कीं, त्याचें आरोग्य-रक्षण होईल, आणि त्याला कामांतील व इतर धोक्यांपासून संरक्षण मिळेल. त्याला व्यवस्थापकाकडून सहानुभूतिपूर्वक वागवलें जावें; आणि त्याला न्याय न मिळाल्यास निःपक्षपाती चौकशी-मंडळाकडे जातां यावें. त्याला आपले हक्क व हित यांच्या रक्षणाकरतां कायदेशीर इलाज योजण्याचें व संघटना बनविण्याचें स्वातंत्र्य असावें.

यांतील बहुतेक हक्क मान्य करण्यांत आले आहेत, व ते घटनेंत घातले आहेत. मध्यवर्ती व राज्य-सरकारना त्याची जाणीव आहे. कारखाने, ट्रेड युनिअन्स, दुखापत व मृत्यूकरितां मोबदला यासंबंधींचे कायदे फार दिवस अस्तित्वांत होतेच; पण स्वातंत्र्यानंतर प्रगति फार त्वरेनें होऊं लागली, आणि कामगार-कल्याणाचे कांहीं कायदे पास केले. त्यांतील कांहीं उल्लेखनीय कायदे कोल-माइन्स प्रॉव्हिडंट फंड, बोनस स्कीम ॲक्ट, मिनिमम वेजेस ॲक्ट, १९४८ चा एम्प्लॉइज स्टेट इन्शुअरन्स ॲक्ट, प्लँटेशन लेबर ॲक्ट १९५१, माइन्स ॲक्ट, व १९५२ चा प्रॉव्हिडंट फंड ॲक्ट हे होत. घराकरितां ठेवलेले पैसे, व बिगर शेती मजुराच्या पुनःस्थापनेकरितां जो पैसा खर्च होणार आहे त्याशिवाय ७ कोटि रुपये मजुरांच्या कल्याणाकरितां या पांच वर्षांत मध्यवर्ती व राज्य-सरकारकडून खर्च होणार आहेत.

गेल्या वर्षी व १९५२ च्या अर्ध्या वर्षांत जें औद्योगिक उत्पादन वाढलें, व जी संपाची वावटळ कमी झाली त्यावरून कामगारांवर या कायद्यांचा परिणाम चांगला झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. औद्योगिक संबंधासंबंधीं असें म्हणतां

येईल कीं, उभय पक्षीं अंतर्गत तडजोडीवर जास्त जास्त भर दिला जात आहे. ही गोष्ट दोन पक्षांच्या संयुक्त-सल्लागार-बोर्ड स्थापनेनें व अलीकडच्या कामगार-परिषदेंतील चर्चेनें सिद्ध झाली आहे.

जर वस्तूंच्या किंमती वाढल्या नसत्या, व उद्योगधंद्यांनीं आपलीं यंत्रें अद्यावत् केलीं असतीं व व्यवस्थेंत सुधारणा केली असती तर कामगारांच्या आर्थिक परिस्थितींत जास्त सुधारणा झाली असती.

कामगारांच्या बाबतींतल्या केलेल्या शिफारशींचें खालील वर्गीकरण होतें.

( १ ) औद्योगिक संबंध.
( २ ) पगार व सोशल सेक्युरिटी.
( ३ ) कामधंद्याचें वातावरण.
( ४ ) रोजगारी व शिक्षण.
( ५ ) उत्पादन.
( ६ ) औद्योगिक संबंध.

**खासगी विभागः**—कामगार व मालक यांचे संबंध जर सलोख्याचे राहिले तरच औद्योगिक उत्पादन अपेक्षेप्रमाणें होईल. औद्योगिक शान्ततेवर आर्थिक प्रगति अवलंबून आहे असें दुसऱ्या शब्दांत म्हणतां येईल.

मालक-मजूर-संबंध ही एक समाजाची आर्थिक गरज पुरवणारी भागीदारी आहे. या प्रयत्नांत कामगाराची प्रतिष्ठा व त्याच्या कामाच महत्त्व यांना योग्य मान्यता मिळाली पाहिजे. म्हणून औद्योगिक संबंध अशा रीतीनें वाढावेत कीं ज्यामुळें कामगार काम करतांना जास्त अधिक भाग उचलण्यास समर्थ व्हावा. त्याकरितां मालक व मजूर यांचें प्रत्येक प्रसंगीं निकट सहकार्य व्हावें, व त्यामुळें अधिक उत्पादन, मालाच्या दर्जात सुधारणा, किंमतींत काट व नासधुशीचें उच्चाटन व्हावें. मजूर व भांडवलदार यांच्या परस्पर-संबंधांत कामगारांचा संघ बनविण्याचा, संघटना करण्याचा, व सामुदायिक वाटाघाट करण्याचा हक्क हे मूलभूत हक्क मानण्यांत यावेत. याकरितां कामगार-संघटनांचें स्वागत केलें जावें, व औद्योगिक पद्धतींतला तो एक अविभाज्य भाग आहे असें मानून त्यांना मदत करावी. ज्या वेळीं मतभेद निर्माण होतील त्या वेळीं समजूतदारपणाच्या वृत्तीनें तडजोड करावी; आणि ती करतांना उद्योगधंद्याचें भलें व्हावें, व जनतेचें हित लक्षांत ठेवलें जावें. दोघांचें नच जमल्यास मतभेद हे निःपक्षपाती चौकशीनें व लवादानें मिटवावेत. कधीं कधीं सरकारला

मध्येंसुद्धां पडावें लागेल, आणि तडजोड लावावी लागेल. पण उभयपक्षीं आंतल्या आंत भांडण-तंटे मिटविण्याचे प्रयत्न व्हावेत.

लवाद व निवाड्यांचा उद्देश भांडणाचा न्याय्य निकाल लावणें हा असावा. याकरितां कायद्याचा किचकटपणा व औपचारिक बाबी या कर्मांत कमी कराव्यात; जें यंत्र व जी पद्धत असेल तिचा बदलणाऱ्या गरजेप्रमाणें उपयोग करावा, आणि औद्योगिक न्यायालयाच्या किंवा लवादाच्या निवाड्यावर अपील नसावें. त्याला अपवाद असूं शकेल. जेथें एखादा निकाल अगदींच विकृत किंवा नैसर्गिक न्यायाच्या तत्त्वाविरुद्ध असेल तेथेंच अपील करावें. मालक व कामगार यांच्यामधील संबंध व व्यवहार यांच्याबद्दल व औद्योगिक कलह मिटविण्याबद्दल कांहीं दंडक व प्रमाणें घालून द्यावींत. हें काम सरकार, मालक-वर्ग, व कामगार यांच्या प्रतिनिधींनीं करावें. या त्रिवर्ग मंडळांमध्यें जर एकवाक्यता झाली नाहीं तर एकट्या सरकारनें हें काम करावें. हे करार व निवाडे आदेश म्हणून प्रसिद्ध करावेत, व ते कोर्टावर व लवाद-मंडळावर बंधनकारक असावेत.

## कलह टाळणें.

कलह टाळण्याकरितां मालक व कामगारांचीं कर्तव्यें व जबाबदारी हीं स्पष्टपणें लेखबद्ध करावींत. प्रत्येक उद्योगधंद्याला त्याकरितां एक निरनिराळ्या वर्गाच्या कामगारासंबंधीं लहान सूचना-पुस्तकच असावें. आपलीं गाऱ्हाणीं दूर करून घेण्याकरितां कामगारानें कोणकोणत्या वेळीं अधिकाऱ्याकडे कसकसें जावें यासंबंधींची रीत घालून द्यावी. उद्योगधंद्यांची परिस्थिति काय आहे, आणि ज्या खात्यांत ते काम करतात त्याचे कारभार कसे चालतात याची कामगारांना वेळोवेळ माहिती करून द्यावी. त्याचप्रमाणें त्यांच्या हिताला बाधक होण्यासारखा एखादा बदल होणार असला तर त्याची त्यांना माहिती द्यावी. कामगारांना कारखान्याच्या वातावरणांत बदल सुचविण्याची इच्छा झाली तर तसें त्यांना करूं दिलें पाहिजे. त्यामुळें वर्दळीवर येण्याची कृति टाळतां येईल. उभय पक्षीं प्रत्यक्ष कृतीमुळें जर ह्या जबाबदारीचा भंग झाला तर त्याला कायद्यानें शासन व्हावें.

उद्योगधंद्यांत असणाऱ्या निरनिराळ्या कामगारांत सामाजिक संपर्क वाढवावेत. पर्यवेक्षक-वर्ग, तंत्रज्ञ व हित-संवर्धक अधिकारी, यांनीं कामगारांत जिव्हाळ्याचे संबंध, परस्पर सदिच्छा, व समजूतदारपणा निर्माण करण्याचा प्रयत्न करावा. संयुक्त समित्यांनीं मधून मधून उद्योगधंद्यांतील वाढीची व समान हिताच्या गोष्टींची पाहणी करावी.

**कलह मिटविणें.**

जागच्या जागीं मतभेद मिटवण्याकरितां ‘ वर्क-कमिट्या ’ स्थापन कराव्यात. जॉइंट कमिटीनें केंद्र व सर्व उद्योग-धंदा यांतील व्यापक व महत्त्वाचे प्रश्न सोडविण्याचें काम करावें.

सामुदायिक सौदा यशस्वी होण्यास कामगारांची शक्ति संघटित पाहिजे, व मालक-वर्गांत तंटा मिटविण्याची प्रामाणिक इच्छा पाहिजे. जर तंटा मिटला नाहीं तर सरकारनें तडजोडीकरितां मध्यस्थी करावी. मोठाल्या प्रश्नांच्या बाबतींत एखादी तात्पुरती कमिटी नेमणें किंवा स्टँडिंग कन्सिलिएशन बोर्ड नेमणें जरूर पडेल. बिन सरकारी तडजोड करणाऱ्या पंचांची यादी-सुद्धां तयार केलेली असावी.

माहिती मिळविण्याकरितां सरकारतर्फे चौकशी करणें, किंवा एखाद्या तंट्याच्या गुणावगुणाबद्दल जनतेला माहिती देणें ही पद्धत इतर बाबतींत अनुसरली जावी.

जर एखादा तंटा तडजोडीनें मिटला नाहीं तर लवादाची जरूरी पडेल. महत्त्वाच्या उद्योगांत स्वतंत्र वेज बोर्ड उपयुक्त ठरेल. अखिल भारतीय स्वरूपाच्या तंट्याबद्दल एक मध्यवर्ती लवाद-मंडळ नेमण्यांत यावें.

## ( ब ) सरकारी विभाग.

सरकारी उद्योगधंदे हे खाजगी मालकीच्या उद्योगधंद्यांपेक्षां अनेक बाबतींत निराळे असतात. सरकारी धंद्यांत नफा मिळविणें व कामगारांचें शोषण करणें या गोष्टींना थारा नसतो. सरकारी धंद्यांत असणारा कामगार हा मालक व नोकरहि असतो. नागरिक म्हणून मालक व कामगार म्हणून नोकर.

सरकारी धंदे यशस्वी करण्याकरितां कामगारांत जो उत्साह निर्माण करावा लागतो, त्याकरितां न्याय व योग्य वर्तन हा नियम असावा. सरकारी धंद्यांतील वेतन-मान हें खाजगी धंद्यांतील वेतनापेक्षां कमी नसावें. कामाचें वातावरण व कल्याणकारी व्यवस्था ह्या आदर्श असाव्यात.

सरकारी धंद्याचें जें नियामक-मंडळ असेल त्यांत थोडेसे असे लोक असावेत कीं ज्यांना मजुरांचे प्रश्न समजतात, व ज्यांना मजुरांच्या आकांक्षांबद्दल सहानुभूति वाटते. जर सरकारी कामगारांना इतर कामगारांइतके किंवा अधिक फायदे मिळत असतील तरची गोष्ट वेगळी; अन्यथा कामगारविषयक सर्व कायदे त्यांना लागू करावेत.

## ट्रेड युनियन्स व एम्प्लॉयर्स असोसिएशन्स.

हें नियोजन यशस्वी करण्याकरितां कामगार व चालक यांच्या संघटना व संस्था यांचें सहकार्य अवश्य आहे. हें सहकार्य निरनिराळ्या स्वरूपाचें असेल. उदाहरणार्थ, नियोजनाची चर्चा चालक व कामगार यांच्याबरोबर करून त्यांच्यांत उत्साह निर्माण करतां येईल. कामगार-संघटनांना आपापल्या धंद्यांत शांतता निर्माण करतां येईल, कामांतील अडथळे दूर करतां येतील, व नियोजन चालू असतां उत्पादन वाढवितां येईल. चालकांना कामगारांबरोबर नव्या यंत्रांच्या उपयोगाबद्दल, उत्पादन-पद्धतीबद्दल व उत्पादन-खर्च कमी करण्याबद्दल चर्चा करतां येईल. मजूर-संघटनांना सुख-स्वास्थ्य व सांस्कृतिक चळवळीकडे अधिक काळ देण्यास सांगून, विशेषतः ग्राहकांच्या संस्था व पतपेढ्या यांची स्थापना करणें व त्या चालविणें, या मार्गानें त्यांना आपल्या कामाचा व्याप वाढवितां येईल. त्या कार्याला जागा, कारकुनाची मदत, व कर्ज वगैरेंच्या सवलती देऊन चालकांना या चळवळींना मदत करतां येईल.

निरनिराळ्या कामांत कामगार व चालक यांचें सहकार्य घेतलें जावें. कामगारांना असें वाटावयास लावावें कीं, हें नियोजन पुरें करण्यांत त्यांचा वांटा आहे, आणि त्यांच्यावरच सामान्य माणसाच्या व स्वतःच्या राहणीचा दर्जा वाढविणें अवलंबून आहे.

### (१) वेतन व सामाजिक संरक्षण.

अलीकडे किंमती झपाझप वाढल्या; उद्योगधंद्यांच्या नफ्यांतहि पुष्कळ वाढ झाली, आणि संघटित कामगारांच्या पगारांतहि चांगली वाढ झाली. मूल्यवृद्धि थांबविण्याकरितां नफे व वेतन यांच्यावर कांहीं प्रमाणांत नियोजन-काळांत नियंत्रण घातलें पाहिजे. एक्सेस प्रॉफिट्स् टॅक्स व नफा वांटण्यावर घातलेलीं कांहीं बंधनें यांमुळें युद्ध-काळांत व त्यानंतर थोडा काळ भरमसाट नफा वांटण्याला आळा बसला. असेच निर्बंध चालकांच्या द्रव्यार्जनावर, नफ्याच्या वांटणीवर, व बोनस देण्यावर आतां घालण्यांत यावेत.

या अडचणींत जर वेतन-वाढ केली तर उत्पादनाची किंमत वाढून देशाच्या आर्थिक स्थैर्याला अपाय पोहोंचेल. नोकऱ्यांच्या प्रमाणावरहि त्याचा विपरीत परिणाम होईल. याकरितां वेतन-वाढ ही टाळावी. पण जर कोठें नियमबाह्य प्रकार झाले असतील, किंवा प्रचलित वेतन-प्रमाण कमालीचें कमी असेल तर अपवाद करावा. त्याचप्रमाणें जर यंत्रें नवीं आल्यानें किंवा त्यांचें आधुनिकीकरण केल्यानें उत्पादन वाढणार असेल, किंवा युद्धापूर्वीचें खरें वेतन द्यावयाचें असेल तर वेतन-वाढ करावी.

वेतनाबद्दल काय धोरण असावें ? तें धोरण बोर्डांना व लवाद-मंडळाला मार्गदर्शक व्हावें, या दृष्टीनें उत्पन्नांतील विषमता कमी करणें हें तत्त्व म्हणून मानावें. जो कामगार आहे त्याला राष्ट्रीय उत्पन्नांतील योग्य वांटा मिळाला पाहिजे. वेतनाचें एकच ठराविक प्रमाण लवकर केलें पाहिजे, व त्याचा विस्तार केला पाहिजे. निरनिराळ्या कामाकरितां जे वेतनांत फरक केले जातात ते काढून टाकले पाहिजेत. अर्थात् जेथें कौशल्य, अध्ययन, अनुभव, मानसिक व शारीरिक आवश्यकता, आणि अनुषंगिक धोके असतील तेथें हे भेदाभेद समर्थनीय ठरतील. निरनिराळ्या धंद्यांत व व्यवसायांत सापेक्ष कामाचा बोजा किती असतो याचें शास्त्रीय दृष्ट्या मूल्यमापन करावें. या पांच वर्षांत किमान-वेतन-कायदा हा पूर्णतः व परिणामतः अंमलांत आणला जावा. जे दडपलेले विभाग असतील त्यांच्याकडे प्रथम लक्ष द्यावें. नफ्यांतील हिस्सा व बोनस याचा सुज्ञतेनें अभ्यास करावा. रोकडीच्या स्वरूपांत बोनस देण्याला शक्य तितका निर्बंध घालावा; आणि जी शिल्लक उरेल ती कामगारांची बचत म्हणून रहावी. वेतनांत जुळवाजुळव करण्याकरितां वेळोवेळ परिस्थितीची पाहणी करणें, पुरावा गोळा करणें, वेतनाच्या प्रश्नांचा निकाल लावणें, याकरितां त्रिवर्गांचें एक वेज-बोर्ड मध्यवर्तींमध्यें व राज्यांत स्थापलें जावें.

## ( २ ) सामाजिक सुरक्षितता.

जो वेतन कमावणारा असतो त्याच्या तुटपुंज्या कमाईवर आजारीपणामुळें किंवा अपात्रतेमुळें जे दिवस बुडतात त्याचा फार भयंकर परिणाम होतो; आणि औद्योगिक उत्पादनहि घटतें. सामाजिक सुरक्षितता नसल्यामुळें कार्यक्षम व स्थिर अशा कामगार-सेनेची उभारणी करतां येत नाहीं.

निरनिराळ्या राज्यांनीं पास केलेले वर्कमेन्स कॉम्पेन्सेशन ॲक्ट व मॅटर्निटि बेनिफिट्स् ॲक्ट्स्मुळें कामगारांच्या धोक्यांना थोडासा पायबंद बसला आहे. एम्प्लॉइज स्टेट इन्शुअरन्स ॲक्ट हा अधिक व्यापक कायदा आहे. त्या कायद्यामुळें जोंपर्यंत कामगार कामावर आहे तोंपर्यंत तो आजारी पडला किंवा ती बाळंत झाली, आणि त्यांना इजा वगैरे झाली, तर त्याकरितां विमा-योजना आहे.

प्रॉव्हिडंट फंडाचा १९५२ चा कायदा हा असा दुसरा कायदा आहे कीं, जो कामगाराच्या भविष्यकाळाची तरतूद करितो. हा कायदा सध्यां ६ मोठ्या धंद्यांना लागू आहे. ५० किंवा जास्त कामगार जेथें असतील तेथें हा कायदा लागू करण्याचा कार्यक्रम योजला जावा.

## ( ३ ) कामाची परिस्थिति.

कारखान्यांतील कामाच्या वातावरणांत पुष्कळ सुधारणा झाली पाहिजे. त्या-संबंधींचे विद्यमान कायदे पुरेसे आहेत.

## ( ४ ) नोकरी व अध्यापन.

मनुष्य-शक्तीचा योग्य उपयोग करण्याचा प्रश्न फार महत्त्वाचा आहे. पुरेशा प्रमाणांत जरूर त्या लायकीचे कामगार सतत मिळण्यावर उत्पादन अवलंबून असतें. एम्प्लॉयमेंट सर्व्हिस संस्थेमुळें व कामगारांना शिक्षण घेण्याच्या बाबतींत दिलेल्या सवलतींमुळें जरी या बाबतींत थोडीशी प्रगति झाली असली, तरी अद्याप पुष्कळ काम व्हावयाचें आहे. नवे कामगार मिळविण्याच्या पद्धतींत सुधारणा झाली पाहिजे.

उत्पादनाचा खर्च कमी करण्याकरितां ज्या धंद्यांत जरूरीपेक्षां कामगार जादा आहेत त्या धंद्यांत रॅशनलायझेशन केलें जावें; पण तसें करतांना कामगाराच्या हिताच्या दृष्टीनें कांहीं संरक्षणें दिलीं जावींत. मुख्य संरक्षणें पुढीलप्रमाणें आहेत. कामगारांचे हजेरीपट सगळीकडे एका नमुन्याचे असावेत; कामाचें प्रमाण शास्त्रीय पायावर आधारलेलें असावें; जे अतिरिक्त कामगार असतील त्यांना दुसऱ्या खात्यांत नोकरी मिळावी; स्वेच्छेनें सेवानिवृत्त होण्याला आमिष म्हणून ग्रॅज्युइटि द्यावी; दुसऱ्या व्यवसायाचें शिक्षण घेण्याकरितां पुनः शिक्षण घेण्याची सोय असावी; ह्या शिक्षणाचा खर्च सरकारनें सोसावा, व चालकांनीं कामगारांच्या उदरनिर्वाहाची जबाबदारी घ्यावी. रॅशनलायझेशनपासून होणारे नफे कामगार व चालक यांनीं वांटून घ्यावे.

## ( ५ ) उत्पादन.

कांहीं चालकांचें असें म्हणणें आहे कीं, कामगारांचें उत्पादन कमी कमी होत आहे. कामगार ही गोष्ट मान्य करीत नाहींत. सध्यांची संघटना, कामाची पद्धत, कामाचें वर्गीकरण, वेतनाचें प्रमाण वगैरेंची लवकरच तपासणी होणार आहे. त्या तपासणीचा उद्देश कार्यक्षमता व उत्पादन-वाढीच्या दृष्टीनें सुधारणा सुचविणें हा आहे.

या विषयाबरोबर त्याच धंद्यांतील शिक्षणाचा कार्यक्रम आहे. या योजनेचा उद्देश तपासणीला लागणारें कौशल्य सुधारावें हा आहे. हें कौशल्य तीन उपायांनीं येऊं शकेल. विशिष्ट कार्यांत कामगारांचें कौशल्य वाढविणें; कामगारांवर देखरेख

ठेवण्यांतलें कौशल्य वाढविणें, आणि कामाच्या तंत्रांत सुधारणा करण्याचें कौशल्य वाढविणें. कांहीं औद्योगिक केंद्रांत हे अभ्यास सुरू आहेत, व ते तसेच वाढवावेत.

## घरें.

घराच्या प्रश्नाबाबत पुष्कळ शिफारशी केल्या गेल्या आहेत. त्यांत घरें बांधण्या-संबंधीं धोरण, घरांचे नमुने, व किंमतीचा अंदाज; गलिच्छ वस्ती उठविणें; गांवांची व नगरांची रचना; खेड्यांतील घरें; घरांबद्दल संशोधन; व या सर्व सूचना अंमलांत आणण्याकरितां करावयाचे कायदे. जरी येथील पुष्कळशा शहरांत बांधलेल्या घरांची कशी तरी वाढ झाली असली, तरी एकंदर घरांची संख्या अपुरीच आहे. एकूण ३७ महत्त्वाच्या गांवांची माहिती गोळा केली, तीवरून मोठाल्या धंद्यांत असलेल्या १७ लाख लोकसंख्येपैकीं ४ ते ५ लाख लोक गृहहीन आहेत. खानेसुमारीच्या अधिकाऱ्यांनीं जे आगाऊ आंकडे पाठविले आहेत, त्यांवरून येथील ७४ शहरांची वस्ती गेल्या दहा वर्षांत ७४ लाखांनीं वाढली, व लहान गांवांची वस्ती १४० लाखांनीं वाढली. १९४१ सालींच औद्योगिक शहरांतील घरांची परिस्थिति असमाधानकारक होती हें समजून घेतलें म्हणजे या प्रश्नाच्या गांभीर्याची कल्पना येईल.

नियोजनांत ४८ कोटि ६९ लक्ष रुपये घरांच्याकरितां ठेवले आहेत. यांपैकीं मध्यवर्तीचा खर्च ३८ कोटि ५० लक्ष व राज्यांचा १० कोटि १९ लक्ष रुपये होणार आहे.

घरें बांधण्यांत पहिला अग्रक्रम जो द्यावयाचा तो ज्या औद्योगिक केंद्रांत गर्दी असेल व घरांचा तुटवडा असेल तेथें घरें बांधण्याला द्यावयाचा आहे. या घर-बांधणीमध्यें मध्यवर्ती सरकार मदत करील, आणि खेड्यांतील घरें बांधण्याच्या कामाकडे राज्य-सरकार अधिक लक्ष देईल.

असें सुचविण्यांत आलें आहे कीं घर-बांधणीकरतां कर्ज व मदतीच्या पूर्वीच्या प्रमाणांत वाढ करावी आणि राज्य-सरकारला औद्योगिक कामगारांकरितां घरें बांधण्याला जी मदत करण्यांत आली तिचें प्रमाण जमिनीसह घर बांधण्याकरितां पडलेल्या किंमतीच्या ५० टक्केपर्यंत असावें. उरलेले ५० टक्के मध्यवर्ती सरकारनें कर्ज म्हणून द्यावे. त्या कर्जाच्या व्याजाचा दर त्याच्या उसनवारीच्या दराइतका असावा, व ह्या कर्जाकरितां जो कचेरी वगैरेचा खर्च असेल तोहि आकारावा. हें कर्ज २५ वर्षांत परत केलें जावें.

राज्य-सरकारला दिलेल्या कर्ज व मदतीशिवाय मध्यवर्ती सरकार कामगारांच्या चालकांना व कामगारांकरितां घरें बांधण्याच्या सहकारी संस्थांना मदत करील. ही मदत जमिनीसुद्धां घरें बांधण्याकरितां पडलेल्या किंमतीच्या २५ टक्के असेल. याशिवाय जी प्रत्यक्ष किंमत घरें बांधण्याकरितां लागेल त्याच्या ३७½ टक्के रक्कम कर्ज म्हणून वाजवी व्याजाच्या दरानें देईल. हें कर्ज १५ वर्षांत परत फेडावें लागेल. हें कर्ज व मदत जी द्यावयाची ती पुढील हिशेबानें दिली जाईल. एका मजल्याला घराकरितां २,७०० रु. बांधकामाला अंदाजी लागतील, व एकाहून अधिक मजल्याला घराकरितां ४,५०० रुपये लागतील. अशी आशा आहे कीं, सहकारी संस्था खासगी भांडवल आणतील, एवढेंच नव्हे तर घरें बांधण्याकरितां स्वयंसेवाहि करतील; आणि अशा रीतीनें बांध-कामाची किंमत कमी करतील.

इतर निश्चित शिफारशी पुढीलप्रमाणें:--

(अ) लहान गांवांकरितां व मोठ्या शहरांकरितां कांहीं किमान प्रमाण घरांच्या बाबतींत असावें.

(ब) स्थानिक स्वराज्य-संस्थांना गलिच्छ वस्ती काढून टाकण्याकरितां मदत करावी, आणि त्यांना घरें बांधण्याकरितां जमीन संपादन करतां यावी म्हणून वाजवी दरानें कर्ज द्यावें.

(क) खेड्यांतील घरांच्या बांधणींत करावयाच्या सुधारणा ह्या स्थानिक सामानांनीं व स्थानिक मजुरींनीं कराव्यात. त्यांत थोडीबहुत तान्त्रिक मदत घ्यावी. एक राष्ट्रीय इमारत-बांधकाम-संघटना स्थापावी. या संघटनेनें बांधकामाचीं जीं तंत्रें असतील त्यांचें संशोधन करावें, व त्या संशोधनाचा प्रत्यक्ष प्रयोग सर्व बांधकाम-संस्थांनीं करावा. याशिवाय एक मध्यवर्ती हौसिंग बोर्ड व प्रादेशिक हौसिंग बोर्ड्स् बांधकाम करण्याकरितां स्थापन करावींत. हीं बोर्ड्स् कायदेशीर, स्वायत्त असावींत. त्यांच्या उत्पन्नाचें साधन स्वतंत्र असावें. त्यांत वेळोवेळ मिळणारी सरकारी मदत धरूं नये.

१८९४ चा जो लँड ॲक्विझिशन कायदा आहे, त्या कायद्यांत गलिच्छ भाग व कोरी जमीन नवीं घरें बांधण्याकरितां संपादन करण्याच्या दृष्टीनें योग्य ती दुरुस्ती करावी.

## सामाजिक सुस्थिति.

सामाजिक सुस्थितीचे मुख्य कार्यक्रम हे स्त्रिया, मुलें, तरुण, कुटुंबें, कमी विशिष्ट हक्क उपभोगणारे गट, शारीरिक व सामाजिक दृष्टया कुचंबणा झालेले वर्ग, आणि सामाजिक दुर्गुणांसंबंधींचे प्रश्न यांच्याकरितां आहेत.

असें योजिलें आहे कीं, मध्यवर्ती व राज्य-सरकार आणि स्थानिक स्वराज्य-संस्था यांनीं आपल्या साधन-सामग्रीच्या मर्यादेंत सामाजिक कल्याणाची प्रत्यक्ष जबाबदारी आजच्यापेक्षां अधिक घ्यावी. सार्वजनिक संस्थांना या बाबतींत जास्त बोजा उचलावा लागेल. सार्वजनिक समाज-कार्य करणाऱ्या संस्थांचे कार्यावर नियोजनांत भर दिला आहे. त्यांच्या कार्यांच्या बळकटीकरितां, विस्ताराकरितां, व सुधारणेकरितां ४ कोटि रुपये नियोजनांत ठेवले आहेत. ह्या निधीची व्यवस्था करण्याकरितां एक बिनसरकारी अधिकाऱ्यांचेंहि व बरीचशी शासन-सत्ता असणारांचें सोशल व वेल्फेअर बोर्ड निर्माण करावें अशी सूचना केली आहे.

नियोजनांत असें दर्शविलें आहे कीं, निरनिराळ्या स्वयंसेवक-संस्थांत एकसूत्रीपणा असण्याची जरूरी आहे. त्यामुळें कार्यकर्त्यांचा परिणामकारक उपयोग करितां येईल, व निधि जमविण्यांत यश मिळेल.

## समाज-कार्याचें शिक्षण.

समाज-कार्याकरितां संघटित शिक्षण हें अद्याप पूर्वावस्थेंत आहे. निरनिराळ्या प्रकारच्या कार्यकर्त्यांच्या शिक्षणाची, कार्यक्रमांच्या संशोधनाची व तंत्राचें नियोजन कृतींत यावें म्हणून जरूरी आहे. प्रत्यक्ष काम करणारे, तपासनीस व देखरेख करणारे यांच्या शिक्षणाचीहि व्यवस्था करावी.

## सामाजिक संशोधन.

पुष्कळशा मूलभूत सामाजिक प्रश्नांचें सध्यांचें ज्ञान अपुरें आहे. नियोजनांत ५० लाख रुपये राष्ट्रीय विकासांतील सामाजिक, आर्थिक व अनुशासन-विषयक प्रश्नांचें संशोधन व चौकशीकरितां ठवले आहेत.

## सामाजिक कायदे.

समाजांत जर प्रगतिपर बदल घडवून आणावयाचे असतील तर एक महत्त्वाचा मार्ग म्हणजे समाज-विषयक कायदे करण्याचा. सध्यांचे त्या विषयासंबंधींचे कायदे तपासून पाहण्याकरितां व त्यांत जरूर त्या सुधारणा करण्याकरितां एक योग्य असें मंडळ नेमावें. कोठलाहि सामाजिक कायदा परिणामकारक व्हावयाचा असला तर त्याच्यामागें सुबुद्ध अशा जनमताचा पाठिंबा असावा लागतो; तरच त्या कायद्याचा अंमल होऊं शकतो.

## सार्वजनिक संस्थांना मदत.

जरी राज्य-सरकारनें योग्य त्या सार्वजनिक काम करणाऱ्या संस्थांना मदत केली तरी त्या संस्थांनीं स्वतःवरच अवलंबून राहिलें पाहिजे, आणि ज्या वर्गाची त्या सेवा करितील त्यांच्याकडून शक्य ती मदत मिळविली पाहिजे. विश्वस्त-मंडळें व देणग्या निर्माण केलेल्या संस्थांजवळ पुष्कळ निधि असतो. त्यांची पाहणी करावी, व त्या निधींतून कल्याणप्रद असा कार्यक्रम हातीं घेण्याकरितां योग्य असा कायदा कोणता करितां येईल याची चौकशी करावी.

## स्त्रियांचें हित-संवर्धन.

स्त्रियांच्या सुख-स्वास्थ्याकरितां करावयाच्या संघटित चळवळींचा मुख्य भर सार्वजनिक संस्थांवरच असतो. अखिल भारतीय महिला परिषद व दुसऱ्या अनेक संस्थांनीं या बाबतींत चांगलें काम केलें आहे. मद्रास व उत्तर-प्रदेशच्या सरकारनीं स्त्रियांच्या सुख-स्वास्थ्याचा कार्यक्रम व्यापक प्रमाणावर हातीं घेतला आहे, व त्याकरितां स्वतंत्र खातींहि काढलीं आहेत.

## मुलांचें हित-संवर्धन.

मुलांचें आरोग्य, संवर्धन व संगोपन या प्रश्नांकरितां सामाजिक कार्य करणाऱ्या संस्थांना महत्त्वाचें काम कराव लागेल. ज्या अंगांकडे खास लक्ष दिलें पाहिजे तीं पुढीलप्रमाणें:—

( १ ) शाळेंत व इतर संस्थांत असणाऱ्या अपुरा आहार मिळणाऱ्या लहान मुलांच्या आहारांत भर घालणें.

( २ ) दुर्बल मनाच्या मुलांबाबत मार्गदर्शक कार्यक्रम.

( ३ ) लहान मुलांच्या बाबतींत मार्गदर्शनाकरितां उपचार-गृहें.

( ४ ) कामगार स्त्रियांच्या मुलांकरितां पाळणे.

( ५ ) क्रीडांगणांची व्यवस्था व राखण.

( ६ ) बालक-केंद्रें; सुसज्ज क्रीडांगणें; बालवाङ्मयाचीं वाचनालयें, आणि बालकांतील कलेचा व कौशल्याचा विकास व्हावा म्हणून सोयी करणें; नाट्य-गृहें काढणें.

( ७ ) पोरकीं, टाकलेलीं व निराश्रित मुलांकरितां संस्था काढणें; अशा संस्था राजिस्टर्ड केल्या जाव्यात, व त्यांवर देखरेख करावी.

बाल-गुन्हेगारांच्या प्रश्नाकडेहि नियोजनानें लक्ष दिलें आहे. मध्यवर्ती सरकारनें नुक्ताच या विषयासंबंधीं एक आदर्श कायद्याचा कच्चा खर्डा तयार केला आहे.

देशांत असलेल्या शेंकडों बाल-हित-संवर्धक संस्थांचें एकत्रीकरण करावें, व त्यांच नेतृत्व करावें अशाहि आवश्यकतेचें नियोजनांत प्रतिपादन केलें आहे. इंडियन कौन्सिल फॉर चाइल्ड वेल्फेअर संस्थेनें एक व्यापक कार्यक्रम तयार केला आहे. त्यांत एक राष्ट्रीय केंद्र याकरितां स्थापावें असें म्हटलें आहे.

## तरुणांचें हित-संवर्धन.

' नियोजनांत सध्यां असलेल्या युवक-संघांना व संस्थांना सरकारनें मदत करावी असें सुचविलें आहे. त्याकरितां एक युवकांच्या संलग्न-संस्थांचें राष्ट्रीय कौन्सिल स्थापावें, व त्यांचें सुसंघटित केंद्र असावें असें म्हटलें आहे. स्काउट-चळवळीला, व इतर मुलांच्या आणि युवकांच्या चळवळींना, नॅशनल कॅडेट कोरला, युवकांच्या शिबिरांना व सहलींना, आणि इतर सामुदायिक चळवळींना उत्तेजन द्यावें. राष्ट्राच्या उभारणीकरितां करावयाच्या विधायक कार्याकरितां तरुणांच्या शक्तीला चालना द्यावी म्हणून १ कोटि रुपये नियोजनांत ठेवले आहेत.

## राष्ट्रीय शारीरिक पात्रता.

सामाजिक हित-वर्धनाच्या कार्यक्रमाकरितां शारीरिक लायकी असणें अत्यंत जरूर आहे. निरनिराळ्या विभागांत निरनिराळ्या वयाच्या मुलांच्या गटांत शारीरिक लायकीचें राष्ट्रीय गमक कोणतें हें ठरविण्याकरितां एक तज्ज्ञ-कमिटी नेमावी. शाळाधिकारी व व्यायाम-मंडळें यांनीं तरुणांच्या आंवाक्यांत ही प्रमाणित लायकी यावी म्हणून योग्य त्या सोयी कराव्या. सध्यां असलेल्या एका शारीरिक शिक्षण-संस्थेचें राष्ट्रीय संस्थेंत रूपान्तर करावें असेंहि सुचविलें आहे. क्रीडांगणाच्या जरूरीवर विशेष जोर दिला आहे. हिंदुस्थानला अद्याप क्रीडा-नैपुण्यांत बरेंच अंतर गांठावयाचें आहे. त्याकरितां सतत उत्तेजन व साहाय्य यांची जरूरी आहे. हिंदुस्थानांत देशी खेळांची विविधता आहे. समाज-कार्यक्रमांत या खेळांच्या वाढीला उत्तेजन दिलें जावें.

## शारीरिक दृष्ट्या अपंग.

जे शरीरानें किंवा मनानें दुबळे आहेत त्यांच्या रक्षणाकरितां, त्यांच्याविषयीं काळजी घेण्याकरितां, व त्यांच्या राहण्याची सोय करण्याकरितां साऱ्या प्रश्नांची व्यापकता किती आहे यांची पाहणी केली पाहिजे. या क्षेत्रांत काम करणाऱ्या खासगी संस्थांना चांगली मदत केली पाहिजे. शारीरिक दृष्ट्या पंगु असलेल्यांचा प्रश्न फार मोठा आहे. कांहीं राज्यांत त्याची थोडीफार व्यवस्था आहे; तथापि हें काम करणाऱ्या सार्वजनिक संस्थांना उत्तेजन व मदत देऊनच यश मिळवितां येईल.

## सामाजिक दुर्गुण.

शरीर-विक्रयाच्या धंद्याचें निर्मूलन करावें या आन्तरराष्ट्रीय करारावर सही करणारा हिंदुस्थान एक देश आहे. ह्या दुर्गुणाशीं लढण्याकरितां नियोजनांत उपाय सुचविले आहेत. निरनिराळ्या राज्यांत ह्या दुर्गुणाच्या प्रतिबंधाची व इलाजाची कोठवर प्रगति झाली आहे हें पाहण्याकरतां एक कमिटी नेमावी. इतरहि अनेक सूचना केल्या आहेत. असलेल्या कायद्याची सक्त अंमलबजावणी करावी म्हणून पहारा करणाऱ्या संस्था सुदृढ कराव्यात, व पोलिस-खात्यांत एक खास नोकर-वर्ग विशिष्ट भागाकरितां नेमावा. मध्यवर्ती कायद्याची शिफारस नियोजनानें केली आहे. त्या कायद्याच्या अंमलबजावणीकरितां हें काम करणाऱ्या सार्वजनिक संस्थांच्याबरोबर सहकार्य करणारी एक संस्था असावी असेंहि सुचविलें आहे.

## गुन्हे व त्यांची सुधारणा.

शिक्षेच्या कारभारामध्यें सुधारणा करण्याबाबत राज्यांनीं बऱ्याच उपयुक्त गोष्टी केल्या आहेत. गुन्हेगारांची सुधारणा करण्याकरितां तीन दृष्टींनीं विचार केला पाहिजे—

( १ ) गुन्हा घडण्यापूर्वीची अवस्था.

( २ ) त्या गुन्ह्यांत सुधारणा करणाऱ्या संस्थांचा कारभार.

( ३ ) नंतरची काळजी.

पोलिस लॉकअप्स, तुरुंग यांचा कारभार तपासावा, व जेल-मॅन्युएल योग्य प्रकारें दुरुस्त करावें अशी याबाबत सूचना केली आहे.

तुरुंगांचा अधिकाधिक प्रमाणांत तुरुंगांतील कैद्यांच्या पुनर्वसनासाठीं उपयोग करावा. मोठ्या व लहान तुरुंगांची पुनर्रचना करावी, व निरनिराळ्या वर्गांच्या कैद्यांची, स्त्री-कैद्यांची व तरुण गुन्हेगारांची त्यांत योग्य व्यवस्था करावी. कैद्यांना मदत करणाऱ्या संस्था, व प्रोबेशन आणि आफ्टर केअर ॲसोसिएशन्सना या क्षेत्रांत फार उपयुक्त काम करतां येईल. मध्यवर्ती सरकारनें एक नॅशनल ब्युरो ऑफ करेक्शनल ॲडमिनिस्ट्रेशन स्थापावा. त्यानें वर उल्लेखिलेलीं कामें करावींत.

## समाज-हिताच्या कामीं समाजाचें कार्य.

स्वतःचे प्रश्न सोडविण्याच्या कामीं स्थानिक जनता ज्या प्रमाणांत जबाबदारी घेईल त्या प्रमाणांत समाज-हिताचें क्षेत्र रुंदावेल. समाज-हितवर्धक कार्यक्रमांत चार परस्परांशीं संलग्न अशा कल्पना आहेत. ( १ ) स्वयं-साहाय्य व

